# अनुक्रमणिका.




| विषय. | पृष्ठ. |
|---|---|
| उपोद्घात | |
| भाग १ ( प्रकरण १ ) चरित्रनायकाचा परिचय. ... | १ |
| ,, ,, ( ,, २ ) श्रीकरणाधिप हेमाडपंत. ... ... | ९ |
| भाग २ हेमाद्रीची ग्रंथरचना. ... ... ... ... | ३१ |
| भाग ३ देवगिरीच्या यादवराजघराण्याचा इतिहास. ... ... | ५२ |
| भाग ४ रामदेवराव जाधवाचे राजवटीत मराठीचा उत्कर्ष. ... | ११० |
| भाग ५ उत्तर कोंकणात देवगिरीच्या यादवांचें राज्य. ... ... | २२२ |
| भाग ६ मोडी लिपि. ... ... ... ... ... | २६३ |
| भाग ७ महानुभावपंथीय मराठी वाङ्मय. ... ... ... | २८६ |
| भाग ८ हेमाडपंती देवळें. ... ... ... ... | ३३४ |
| भाग ९ उपसंहार. ... ... ... ... ... | ३५२ |
| परिशिष्टें:— | |
| नं. १ व्रतखंडांत हेमाद्रीनें यादवराजाची पौराणिक काळापासून दिलेली वंशावळ व राजप्रशस्ति. ... ... | १ |
| ,, २ अलिबाग तालुक्यांतील शिलाहार राजाचे वेळचा शके ११०२ चा शिलालेख. ... ... | १० |
| ,, ३ पूर्वकालीन व उत्तरकालीन यादवराजांच्या शिलालेखांची व ताम्रपटांची जंत्री. ... ... | ११ |
| ,, ४ आष्टी येथील ताम्रपट. ... ... ... | २० |
| ,, ५ ओंवळे ( ठाणे ) येथील ताम्रपट. ... ... | २४ |
| ,, ६ सिद्धापूरचा शिलालेख. ... ... ... | २६ |
| ,, ७ खंजूरचा शिलाशासन. ... ... ... | २८ |

,, ८ वसईचा तांम्रपट. ... ... ... ... ३०
,, ९ पंढरपूरच्या चौऱ्यांशीचा शिलालेख. ... ... ३५
,, १० आबे येथील तीन शिलालेख ... ... ... ४८
,, ११ बेलापूरचे शिलालेख. ... ... ... ६३
,, १२ पिंपळोडीचा महजर. ... ... ... ६५
,, १३ चिमणाजी आप्पाची, अंताजी रघुनाथ कावळे वगैरे वसईच्या मोहिमेसंबंधी पत्रें. ... ... ७०
,, १४ पाटणचा शिलालेख. ... ... ... ७३
,, १५ हरिहर येथील कानडी शिलालेख. ... ... ७४
,, १६ दावणगिरी येथील शिलालेख. ... ... ७४
,, १७ बाहाळ येथील शिलालेख. ... ... ... ७६

## छायाचित्रें.

भारताचार्य चिंतामणराव विनायक वैद्य.... ... ... १
डॉक्टर भाऊ दाजी. ... ... ... ... ३२
डॉक्टर ( सर ) रामकृष्णपंत भांडारकर. ... ... ५६
इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे. ... ... २६४
विनायकराव लक्ष्मण भावे. ... ... ... ... २८८
हेमाडपंती देवळांचा सर्वसाधारण नकाशा. ( अ )... ... ३३६
नीलांग येथील हेमाडपंती देवळाच्या गाभाऱ्याच्या दरवाज्यावरील नक्षीकाम. ( ब ) ... ... ... ३४०
नारायणपूर येथील हेमाडपंती पडकें देऊळ. ( क )... ... ३४४
नारायणपूर येथील हेमाडपंती देवालयाच्या सभामंडपाच्या छतावरील नक्षी ( ड ) ... ... ... ... ३४८
सिन्नर येथील गोंडेश्वराच्या देवळाचें छायाचित्र. ( ई ) ... ३५२

# हें पुस्तक लिहिण्याचें कामीं ज्या ग्रंथाचा आधार घेतला आहे त्यांचा नामनिर्देश.

१ हेमाद्रीचा चतुर्वर्गचिंतामणि ( व्रतखंड, दानखंड, परिशेषखंड ).
२ बोपदेवाचा मुक्ताफल ग्रंथ ( हेमाद्रीचे टीकेसुद्धा ).
३ नंदर्गिकराचा रघुवंश.
४ कीर्तिकौमुदी ( सोमेश्वराची ).
५ हस्त्यायुर्वेद ( पालकाप्य मुनिकृत )
६ बिल्हणाचें विक्रमांकदेवचरित.
७ इंडियन अँटिक्वरी सीरीज्
८ मुंबई ग्याझेटिअर्स ,
९ एपिग्राफिका इंडिका ,,
१० पश्चिम हिंदुस्थानचे आर्किऑलॉजिकल व्हॉल्यूमस्.
११ Rice साहेबाचा कानडा शिलालेख संग्रह.
१२ फर्ग्युसनचे भारतीय शिल्पकलेवरील ग्रंथ
१३ बर्जेस् चे ,, ,, ,,
१४ हॅवेलचे ,, ,, ,,
१५ व्हिन्सेंट स्मिथचे ,, ,,
१६ प्रमथ कुमार आचार्यांचे ,, ,,
१७ भारत-इतिहास-संशोधक-मंडळामार्फत प्रसिद्ध झालेले ग्रंथ.
१८ राजवाडे यांनी मराठ्यांच्या इतिहासाची साधनें.
१९ विश्ववृत्त.
२० ग्रंथमाला
२१ महाराष्ट्र-सारस्वत ( भावे यांचे )

२२ महानुभावीय-मराठी-वाङ्मय ( श्रीयुत यशवंतराव खुशाल देशपांडे ).

२३ श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे चरित्र (वे. शा. सं. लक्ष्मण पांगारकर).

२४ श्रीयुत यशवंतराव खरे यांचे यादवकालीन शिलालेखावरील ग्रंथ.

२५ बंगाल रायल एशियाटिक सोसायटीचे ज्दारयूम इ. स. १८७२.

२६ मुंबई रायल एशियाटिक सोसायटीचे जर्नल.

२७ ग्रेट ब्रिटन रायल एशियाटिक सोसायटीचे जर्नल.

२८ हिंदुधर्मशास्त्रकारांचा इतिहास [ इंग्रजी ] ( श्रीयुत पां. वा. काणे ) ॲडव्होकेट.

२९ वऱ्हाडचा इतिहास ( श्रीयुत यादवराव माधव काळे ).

३० महिकावतीची बखर इ. इ.



# उपोद्घात.

आधुनिक काळांतील एखाद्या थोर पुरुषाचें तरुण पिढीस आदर्शभूत होईल, असें चरित्र न लिहिता, फुटके तुटके शिलालेख, गजलेले ताम्रपट, फाटक्या तुटक्या बखरी वगैरे हुडकून काढून, त्यात मिळालेल्या माहितीवरून प्राचीन काळच्या एखाद्या व्यक्तीचें चरित्र लिहिण्यात कोणता फायदा आहे ? अशी वाचकवर्गाकडून पृच्छा करण्यात आल्यास ती अस्थानीं होणार नाहीं ! परंतु प्रस्तुत ग्रंथाचा चरित्रनायक हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत ह्याच्या संबंधानें अशा प्रकारचा आक्षेप घेण्यात येणार नाहीं, असें आम्हास वाटतें. हेमाद्रि हा राजकार्यधुरंधर, युद्धकलापटु, उत्कृष्ट ग्रंथकर्ता, संस्कृतज्ञ, मराठी भाषेविषयीं अभिमान बाळगून तिच्या उत्कर्षाविषयीं सतत झिजणारा असा होता. सुमारें ६०० वर्षांपूर्वी त्यानें प्रचारात आणलेली मोडी लिपी महाराष्ट्रात खाजगी व राजकीय व्यवहारात अद्याप प्रचलित आहे. वऱ्हाडात, महाराष्ट्रात व दक्षिणेंत हेमाडपंती देवळें जागोजाग दृष्टीस पडतात यावरून त्याचें नाव महाराष्ट्राच्या स्मरणातून अद्याप गेलेलें नाहीं.

त्याचा **चतुर्वर्गचिंतामणि** हा ग्रंथ, त्यानें सनातन वैदिक-धर्माच्या पुनरुज्जीवनार्थ जे परिश्रम केले त्यांची साक्ष पटवित आहे. याशिवाय धर्मग्रंथकार व मीमांसाकार म्हणून तो सर्वत्र प्रख्यात आहे. अशा प्रकारचे सद्गुण ६०० वर्षांपूर्वीच्या ज्या महाराष्ट्रीय पुरुषात एकवटलेले होते, त्याच्याविषयीं कोणत्या महाराष्ट्रीयास

आदर वाटणार नाहीं? यूरोपांतील अगर अमेरिकेंतील एखाद्या व्यक्तींत, यांपैकीं एखाद दुसरा गुण वास करीत असला तरी त्याचा कितीतरी गौरव करण्यांत येतो! सुमारें ६०० वर्षांपूर्वी देवगिरीच्या राज्याचें वैभव वाढवून तें साम्राज्यपदास पोहोंचविण्याचें कामीं हेमाद्रि हा वन्याच अशीं कारणीभूत झाला, असें त्याच्या चरित्रावरून दिसून येतें. मंत्रिपदाचे हुद्यावर बरीच वर्षे काम केल्यामुळें त्यास राजनीतिमधील सर्व डावपेंच पूर्णपणें अवगत होते. देवगिरीचे अखेरचे यादवराजे महादेवराव व रामदेवराव यांचे राजवटींत गजसेनाधिपतीचें काम त्याजकडे सोंपविण्यांत आलें होतें, यावरून युद्धकलेमध्यें त्यानें बरेंच प्राविण्य मिळविलें असलें पाहिजे, असें अनुमान काढण्यास जागा आहे. 'चतुर्वर्गचिंतामणि' सारख्या प्रचंड ग्रंथाची रचना त्यानें केली, यावरून श्रुति, स्मृति, पुराणें व इतिहास यांचा दांडगा व्यासंग त्यानें केला होता, यांत शंका नाहीं. श्रीबोपदेवाच्या 'मुक्ताफल' व 'हरिलीला' या ग्रंथावर त्यानें विद्वत्ताप्रचुर टीका लिहिल्या, यावरून त्याचें संस्कृतभाषेवर प्रभुत्व होतें ही गोष्ट निर्विवाद होय. मराठी भाषेचा राजदरबारांत पहिल्याप्रथम प्रवेश करविण्याचें श्रेय त्यानें संपादिलें, तसेंच तिच्या उत्कर्षाविषयीं त्यानें आपल्या हयातींत अत्यंत परिश्रम केले. राजकीय व खासगी पत्रव्यवहार अल्पावधींत मोठ्या प्रमाणावर करतां यावा, म्हणून त्यानें मोडी लिपि प्रचारांत आणिली, व ती आज सहाशें वर्षे महाराष्ट्रांत अव्याहत चालू आहे. आयुर्वेदावर त्यानें श्रेष्ठ दर्जाची टीका लिहिली, यावरून वैद्यशास्त्रादि त्यानें अभ्यास केला होता, असें दिसतें. त्यानें यादवांचे राजवटींत करणाधिपाचे

हुद्यावर असतांना राजाश्रय मिळवून वऱ्हाडांत, महाराष्ट्रांत व दक्षिणेंत शेकडों देवालयें निर्माण केली; व सनातन हिंदुधर्माचें संवर्धन केलें. अशा रीतीनें राजकारण, ग्रंथकर्तृत्व, वैद्यशास्त्र, शिल्पशास्त्र व युद्धशास्त्र अशा परस्पर भिन्नविषयांत असलेलें आपलें प्राविण्य ज्यानें जगाच्या निदर्शनास आणलें, व ज्याची स्मृति आज भरतखंडांत ६००-७०० वर्षे कायम आहे, अशा थोर विभूतीचें चरित्र महाराष्ट्रासच काय, पण सर्व भरतखंडास ललामभूत होणें सहाजिक आहे.

अलिकडे पुराणवस्तुशास्त्राचा अभ्यास करण्याकडे व प्राचीन इतिहासाचें संशोधन करण्याकडे, तरुण पिढीचें बरेंच लक्ष वेधलें आहे. त्यांस हेमाद्रीचें चरित्र अनेक प्रकारें उद्बोधक होणार आहे. हेमाद्रीनें आपल्या व्रतखंडांत पूर्वकालीन व उत्तरकालीन यादव राजांचा संक्षिप्त इतिहास दिला आहे. त्यावरून हेमाद्रीची इतिहासलेखनाबद्दल आस्था दिसून येते. बौद्धिक गुणांखेरीज, हेमाद्रीच्या आंगीं स्वधर्मनिष्ठा, दानशूरत्व, सदाचारसंपन्नता वगैरे नैतिक गुण वास करीत होते. तो भागवतधर्माचा कट्टा अनुयायी होता, ही गोष्ट त्याच्या चरित्रावरून दिसून येते.

भारतीयांची इतिहास लेखनाबद्दल अनास्था सर्वश्रुत आहे. परंतु गेल्या ६०-७० वर्षांत फ्लीट, किल्हॉर्न, बर्जेस, बुल्हर, बोथिन, कॅम्बेल वगैरे आंग्लपंडितांनीं, व के. डॉ. सर भांडारकर, डॉ. भाऊ दाजी, पं. भगवानलाल इंद्रजित, शंकर पांडुरंग पंडित, काशीनाथ त्रिंबक तेलंग, डॉ. गुणे, इतिहासाचार्य काशिनाथ विश्वनाथ राजवाडे, श्रीयुत भारताचार्य चिंतामणराव वैद्य, काशिनाथ बापू पाठक, डॉ. केतकर, डॉ. बेलवल्कर, डॉ. सुखटणकर, श्रीयुत पांडुरंग वामन

ऊर्फ अण्णासाहेब काणे ॲटर्नी वैगेरे एतद्देशीय पंडितानीं प्राचीन शिलालेख, ताम्रपट, जुनीं नाणीं व हस्तलिखितग्रंथ यांचें संशोधन करून भरतखंडातील गेल्या हजार दीडहजार वर्षांचा इतिहास उजेडात आणण्याचें श्रेय संपादिलें. जुने कागद पत्राबद्दल ऐतिहासिक माहिती मिळविण्याचें कामीं व त्याचें संशोधन करण्याचें कामीं किती अडचणी येतात याची कल्पना उपरिनिर्दिष्ट केलेल्या विद्वान् गृहस्थाचे लेख वाचल्यावाचून यावयाची नाहीं. शिलालेख व ताम्रपट ज्या राजाच्या नेतृत्वाखालीं अस्तित्वात आलेले असतात, त्यात त्याची भरपूर स्तुति काव्यमय भाषेत केलेली असते त्यामुळें त्यातील ऐतिहासिक सत्य शोधून काढणें कठीण जातें स्वतंत्र पुराव्याची जोड मिळाल्या वाचून जबाबदार इतिहासकारास त्याजवर भिस्त ठेवणें योग्य वाटत नाहीं. इतिहासाचार्य राजवाडे यानीं आपलें सर्व आयुष्य प्राचीन व अर्वाचीन काळातील ऐतिहासिक सामुग्री मिळविण्याचे कामीं खर्चीं घातलें व शेकडों वर्षें अंधारात दडून राहिलेले कागदपत्र उजेडात आणले. 'मराठ्याच्या इतिहासाचीं साधनें'या ग्रंथाचे खंड त्याच्या श्रमाचें फळ होय दक्षिणें-तील आंध्रभृत्य, चालुक्य, गुप्त, शिलाहार, कदंब, पल्लव, होयसळ यादव (म्हणजे द्वारासमुद्र उर्फ हलेबीड येथील), देवगिरीचे यादव वैगेरे वंशातील राजघराण्याचा थोडाबहुत इतिहास, शिलालेख, ताम्रपट व जुनी नाणीं याच्या सहाय्यानें उपलब्ध होण्यासारखा आहे व तो प्रकाशित झाल्यास त्यावरून महाराष्ट्राच्या गतवैभवाची बरीच कल्पना होण्यासारखी आहे युरोप खंडातील पीटर धि ग्रेट, नेपोलिअन, नेलसन, लूथर, जोसेफ मॅझिनी वैगेरे थोर पुरषाचीं चरित्रें मराटींत प्रसिद्ध झालीं आहेत त्याप्रमाणें गौतमबुद्ध, महावीर,

अशोक, चंद्रगुप्त, पृथ्वीराज चव्हाण, सिंघणदेव, लवणप्रसाद, भोज, श्रीहर्ष, विजयानगरचे राज्यसंस्थापक, हेमाद्रि, हेमचंद्र, तोडरमल्ल, माधवाचार्य, सायणाचार्य, खोलेश्वर इत्यादि थोर पुरुषांचीं चरित्रें मराठींत, प्रसिद्ध झालीं पाहिजेत.

पुराणवस्तुसंशोधनाचें काम व्यवस्थित रीतीनें चालावें या हेतूनें पुणें येथील भारतइतिहास-संशोधक-मंडळ, भांडारकर ओरिएन्टल इन्स्टिट्यूट या संस्था स्थापन झाल्यास बरींच वर्षे झालीं. सदरील संस्था आपलें कार्य व्यवस्थितरीतीनें करीत आहेत, ही मोठ्या संतोषाची गोष्ट आहे. मुंबई इलाख्याबाहेरही बंगाल, मद्रास, युनायटेड प्रॉव्हिन्सेस् वगैरे प्रांतातील पुराणवस्तुसंशोधक, भरतखंडाचा प्राचीन इतिहास प्रकाशित करण्याचे कामीं अव्याहत परिश्रम करीत आहेत. सर रामकृष्णपंत भांडारकर यांनीं वृद्धापकालीं देखील प्राचीन इतिहासलेखनाचा आपला व्यासंग कायम ठेवला होता, ही गोष्ट त्यांनीं ' महानुभावपंथाचा खरा इतिहास ' सन १९०७–१९०८ चे सुमारास प्रसिद्ध केला, यावरून दिसून येते. भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांनींही डॉक्टर भांडारकरांप्रमाणें आर्यांच्या प्राचीन-इतिहासाचें संशोधन करण्याचें काम आस्थेनें चालविलें असून मध्ययुगीन भारत नांवाचा विस्तृत ग्रंथ प्रसिद्ध केला आहे, ही गोष्ट त्यांस भूषणावह आहे. त्यांचें उदाहरण तरुण पिढींतील होतकरू अभ्यासकांनां अनुकरणीय आहे.

---

## आभार प्रदर्शन

प्रो पांडुरंग वासुदेव कुळकर्णी एम् ए ( एल्फिन्स्टन् कॉलेजा-तील संस्कृत भाषेचे अध्यापक ), श्रीयुत सदानंद लक्ष्मण कापडि बी एम् सी (मुंबई रॉयल एशियाटिक सोसायटीचे लायब्रेरियन,) या दोन विद्वान् गृहस्थानीं जरूर ते ग्रंथ प्रस्तुत लेखकास वेळोवेळीं पुरविले, याबद्दल त्यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच आहेत श्रीयुत बळिराम जनार्दन आचार्य, संपादक ( नवामनु ) यानीं हा ग्रंथ छापून तयार करण्याचे कामीं फार मदत केली, श्रीयुत द्वारकानाथ गोविंद वैद्य, ( संपादक, सुबोधपत्रिका ) गणपतराव लाड, ( आर्टिस्ट् ) रामराव पुरषोत्तम जोशी बी ए, म्यानेजर केसरी, सदानंद लक्ष्मण कापडि बी एम् सी वसंतराव सखाराम राउत, जे पी वगैरे सद्गृहस्थानीं या पुस्तकांत प्रसिद्ध झालेल्या छायाचित्रांचे ब्लॉक देऊन प्रस्तुत लेखकास उपकृत केलें याबद्दल त्या सर्वांचे आभार मानणें जरूर आहे

या पुस्तकांत छपाइचे कामीं व विरामचिन्हांचे बाबतींत अपरिहार्य कारणामुळें बरेच दोष राहून गेले आहेत, त्याबद्दल वाचक वर्ग हंसक्षीरन्यायानें आम्हास क्षमा करील अशी आशा आहे



# अर्पण-पत्रिका.

भारत इतिहास-संशोधक मंडळाचे अध्यक्ष,
मुंबई युनिव्हर्सिटीचे सन्माननीय सभासद,
टिळक महाविद्यालयाचे कुलगुरु वगैरे.
मध्ययुगीन भारत, संस्कृत-वाङ्मयाचा
इतिहास वगैरे अनेक ग्रंथांचे कर्ते.
श्रीयुत



भारताचार्य चिंतामण विनायक वैद्य, एम्. ए. एल्‌एल्. बी.

जन्म १८ ऑक्टोबर १८६१

यांस

हें पुस्तक सप्रेम सादर अर्पण केलें आहे.

चैत्र शुद्ध १
शके १८५३.

ग्रंथकर्ता.

॥ श्री ॥

# हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत यांचें चरित्र.

## भाग पहिला.

## प्रकरण १ लें

— परिचय —

सूराणामवधिर्निधिश्च यशसामेकाश्रयः संपदाम् ।
दातॄणां प्रथमः कुलाकुलगृहं वैदग्ध्यभाजां गुरुः ॥
धौरेयश्च विपश्चितां सुकृतिनामद्वैतयादास्पदम् ।
नैवासीन्न च वर्तते न भविता हेमाद्रिसूरेः परः ॥

हेमाद्रिपंडितासारखा विद्वान्, वैभवशाली, कीर्तिमान्, दानशूर, राज्यकार्यधुरंधर, सदाचरणी व धर्माभिमानी असा दुसरा पुरुष पूर्वीच्या कालांत झाला नाहीं व पुढें होणार नाहीं. अशा तऱ्हेचें प्रशंसोद्गार आमच्या चरित्रनायकासंबंधानें वर उद्धृत केलेल्या श्लोकांत काढलेले आहेत. हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत याचा जन्म कोठें व केव्हां झाला, तसेंच देवगिरी येथील यादव राजघराण्यांतील अखेरचे यादव राजे महादेव व रामदेवराव यांचे राजवटीत "करणाधिप" ही पदवी त्यास प्राप्त होण्यापूर्वी त्याचे आयुष्य-क्रमांत कोणत्या गोष्टी घडल्या हें समजण्यास कांहींच साधन नाहीं. हेमाद्रि हा शुक्ल यजुर्वेदी शाखेचा वत्सगोत्री पंचप्रवरी

ब्राह्मण होता त्याच्या वडिलाचें नाव कामदेव, आजाचें नाव वासुदेव व पणजाचें नाव वामन होतें, अशी माहिती त्यानें स्वतः रचिलेल्या चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथावरून मिळते श्रीपंढरपुर येथाल श्रीविठ्ठलमंदिराचा जीर्णोद्धार करण्याच्या कामास शके ११८५ च्या प्रारंभी सुरुवात झाली, व नवें मंदिर शके ११०५ च्या अखेर तयार झालें अशी माहिती मंदर मंदिरात असलेल्या चौऱ्यायशीच्या शिलेवरील लेखावरून मिळते जीर्णोद्धार करण्याचे कामीं या थोर व धार्मिक लोकांनीं द्रव्यद्वारा मदत केली त्याची नावें, त्याच्या देणगीचा उल्लेख करून सदरील शिलेवर खोदण्यात आली आहेत हा लेख खोदण्याचा प्रारंभ शके ११९५ श्रीमुखनाम संवत्सरी झाला व शके ११०९, मध्यें खोदण्याचें काम समाप्त झालें हा शिलालेख नव्या देवळाच्या देवडीवर बसविला होता व तो " चौऱ्यायशीचा " दगड ह्मणून प्रसिद्ध आहे प्रस्तुत शिलेस " चौऱ्यायशीचा दगड ' असें नाव पडण्याचें कारण कोणत्याही यात्रेकरूनें अगर भक्तानें या शिलेवर आपली पाठ घासली असता तो चौऱ्यायशींच्या फेऱ्यातून ह्मणजे चौऱ्यायशीं लक्ष योनींत जन्म घेण्याचे खटाटोपातून मुक्त होतो अशी भाविकांची समजूत आहे

शके ११९५ त देवगिरीच्या यादव राजाचा महाराष्ट्र व कर्नाटक प्रांतावर पूर्ण अम्मल होता त्यावेळीं यादव घराण्यातील शेवटचा राजा रामदेवराव हा राज्य करीत होता त्याचा दरारा दक्षिणेंत सर्वत्र होता आमचा चरित्रनायक हेमाद्रि अगर हेमाडपत हा

त्याचा प्रधान होता. हेमाडपंताचें राजकारणांत ज्याप्रमाणें रामदेवराव राजावर वजन होतें, तसेंच धार्मिक बाबतींतही त्याजवर त्याचें वर्चस्व असावें ही गोष्ट श्रीविठ्ठलमंदिराच्या जीर्णोद्धाराचे कामीं हेमाडपंत करणाधिप व त्याचे यजमान श्रीयादव ( जाधव ) नारायणप्रौढप्रतापचक्रवर्ति रामचंद्रदेवराय यां उभयतांनीं सढळ हातांनीं मदत केली होती, यावरून स्पष्ट दिसतें.

चौऱ्यायशीच्या शिळेचे आठ 'र' काने केले असून त्यांत देवाच्या पूजे-अर्चेकरितां देणग्या देणाऱ्या भक्तांचीं नांवें एकाखालीं एक दिलीं आहेत. या आठ रकान्यावर शिळेच्या सबंध रुंदीवर तीन ओळी खोदल्या असून पहिल्या ओळींत शेवटल्या वर्गणीदारांचीं नांवें खोदली आहेत, दुसऱ्या ओळींत श्रीविठ्ठलाच्या प्रशंसेचा एक संस्कृत श्लोक दिला आहे, व तिसऱ्या ओळींत खालील आठ रकान्यांत वर्गणी कोणत्या कामाकरितां जमविली याचा उल्लेख करण्यांत आला आहे. एका रकान्याखेरीज करून प्रत्येक रकान्यावर ज्या पुढाऱ्यामार्फत वर्गणीदारांनीं आपली वर्गणी भरली त्याचें नांव व खातें दिलें आहे. त्याचा प्रकार असाः--

## पंढरपुरच्या शिलालेखाचा मथाळा[1]

स्वस्ति श्री सकु ११९५ श्री मुख नाम संवत्सरे फागनीपूर श्री विठलरायासी तिसा मिति फुलें दांडे आनंदार्के चालवे आ नाना भक्त माली आं दव पेकाचा विवर्न ॥ ( स्वस्ति श्री शके ११९५ श्री मुख नाम संवत्सरीं फागनीपूर ( पंढरपूर ) येथील श्रीविठ्ठल

[1] पंढरपुरच्या प्रस्तुत शिलालेखाची सविस्तर माहिती परिशिष्ट १ मध्यें दिली आहे.

देवास × × × × पुढें दाडे वहाणें, चंद्र-सूर्य आहेत तोंपर्यंत नेहमी चालविण्यासाठी अनेक भक्तांनी देणगीदाखल दिलेल्या रक माचा तपशील ) पहिल्या रकान्यातील (३२) (३४) (३५) या संख्ये पुढील मजकूर आहे तो असा —

(३२) सोडवीकार हेमाडपंडिती वामनादत्त + ग १

(३४) श्री पादरी फड-मुख्य समतात भाग आचंद्रार्क डेवदाटा

(३५) श्री जाधवनारायणप्रौढप्रतापचक्रवर्ति श्रीरामचंद्रदेव

राएदा

+ + श्री सर्वाधिकारी विठ्ठ——

मूळ शिलालेखात तत्कालीन अनेक व्यक्तींची व गावांची नावें असून शिवाय त्यांवेळच्या चलनी नाण्याचा उल्लेख त्यात आला असल्यामुळें तो ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाचा आहे जीर्णोद्धार झाल्यावरही म्हणजे शके १८९९ सालीं श्रीविठ्ठलमंदिराकरिता आलेल्या देणग्यांचाही उल्लेख या शिलालेखात असल्यामुळ वर्गणी गोळा करण्याचें व देणगी देणाराची नावें शिलेवर खोदण्याचें काम पुढें बराच काळ चाललें असावें असें अनुमान निघतें

पहिल्या रकान्यातील [ ३२ ] संख्येपुढें ज्या हेमाडिपंडिताच्या नावाचा निर्देश केला आहे तो आमचा चरित्रनायकच असावा असें नि संशय वाटतें त्याच्या खालोखाल तत्कालीन देवगिरीचा यादव राणा त्याचा यजमान श्री प्रौढप्रताप-चक्रवर्ति यादव नारायण रामचंद्रदेवराय याच्या देणगीचा उल्लेख करण्यात आला आहे, यावरून वरील विधानास पुष्टि मिळते हेमाडिपंडितास " सोडवी "

कार या टोपण नांवानें संबोधिलें आहे ह्यावरून त्याचा गांव सोडवी असावा असें दिसतें. हा गांव कर्नाटक प्रांतात आहे अशी माहिती मिळते. त्यावरून व हेमाद्रि हे नांव महाराष्ट्रीय नसल्यामुळें आमचा चरित्रनायक कर्नाटक प्रांतांतील मूळ रहिवाशी असावा असें दिसतें ह्या शिलालेखांतील पहिल्या रकान्यांत असलेल्या [ ५७ ] [ ९५ ] या संख्येपुढें हेमाडिपंडित या नांवाच्या आणखी दोन वर्गणीदारांची नोंद आहे ती अशी:—

( ५७ ) कोटॉन हेमाडिपंडिते द। ( ग ) १ दे दां १

( ९५ ) कोहोर हेमाडिपंडि ग. १ दि दा. १

हेमाडपंडित या नांवाच्या तीन व्यक्ति या यादींत नमूद केलेल्या आहेत. त्या परस्परापासून भिन्न आहेत हें दाखविण्यासाठीं त्यांची गांववार नोंद करण्याची खबरदारी प्रस्तुत शिलालेख ज्यांच्या नेतृत्त्वाखालीं तयार करण्यांत आला त्यांनी घेतली असावी असें दिसते.

चतुर्वर्गचिंतामणि हा विस्तृत व धार्मिक दृष्ट्या अत्यंत उपयुक्त ग्रंथ हेमाद्रीनें रचिला ह्याबद्दलचा वर उल्लेख केलेला आहे. सदरील ग्रंथाच्या परिशेषखंडांत आमच्या चरित्रनायकाच्या वडिलांचे नांव कामदेव असें दिलें आहे. स्वतः रचिलेल्या ग्रंथांत आपल्या वडिलांचें नांव कोणी चुकीनें लिहिलें हे संभवत नाहीं. पंढरपूरच्या शिलालेखांतील वर्गणीदारांच्या यादींत हेमाडपंडिताच्या वडिलांचे नांव वामन असें लिहिलें आहे. तेव्हां या दोन व्यक्ति अगदी भिन्न असाव्यात असें सकृद्दर्शनी दिसतें. किंवा थोप्यायर्गीच्या शिलेवर हेमाडपंडिताच्या वडिलांचें नांवाऐवजी त्याच्या पणजोबांचें

नाव नंतर चुकीनें गोदलें जाण्याचाही संभव आहे पण वर्गणा दाराच्या यादीतील संदर्भावरून त्यांत उल्लेखिलेला "सोडर्वीकार" हेमाडिपटित व आमचा चरित्रनायक हेमाडपंत ह्या दोन व्यक्ति एकच असल्या पाहिजेत असें दिसतें, व त्यांचे वडिलांचें नावा ऐवजी पणजाचें नाव चुकून खोदलें गेलें असावें हीच गोष्ट अधिक संभवनीय आहे

पंढरपुरच्या चौऱ्यायशींच्या शिलालेखात "सोडवींकार" हेमाडपटिताखेरीज आणखी दोन हेमाडिपंडिताचा नामनिर्देश केलेला आहे ह्यांच्या नावाच्या मागें त्यांच्या स्थलाचा निर्देश केला असल्यामुळें त्या दोन व्यक्ति अगदी भिन्न असून तत्कालिन प्रमुख गृहस्थांत अथवा सुप्रसिद्ध विद्वानांत त्यांची गणना होत असावी असें दिसतें कोटींन व कोहोर ही स्थलें कोणत्या प्रांतांत मोडतात याबद्दल खात्रीलायक माहिती मिळत नाहीं तसेंच वरील दोन हेमाडिपंडितांनी काहीं ग्रंथ लिहिले असल्यास त्यांची माहिती उपलब्ध नाहीं या बाबतींत संशोधकांनीं लक्ष घालणें जरूरीच आहे

संस्कृत व मराठी भाषेत प्रतिभासंपन्न ग्रंथरचना केल्याबद्दल हेमाद्रीची सर्व भरतखंडांत प्रसिद्धी आहे "चतुर्वर्गचिंतामणि" ग्रंथात वैदिक व पौराणिक कालातील मत-वैकल्याचा व नित्य-नैमित्तिक कर्मांचा पद्धतशीररीतीनें संग्रह केलेला आहे शिवाय 'मुक्ताफल' "हरिलीला" इत्यादि ग्रंथावर सुंदसूद टीकाकार म्हणून हेमाद्रीची कीर्ति आजवर अविच्छिन्नपणें गाजत आहे कविश्रेष्ठ कालिदासाप्रमाणेंच हेमाडपंताच्या उज्वल कीर्तीमुळें बऱ्याच कमी दर्जाच्या ग्रंथाचें कर्तृत्त्व त्यांजवर लादलें जातें

पंढरपुरच्या शिलालेखांत आणखी दोन समकालीन हेमाडपंतांचा उल्लेख करण्यांत आला आहे, त्यांनी कांहीं ग्रंथरचना केली असल्यास त्रिवर्गाच्या नामसादृश्यामुळें ग्रंथकर्तृत्वाच्या बाबतींत अशा तऱ्हेचा घोटाळा होणें स्वाभाविक आहे.

श्रीकालिदासाच्या रघुवंश काव्यावर ज्या विद्वानांनी टीका केल्या आहेत त्यांत वल्लभ, हेमाद्रि व मल्लिनाथ यांची नांवें प्रामुख्यानें पुढें येतात. हेमाद्रीनें रघुवंशावर टीका लिहिली आहे ती "दर्पण" या नांवानें प्रसिद्ध आहे. कालिदास कर्त्याचें हृद्गत उत्तम प्रकारें समजून घेऊन, त्या धोरणानें टीका करण्यांत हेमाद्रीनें आपलें सर्व कौशल्य खर्च केलें असून इतर टीकाकारांवर ताण केली आहे असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे. परंतु रघुवंशावर "दर्पण" नांवाची टीका करणारा हेमाद्री व आमचा चरित्रनायक हेमाद्री हे एकच आहेत कीं काय याबद्दल बरीच शंका येते, कारण "दर्पण" टीकेच्या समाप्तिसूचकवाक्यामध्यें ( "कोलीफोनमध्यें" ) सदरील टीकाकाराच्या वडिलाचें नांव "ईश्वरसूरि" असें दिलें आहे. व आमच्या चरित्रनायकाच्या वडिलाचें नांव 'कामदेव' असल्याचें वर म्हटलें आहे. यादवांच्या राजवटींत 'करणाधिप' या हुद्यावर असतांना हेमाडपंतानें मराठी भाषेची अभिवृद्धि व्हावी या हेतूनें जे आटोकाट प्रयत्न केले त्यावरून संस्कृत भाषेप्रमाणेंच त्याचें मराठी भाषेवर नितांत प्रेम होतें हें उघड आहे. रघुवंशावर "दर्पण" नांवाची टीका करणारा हेमाद्री ह्यानेंही आपल्या टीकेंत 'पारिभाषिक' संस्कृत शब्दांचीं मराठी रूपांतरें जागोजाग देऊन मराठी भाषेविषयीं आपलें प्रेम व्यक्त केलें आहे. संमेत ह्या

टीकेंत 'चतुर्वर्गचिंतामणि' ग्रंथाचा बऱ्याच वेळां उल्लेख केला आहे. ह्या अंतर्गत प्रमाणावरून आमचा चरित्रनायक हेमाडिपंत व 'दर्पण' टीकाकार हेमाद्री ह्या दोन व्यक्ति भिन्न नसाव्या असें सद्दर्शनी वाटतें. उभयतांच्या वडिलांच्या नांवांत फरक आहे ही एकच गोष्ट वरील विधानास विरोधक आहे. पंढरपुरच्या चौऱ्यायशीच्या शिलालेखांत व चतुर्वर्गचिंतामणी ग्रंथांत आमच्या चरित्रनायकाच्या वडिलांचे नांवांत अशाच तऱ्हेचा फरक आहे. मूळ ग्रंथाची नक्कल करणाऱ्याच्या हलगर्जीपणामुळें अगर अज्ञानामुळें अशा चुका होण्याचा संभव आहे. तथापि या बाबतींत सबळ पुरावा पुढें येईपर्यंत ठाम मत देणें वाजवी होणार नाहीं. हेमाडपंत ह्यांच्या चरित्राचे प्रामुख्यानें चार भाग करतां येतील :

(१) देवगिरीचे यादव राजे महादेव व रामदेवराव (रामचंद्रराव) यांचे राजवटींत 'करणाधिप' ह्या हुद्यावर असतांना अगर अन्य रीतीनें त्यांनें मुत्सद्दी ह्या नात्यानें बजाविलेली अपूर्व कामगिरी, (२) त्यांचें ग्रंथकर्तृत्व, विशेषत सनातन हिंदुधर्माची नित्यनैमित्तिक कर्में पद्धतशीर चालावी म्हणून अत्यंत परिश्रमपूर्वक केलेली ग्रंथरचना, (३) मराठी भाषेच्या अभिवृद्धिसाठीं केलेले प्रयत्न, व (४) विशिष्ट रीतीनें इमारती बांधण्याची नवीन कल्पना काढून भारतीय शिल्पकलेंत घडवून आणलेली क्रांति व त्याबरोबरच भरतखंडांत हिंदुधर्माचें अभ्युत्थान पुन्हा व्हावें म्हणून जागोजाग टोलेजंग देवालयें बांधून धर्मोद्धाराचे कामीं त्यांनें दाखविलेली सक्रिय सहानुभूति.

## प्रकरण २ रें

### श्री 'करणाधिप' हेमाडपंत.

हेमाद्रीनें रचिलेल्या चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथाचा व्रतखंड म्हणून एक भाग आहे. त्यांत राजप्रशस्ति नांवाचें प्रकरण आहे. सदरील प्रकरणांत एकंदर यादव राजाची पौराणिक कालापासून ऐतिहासिक कालांतील देवगिरीच्या यादवराजघराण्यांतील महादेव राजापर्यंत विस्तृत व संपूर्ण वंशवळ दिली आहे. शिवाय देवगिरीच्या यादव राजघराण्यांतील अखेरचे राजे सिंघण, कृष्णदेव अगर कान्हेरदेव व महादेव यांच्या पराक्रमांचें त्रोटक वर्णन दिलें आहे. सदरील राजप्रशस्तींतील शेवटचा श्लोक खाली दिला आहे.

> यस्य श्रीकरणाधिपः स्वयमयं हेमाद्रिसूरिः पुरः ।
> प्रौढप्रातिमवर्ण्यमानविलसद्वंशो भृशं शोभते ॥

या श्लोकांतील पहिला शब्द "यस्य" देवगिरीच्या यादव राजघराण्यांतील महादेव राजाबद्दल आहे. यावरून आमचा चरित्रनायक हेमाद्रि हा महादेवाच्या राजवटींत "करणाधिपाच्या" हुद्यावर होता हें स्पष्ट दिसतें. शिवाय चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथाच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी दिलेल्या कोलोफोनमध्यें ( समाप्तिसूचक वाक्यांत ) खालीं लिहिलेला मजकूर आहे त्यावरूनही या विधानास पुष्टि मिळते.

"इति श्रीमहाराजाधिराजमहादेवस्य समस्तकरणाधीश्वरसकलविद्याविशारदश्रीहेमाद्रिविरचिते" या मजकुरावरून महादेव

राजाच्या आज्ञेवरून किंवा त्याच्या आश्रयाखाली चतुर्वर्ग चिंतामणि नांवाचा प्रचंड ग्रंथ रचिला गेला ही गोष्ट निःसंशय होय हेमाद्री हा करणाधिपाच्या हुद्यावर असताना त्याला कोणतीं कामें करावी लागत यांबद्दल कोठेंही उल्लेख केलेला आढळत नाहीं "करणाधिप' या शब्दाचें निव्वळ मराठी रूपांतर 'दफ्तरचा मालक' असें आहे प्रधानमंडळाचा आत्मा असा साधा व सरळ अर्थ केल्यास, करणाधिप म्हणजे राज्यांतील मुख्यमंत्रि (Prime Minister) होय या बाबतींत सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनी आपल्या "दख्खनच्या इतिहासांत" करणाधिपाच्या कामगिरीबद्दल खुलासा केला आहे तो असा "करणाधिप" याचा अधिकार म्हटला म्हणजे अलिकडच्या आमच्या चीफ सेक्रेटरीच्या (मुख्य चिटणिसाच्या) अधिकारा सारखा दिसतो म्हणजे त्यानें आपल्या यजमानाकडील राज्यांतील सर्व हुकूम व आज्ञापत्रें वगैरे लिहावीं व जिकडीलतिकडे पाठवावीं व राज्याचें दफ्तर योग्य रीतीनें सांभाळावें सारांश करणाधिप यास राजाला सल्लामसलत देणारा असें म्हटलें असता वावगें होणार नाहीं श्री वोपदेवानें आपल्या 'मुक्ताफल' ग्रंथात हेमाद्रीचें वर्णन करताना त्यास गणकामणीः असें म्हटलें आहे यावरून फडनिशी खात्याच्या अधिकाऱ्याचें काम त्याजकडे होतें असें दिसतें ठाणें शहरापासून सुमारें पाच मैलावर असलेल्या ओवळें गावी कोणा एका मुसल्मानाचें थडगें उकरताना शके ११९४ व शके १२१२ (इसवी सन१२७२व१२९०) सालचे देवगिरीचे यादवराजे रामदेवराव याचे वेळचे दोन ताम्रपट सापडले आहेत त्यांतील सारांश असा –

रामचंद्रदेव याचे पूर्वीचा यादवराजा महादेव यानें कोंकण-प्रात कावीज करून त्या प्रांतावर अच्युतनायक या नावाचा आपलेतर्फे सुभेदार नेमिला होता सदरील अच्युतनायकानें वर निर्दिष्ट केलेला ओंवळें गाव ३२ ब्राह्मणास दान दिला या ताम्रपटात देवगिरीच्या यादवराजाचा मूळ पुरुष भिल्लम याजपासून अखेरचा राजा रामचंद्रदेव याजपर्यंतची वंशावळ दिली असून त्यात त्याचें–(रामचंद्रदेवाचे) अलंकारिक भाषेत वर्णन केलें आहे, तें मनोरंजक व उद्बोधक असल्यामुळें सारांशरूपानें येथें देतों –रामचंद्रदेव राजाची बिरुदें दिलीं आहेत तीं येणें प्रमाणे १ एकांगवीर २ वीर नारायण ३ द्वारावतीपुरवराधीश ४ गुर्जरराजाचा फडशा उडविणारा केवळ सिंहच ५ तेलंगण देशाचे राजे हेंच कोणी वृक्ष त्याचा उच्छेद करणारा हत्ती ६ मारव देशचे राजे हेंच कोणी दीप त्याना मालविणारा

वर उल्लेखिलेल्या ताम्रपटात आमच्या चरित्रनायकासंबधानें संस्कृतमध्यें दिलेला मजकूर अत्यत महत्त्वाचा असल्यामुळें तो जसाचा तसाच येथें उध्दृत करितों

"इत्यादि समस्तबिरुदावलीविराजमानें सकलभूतलमनुशासति यदुकुलकुमुदचंद्रे रामचंद्रे नरेंद्रे तत्प्रसादासादितनिखिलराज्य धुरीणता वहति समस्त हस्तिप्रकाण्डसे निजगुणसुभगभावुके समस्तकरणाधिपत्यमर्यादापुर्योणेव नितरां " श्रीकरणाधिप मंडलें मंत्रि चूडामणी गुणदान रोहणाद्रौ हेमाद्रौ या संस्कृत उताऱ्याचा साराश मराठींत खालीं दिला आहे —

" यदुकुलवंशीय देवगिरीचा राजा रामदेवराय राज्य करीत असता त्याच्या पदरीं हेमाद्री या नावाचा सर्वगुणसंपन्न व दानशूर

असा मुख्य मंत्रि होता. तो सर्व राज्याचा भार वहात असे. राज्यांतील हस्तिदलाचें आधिपत्य त्याजकडे असून तो करणाधिपाचे हुद्यावर होता. झाडी नावाच्या ( रानटी अगर वडगेर ) जातीचा त्यानें बीमोड केला होता.

यावरून देवगिरीचे यादवराजघराण्यातील शेवटचा पराक्रमी राजा रामचंद्रदेव याचे पदरी निदान शके ११९४ (इ. स. १२७२) पर्यंत हेमाद्रि हा मुख्य मंत्रि असून त्याजकडे सर्व करणाधिपाचे आधिपत्य असून शिवाय हस्तिदलावर देखरेख करण्याचे काम त्याचेकडे असावें असें दिसतें. तसेंच हेमाद्रि सर्व सद्गुणाचा पर्वत होता असेंही त्याच्यासंबधानें या ताम्रपटात प्रशंसोद्गार काढले आहेत. देवगीरीच्या राज्यात, 'झाडी' नावाची एक रानटी जात होती तिजपासून राज्यास त्रास पोहोंचत असे त्या मंडळाला जीत करण्याचे कामीं हेमाद्रीनें पुढाकार घेतला होता.

सदरील ताम्रपटाचे इंग्रजीमध्यें भाषांतर करताना मिस्तर बॉथन साहेबानें एक विलक्षण चूक केली आहे त्यामुळें ताम्रपटाचे ऐतिहासिक स्वरूप नष्ट होण्याचा संभव आहे. यादव राजाच्या पदरी " हेमाद्रि " नावाचा मंत्रि होता ही गोष्ट बॉथन साहेबास माहित नसल्यामुळें मूळात " हेमाद्रि " असा शब्द असूनही त्याऐवजी " हिमाद्रि " असा पाठ गृहित धरून त्याचा अर्थ त्यानीं हिमालय पर्वत असा केला आहे ताम्रपटातील संदर्भाकडे लक्ष न दिल्यामुळें व इतिहासाच्या अज्ञानामुळें साहेब मजकूराकडून ही चूक झाली असावी असें दिसतें.

" हस्तिपकाध्यक्षे " हें विशेषण फार महत्त्वाचे आहे व त्यावरून पूर्वीच्या काळीं युद्धकलेमध्यें हस्तिदलाचा प्रामुख्यानें उपयोग

केला जात होता असें दिसतें. मोठे मदोन्मत्त हत्ती बाळगून त्याजकडून शत्रूंच्या सैन्यावर कशा रीतीनें हल्ला करावा याबद्दल त्यास विशिष्ट प्रकारचें शिक्षण दिलें जात होतें. नाहींतर हस्तिदलावर देखरेख करणारा अम्मलदार नेमण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें. हत्तींना कवायतीचें शिक्षण देऊन लढाईच्या कामीं त्यांचा कसा उपयोग करून घ्यावा याबद्दलचें शास्त्र आहे त्यास "पालकाप्य" अशी संज्ञा आहे. त्यावरून पूर्वी लढाईमध्यें सर्वसाधारणपणें हत्तींचा उपयोग केला जात होता असें दिसतें.

रामचंद्रदेव याचे पूर्वीचा राजा महादेव यानें कोंकणावर स्वारी करून त्यावेळच्या "कुंकुणेश" म्हणजे कोंकणचा राजा सोमेश्वर याचा पूर्ण पराभव केला. त्यावेळीं महादेव राजानें आपल्या बरोबर नेलेल्या फौजेंत हत्तींचा मोठा समुदाय होता असें हेमाद्रीनें आपल्या "व्रतखंड" ग्रंथांतील राजप्रशस्ति प्रकरणांत या लढाईचे वर्णन करितांना म्हटलें आहे, तो मूळ श्लोक असा—

यदीयगन्धद्विपगण्डपालीनिश्च्युतदानांबुतरंगिणीषु ।
सोमः समुद्रप्रवेपशलोऽपी ममज्ज सैन्यैःसह कुंकुणेशः ॥

अर्थ—कोंकणचा राजा सोम हा समुद्रांत पोहण्याच्या कामीं मोठा तरबेज होता तरी त्या राजाच्या ( महादेवाच्या ) मदोन्मत्त असलेल्या हत्तींच्या गंडस्थलांतून स्रवणाच्या दानोदकांच्या नद्यांत आपल्या सैन्यासह बुडून मेला.

आमच्या चरित्रनायकाकडे मंत्रिपदाच्या कुशाग्रतेज हत्तींच्या पथकावर देखरेख करण्याचें काम सोंपविण्यांत आलें होतें असें दिसतें. पाटलीस-फर्मानांच्या एका कोपऱ्यांत असून केवळ माहुतांवर ठेवण्याचें

अगर इतर राजेलोकांच्या दरबाराबरोबर पत्रव्यवहार करणें येवढेंच कामें हेमाद्रिकडे सोंपविण्यांत आलीं होतीं असें म्हणतां येणार नाहीं. युद्धकलानैपुण्य व मुत्सद्देगिरी हे दोन गुण हेमाद्रीच्या ठिकाणीं एकवटलेले होते असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं.

आपली इतर जबाबदारीचीं कामें साभाळून पराराज्याबरोबर आपल्या दरबारचा राजकीय बाबतींतील पत्रव्यवहार करण्याचें कामही हेमाद्रीस करावें लागे. राजकीय व खाजगी पत्रव्यवहाराच्या कामीं पूर्वापार चालत आलेल्या मायन्यांत बरीच सुधारणा करून त्यानें नवीन मेस्तकें तयार केलीं. तसेंच जमाखर्च लिहिण्याच्या मामूल पद्धतींत त्या कालानुरूप त्यानें उपयुक्त सुधारणा केल्या. सदरील मेस्तकें हेमाद्रीनें फार कुशलतेनें तयार केलीं होतीं असा त्याचा लौकिक आहे. ही गोष्ट खालीं दिलेल्या मजकुरावरून सहज दिसून येईल. गोविंद कवि या नांवाच्या एका लेखकानें एक मेस्तक लिहिलें आहे त्यास शेणवाईपणाचें मेस्तक असें त्यानें नांव दिलें आहे, त्यांत तो लिहितो.—

" पूर्वीं तया देवगिरीसी । रामदेवराव राजापाशीं । असतां हेमाडपंतासी । युक्ति असे आठवली । मोडी लिपी लंकेहूनि आणिली । त्यावरी स्वमति युक्त रचिली । आणि कामराजासी आज्ञा दिधली । शेणवाई पद्धत रचावया । हेमाडपंताचे आज्ञेसरिसें । कामराजें स्वमति प्रकाशें । कामराजेमेस्तक केलें ऐसें । श्रवणें ऐकत होतों । त्या ग्रंथासि बहुत यत्न केला । परंतु ग्रंथ हातासी नाहीं आला ।

तेथील वेंचा प्राप्त झाला । ओंविया चाळिस । त्यासी अन्वय लावुनि । गोविंदे सयुक्ते करूनि । इतकें किंचित् विस्तारुनि । सांगितलें असें ।

हेमाडपंताच्या आज्ञेवरून कामराजानें एखादा ग्रंथ लिहिला असावा असें वरील उताऱ्यावरून दिसतें. सदरील मेस्तकांच्या राजदरबारी शिस्त ठेवण्याच्या कामीं फार उपयोग होत असला पाहिजे. कारण यादवांचे राज्य मुसलमानानी नष्ट केल्यानंतरही सदरील मेस्तकांचा उपयोग थोड्या-बहुत फेरबदलानें मुसलमानी दरबारांत करण्यांत येत होता.

महाराष्ट्रांत चालुक्यघराण्याच्या राजश्रीस ओहोटी लागून देवगिरीच्या यादव अगर जाधव राजघराण्याच्या राज्यलक्ष्मीस भरती येऊं लागली व थोडक्यांच काळांत बृहन्महाराष्ट्रापासून म्हैसूरपर्यंत यादवांचे एकछत्री राज्य प्रस्थापित झालें. शके ११०९ पर्यंत देवगिरीच्या यादवराजांची गणना मांडलिकांत होत असे. परंतु भिल्लमाचा मुलगा सिंहण उर्फ सिंघण यानें आपल्या पराक्रमानें राज्याचा विस्तार माळव्यापासून तहत म्हैसुरापर्यंत वाढविला. सदरील सिंघणाच्या पराक्रमाचीं वर्णनें अनेक शिलालेखांतून दिलेली आहेत. त्याबद्दलची सविस्तर माहिती तिसऱ्या भागांत दिली आहे. सिंघणाचे नातू कृष्ण (कान्हेर) व महादेव यांनी आपल्या आजानें यश मोठ्या धडाडीनें चालवून त्याच्या कीर्तीत भर घातली. महादेवाच्या अमदानींत आमचा चरित्रनायक हेमाद्रि मंत्रिपदावर आरूढ झाला होता. महादेवानें कोंकण, कर्नाटक व गुजराथ हे प्रांत आपल्या पराक्रमानें जिंकून आपल्या

राज्यास जोडले. कृष्ण ऊर्फ कन्हेर याचा मुलगा महादेवाच्या पश्चात गादीवर बसला. त्यानें आपल्या पूर्वजांवर ताण करून आपला दरारा माळव्यापासून म्हैसुरापर्यंत बसविला. महादेव व रामदेवराव या उभय राजाच्या कारकीर्दीत यादवांच्या राज्याची विलक्षण भरभराट होऊन त्यांस सार्वभौमत्व प्राप्त झालें. या सर्व गुणागुणांच्या राजकारणात हेमाद्रि हा विद्वान राज्यकार्यधुरंधर व युद्धकलानिपुण असल्यामुळें त्याचें तेज सहजच त्यावेळीं पडलें असलें पाहिजे. महादेव व रामदेवराव यास आपल्या राज्याचें वैभव वाढविण्याच्या कामीं जें अलोट व अकल्पित यश प्राप्त झालें त्याचें बरेंचसें श्रेय त्याच्या राज्यनौकेचा कर्णधार **हेमाद्री** याजकडे येतें असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. सदर बाबतींत पुढें-मागें ज्यास्त ऐतिहासिक माहिती मिळाल्यास या महाराष्ट्रीय सुपुत्राच्या चरित्रातील व देवगिरीच्या यादव राजघराण्याच्या इतिहासातील एक अज्ञात दालन खुलें होईल अशी आशा आहे.

इतिहासाची पुनरावृत्ति होते असें म्हणतात. राघोबादादानें आपला पुतण्या नारायणराव याचा वध केल्यामुळें पेशवाईच्या अखेरीस मराठी राज्यात ज्याप्रमाणें बेदिली उत्पन्न झाली त्याचप्रमाणें रामदेवराव यानें आपला चुलतभाऊ **आमण** ( महादेवाचा मुलगा ) याचे डोळे काढून त्याचा अमानुषपणें वध केला. त्यामुळें यादवाच्या राज्यांत भयंकर यादवी माजली. राज्यातील विचारी व अनुदार लोक राज्य सोडून गेले. यादव राजघराण्याविषयीं अभिमान बाळगणाऱ्या लोकांना भावी संकट परंपरेची दुष्ट स्वप्नें पडूं लागली. या व इतर अनेक कारणामुळें हेमाद्रीनें राजकारणातील आपलें अंग

काढून घेतलें असावें असें दिसतें. परंतु त्याच्या पुढील आयुष्यक्रमाबद्दल व तो केव्हां कालवश झाला याबद्दल कांहीएक माहिती उपलब्ध नाहीं.

रामदेवरायाच्या कारकीर्दीस आरंभ झाल्यानंतर कांही वर्षांनीं सनातन हिंदुधर्माचें वर्चस्व दरबारांत कमी होत जाऊन त्याऐवजीं वैदिकधर्मविरोधीपंथाचें वजन वाढत चालल्यामुळें, हेमाद्रीनें आपण होऊनच राजकारणांतून अंग काढून घेतलें असावें असा कित्येकांचा तर्क आहे. अठराव्या शतकांतील महाराष्ट्रीय मुत्सद्दी नाना फडणविसांची, सवाईमाधवरावांच्या पश्चात् राजकारणांत सल्लामसलत घेण्याचें बंद झाल्यावर, ज्याप्रमाणें पेशवाईची व त्याबरोबरच सर्व मराठी राज्याची सत्ता नष्ट झाली, त्याप्रमाणें तेराव्या शतकांतील महाराष्ट्रीय राज्यकार्यधुरंधर हेमाद्रि यानें राजकारणांतून आपलें अंग काढून घेतल्यानंतर योग्य सल्लामसलतीच्या अभावीं यादवांची सत्ता कायमची लयास गेली !!

अकबराच्या कारकीर्दीत ज्याप्रमाणें राजा तोडरमल यानें जमाबंदीची व्यवस्था लावून दिली, त्याप्रमाणें महादेव व रामदेवराव या उभयतांच्या राजवटींत हेमाद्रीनें राज्यांतील जमाबंदीची शिस्त लावून दिली. कोणताही देश जिंकून घेतल्यानंतर तो कायमचा अमलाखालीं ठेवणें अवघड असतें. हेमाद्रीनें प्रजेच्या सुखासाठीं अनेक गोष्टी प्रचारांत आणिल्या. त्याण्यांत बाजारी वापरण्याचा उपक्रम, लिहिण्याच्या बाबतींत सुलभता यावी म्हणून देवनागरी लिपीस नवें वळण देण्याची व्यवस्था व चुन्याच्या साहाय्यावांचून विशिष्ट पद्धतीनें दगडी इमारती बांधण्याची पद्धत या तीन गोष्टी हेमाद्रीनें दक्षिणेंत पहिल्यानें सुरू

केल्या अशी परंपरागत समजूत आहे. या बाबतीत पुढें यथामति विवेचन करण्यांत येईल.

२ हेमाद्रीचें ग्रंथकर्तृत्व.

हेमाद्रीची कीर्ति आज सुमारें सात-आठशें वर्षे भरतखंडांत गाजत आहे याचें विशेष कारण त्याची निरनिराळ्या विषयावरील व विशेषत. धार्मिक विषयावरील ग्रंथरचना हें होय. हिंदुस्थानच्या उत्तर भागांत त्याचेपूर्वी सुमारें दोन-दिडशें वर्षे मुसलमानी राजांचा अंमल जरी सुरू झाला होता, तरी त्याचा जम बरोबर बसला नव्हता म्हणून म्हणा किंवा अन्य कांहीं कारणानें म्हणा मुसलमानास दक्षिणेकडे नजर फेंकण्यास रामदेवराव यादवाच्या कारकीर्दीपर्यंत संधि मिळाली नाव्हती. हिंदुधर्माविषयीं मुसलमानांना अत्यंत तिटकारा होता व त्यांच्याकडून हिंदूंचा फार छळ होत होता, अशा बातम्या त्यापूर्वीच दक्षिणेंत पसरल्या होत्या. हिंदूंना अत्यंत पूज्य अशा सोमनाथाच्या मंदिराचा व त्यांतील मूर्तींचा महमद् गझनीनें विध्वंस केल्याचें उदाहरण त्याचे डोळ्यापुढें होतेंच. शिवाय जैनधर्मांखेरीज वैदिक धर्मास विरोध करणारे लिंगायत व महानुभावपंथ असे दोन नवे पंथ उदयोन्मुख होऊ लागले होते. हिंदुधर्मास आलेली ग्लानी नाहींशी होऊन त्यास पुन्हा उज्वल स्वरूप प्राप्त व्हावें या हेतूनें महादेवराजाच्या आश्रयाखालीं हेमाद्रीनें " चतुर्वर्गचिंतामणि " नांवाचा प्रचंड ग्रंथ रचिला. त्यांत हिंदुधर्मीयांनीं नेहमीं पाळावयाची मतवैकल्यें, नित्यनैमित्तिक कर्मे, दानधर्म, तीर्थयात्रा व मोक्षसाधन या विषयाचें श्रुतिस्मृति व पुराणें यांचे आधार देऊन सांगोपांग विवेचन केलें आहे. हिंदुधर्मविषयक यावनींत सदरीलु ग्रंथ अद्याप आधारभूत मानिला

जातो. स्मृति व पौराणिक कालापासून हिंदुधर्मांत चालत आलेले शेंकडों आचार व व्रत-नियमादि विधि संगतवार एके ठिकाणीं संकलित करून "चतुर्वर्गचिंतामणि" च्या रूपानें हेमाद्रीनें हिंदुधर्मास अत्यंत उपयुक्त व पोषक अशी आचारव्यवस्था तयार केली, व त्यायोगें हिंदुधर्मीयांस उपकृत केलें. सदरील ग्रंथाचे पांच भाग असून त्याचें सविस्तर वर्णन दुसऱ्या भागांत केलें आहे. वोपदेवानें "मुक्ताफल" या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे त्यावर हेमाद्रीनें "कैवल्यदीपिका" नांवाची विद्वत्तामधुर टीका लिहिली आहे. वोपदेव हेमाद्रीच्या आश्रित होता, तेव्हां त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथावर हेमाद्रीनें टीका करावी हें सकृत्दर्शनीं चमत्कारिक दिसतें, तथापि या ग्रंथाच्या कोलोफोन–समाप्तिसूचकवाक्यामध्यें–खालीं दर्शविल्याप्रमाणें उल्लेख आहे, त्यावरून या शंकेचें निराकरण होतें. वोपदेवानें "हरीलीला" नामक (भागवताचें सार) ग्रंथ लिहिला आहे. हे दोनही ग्रंथ हेमाद्रीच्या आज्ञेवरून लिहिले गेले असें त्या ग्रंथकर्त्यांच्या पुढें दिलेल्या कबुलीवरून दिसतें.

विद्वद्धनेशशिष्येण भिषक्केशवसूनुना ।
हेमाद्रिर्वोपदेवेन मुक्ताफलमचीकरत् ॥
श्रीमद्भागवतस्कंधाध्यायार्थादि निरूप्यते ।
विदुषा वोपदेवेन मन्त्रिहेमाद्रितुष्टये ॥

वोपदेवाच्या बापाचें नांव केशव असून, गुरूचें नांव धनेश होतें. वरदा नदीच्या तीरीं सार्थ नांवाचें गांव होतें, त्या ठिकाणीं उभयतां रहात असत. वोपदेवानें संस्कृत–व्याकरण–शास्त्रावर 'मुग्धबोध' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. सदरील ग्रंथकारानें आपल्या

वाटिलाचें नांव केशव असें असून, गुरूचें नांव धनेश होतें असें ह्मटलें आहे. ह्या हकीकतीवरून वर निर्दिष्ट केलेले वोपदेव एकच होते हें निःसंशय होय. ह्याखेरीज हेमाद्रीनें संस्कृतांत बरेच टीकात्मक ग्रंथ लिहिल्याचें आढळून येतें. त्याबद्दल पुढें यथावकाश विवेचन करण्यांत येईल.

हेमाडपंताचें मराठी भाषेवर अलोट प्रेम होतें असें पूर्वी ह्मटलें आहे. त्यानें मराठी भाषेंत बरीच ग्रंथरचना केली असावी असा तर्क आहे, परंतु त्याचे ग्रंथ उपलब्ध नाहींत. खाजगी व राजकीय व्यवहारांत लिहावयाच्या पत्रांचे मायने कसे असावेत अशाबद्दल त्यानें कांहीं मेस्तकें तयार केली होती. अशाबद्दल गोविंदकर्वानें आपल्या मेस्तकांत केलेला उल्लेख पूर्वी येऊन गेला आहे. मात्र मराठी भाषेची भरभराट व्हावी म्हणून हेमाद्रीनें शक्य तितके प्रयत्न केले, याबद्दल शंका नाहीं. तत्कालीन यादवराजाच्या दरबारांत मराठीचा शिरकाव होऊन ती राजभाषा म्हणून ठरली गेली हें हेमाद्रीच्या खटपटीचें फळ होय. महानुभावपंथाचा, देवगिरीच्या आजुबाजूच्या प्रांतांत, व विशेषतः वऱ्हाडांत प्रसार होत होता. महानुभाव पंथाचे धार्मिक व इतर ग्रंथ बहुतेक मराठींतच लिहिले जात होते. त्यामुळें मराठी भाषेचा झपाट्यानें प्रसार होण्याचे कामी अनायासें मोठी मदत झाली. हेमाद्री हा 'मराठी भाषेच्या उत्कर्षासाठीं फार झटत असें,यावद्दल महानुभावपंथाचे ग्रथांत जागोजाग पुरावा आढळतो.

देवगिरीचे यादवराजे कृष्ण ऊर्फ कान्हेर, महादेव वा रामदेवराव यांच्या राजवटींत दरबारी भाषा मराठी होती व एकंदर राज्यव्यवहार मराठी भाषेच्याद्वारें चालत होता असें पूर्वी ह्मटलें आहे,

' दख्खनचा प्राचीन इतिहास ' या नांवाचा एक अमूल्य ऐतिहासिक ग्रंथ सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनीं लिहिला आहे, त्यांत संस्कृतांत लिहिलेल्या ' लेखपंचाशिका ' नांवाच्या ग्रंथाचा त्यांनीं उल्लेख केला आहे. त्यांत, सनदा, खतें, दानपत्रें व राजेलोकांच्या दरम्यान होणाऱ्या तहनाम्याचे मायने ऊर्फ मसुदे दिले आहेत. यादवराजा महाराजाधिराज सिंघण व गुजराथचा राजा महामंडलेश्वर लवणप्रसाद यांच्या दरम्यान झालेल्या "यमलपत्रा"चा (तहनाम्याचा) मसुदा त्यांत दिला आहे. त्यावरून निदान यादवराजा सिंघण याचे वेळेपर्यंत दरबारचें काम संस्कृत भाषेंत चालत असावें असें दिसतें. परंतु हेमाद्रीनें ही प्राचीन वहिवाट बदलून राजकीय कागदपत्र म्हणजे, सनदा, दानपत्रें तहनामे वगैरे मराठींत लिहिण्याचा नवीन उपक्रम केला. भोजराजाचे दरबारांत संस्कृतकवि व पंडित यांचा ज्याप्रमाणें गौरव केला जात असे त्याचप्रमाणें यादवराजा चक्रवर्ति रामदेवराव याच्या देवगिरीच्या दरबारांत मराठी कवि व ग्रंथकार यांचा त्यांच्या गुणांप्रमाणें बहुमान करण्यांत येत होता याबद्दल आमचे सन्माननीय मित्र कै. विनायकराव भावे यांनीं आपल्या महाराष्ट्र-सारस्वतांत व श्रीयुत यशवंतराव देशपांडे यांनीं आपल्या महानुभावीय मराठीवाङ्मयग्रंथांत बरींच उदाहरणें दिलीं आहेत. मुक्ताफल, हरिलीला वगैरे ग्रंथांचा कर्ता प्रख्यात संस्कृत पंडित व कवि श्रीबोपदेव [ हेमाद्रीचा आश्रित ] हा रामदेवराव यादव याच्या पदरीं होता असें मागें लिहिलेंच आहे. त्याचा शिष्य भीष्माचार्य यानें महानुभावपंथाची दीक्षा घेतली व संस्कृत आणि मराठी भाषेंत बरेच ग्रंथ लिहिले. ' रुक्मिणि स्वयंवराचा ' कर्ता

नरेंद्रकवि हा रामदेवराव यादव ऊर्फ जाधव याच्या कारकीर्दीत होऊन गेला शके १२१० मध्यें त्यानें 'रुक्मिणी स्वयंवर' नावाचा ग्रंथ लिहिला तो रामदेवराव जाधव यास फार पसंत पडला, व त्याबद्दल रामदेवराव जाधवानें त्याचा बहुमान केला यांखेरीज कवीश्वर भास्कर दामोदर पंडित वगैरे प्रतिभासपन्न महानुभावपंथीय ग्रंथकार यांचा यादव (जाधव) रामदेवराव यांचे दरबारांत बहुमान होत असे अशाबद्दल महानुभाववाङ्मयांत जागोजाग उल्लेख केलेले आढळतात देवगिरीच्या यादव ऊर्फ जाधव राज्याच्या अमदानींत महानुभावपंथाचा उदय होऊन, सदरील पंथाच्या मताचा प्रसार यादवांचे राज्यांत झपाट्यानें झाला व खुद्द राजघराण्यांतही त्याचा हलहल्ल शिरकाव होऊन त्यांतील कांहींजणांनीं सदरील पंथाची दीक्षा घेतली, अशाबद्दलचा उल्लेख महानुभावपंथीय ग्रंथांत आढळतो महानुभावपंथ, श्रीकृष्णा खेरीज अन्य उपास्य दैवतास मानीत नाहीं म्हणून त्या पंथास जय **कृष्णीयपंथ** अगर अच्युतसांप्रदाय अगर महात्मापंथ अशीं निरनिराळीं नांवें दिलेलीं आढळतात देवगिरीचे यादव राजांना आपण यदुवंशीय असल्याबद्दल फार अभिमान वाटत असे म्हणून त्यांच्या बिरुदावलींत "द्वारावतीपुरवराधीश" "यादव नारायण" अशी बिरुदें प्रामुख्यानें आढळतात ज्या पंथांत अगर सांप्रदायांत आपल्या मूळवंशांतील पुरुषास म्हणजे श्रीकृष्णास, 'एकमेवाद्वितीयम्' म्हणून उपास्यदैवत मानलें जात होतें, तो पंथ अगर सांप्रदाय देवगिरीच्या यादव घराण्यांतील राजांच्या परम आदरास पात्र झाला असल्यास त्यांत आश्चर्य कोणतें? परंतु या अवैदिक व चातुर्वर्ण्यविरोधक पंथाच्या अनुयायांचे राजदरबारांत उत्तरोत्तर वाढत चाललेलें वर्चस्व सनातन

हिंदुधर्मीयांस खरेनामें झालें. हेमाद्री हा तर सनातन हिंदुधर्माचा कट्टा अभिमानी! तेव्हां त्याला या वेदविरोधी पंथीयांचें वाढतें वजन बिलकुल सहन झालें नसल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं!! 'शिशुपालवधा'चा महानुभवपंथीय ग्रंथकार भानुभट बोरीकर याच्या चरित्रावर 'भानुविजय' नांवाच्या लिहिलेल्या ग्रंथांत हेमाद्रीनें तुर्कांस मुद्दाम बोलावून यादवांचें राज्य नष्ट केलें असा त्याजवर महानुभावपंथीयांनीं राजद्रोहीपणाचा उघड आरोप केला आहे. यावरून हेमाद्री व महानुभावपंथीय लोक व त्यांचा अभिमानी रामदेवराव यादव यांचे परस्पर संबंध सलोख्याचे नसावेत असें उघड दिसतें. राजदरबारांत मराठी भाषेचा शिरकाव झाल्यावर राज्याचे सर्व व्यवहार त्या भाषेंत होऊं लागले. हेमाद्रीच्याकाळीं बऱ्याच लिपि प्रचलित होत्या; परंतु सर्व संस्कृत व मराठी ग्रंथ देवनागरी लिपींत लिहिले जात होते. अर्थात् देवनागरी हीच दरबारची लिपि झाली. परंतु या लिपींत सुबोध व सुवाच्य रीतीनें लिहावयाचें म्हटल्यास वेळाचा अपव्यय होतो, सबब अल्पकाळांत बराच मजकूर लिहितां यावा म्हणून सदर लिपीस एक विशिष्ट प्रकारचें वळण देऊन हेमाद्रीनें 'लघुलेखन-पद्धति' तयार केली. तिला 'मोडी' लिपि अशी संज्ञा असून तिचें जनकत्व बहुजनसमाजाकडून आज शेकडों वर्षे हेमाद्रीस दिलें जातें. लेखनसौकर्यामुळें सदरील लिपि महाराष्ट्रीयांस फार प्रिय असून मराठी राज्यांत खाजगी व राजकीय लेखनव्यवहार याच लिपींत चालत असत. 'मोडी' लिपी सरकारदरबारांत बंद करून सर्व काम देवनागरींत चालवावें असा थोड्या वर्षांपूर्वी आपल्या इंग्रज सरकारनें ठराव केला होता

तो महाराष्ट्रीयांच्या सुसघटित विरोधामुळें सरकाराम परत घ्यावा लागला ही गोष्ट वाचकांच्या स्मृतींतून अद्याप गेली नसावी !

## हेमाद्रीची धर्मविषयक मतें

'चतुर्वर्गचिंतामणि' ग्रंथाच्या पुढें दिलेल्या मंगलाचरणांत हेमाद्रीनें गणपतीची आराधना केली आहे म्हणून व 'मत-मालिकेंत' "हेमाडपत गणेशभक्त। पिशाच्य चैतन्याचे लिखित" असा त्याच्याबद्दल उल्लेख केला आहे यावरून हेमाद्रींचें उपास्य दैवत "गणपति" असावें असें पुष्कळ विद्वान् लोकांचें मत आहे गणपति हा विघ्नहर्ता व विद्याधीश असल्यामुळें सर्व मंगलकार्यांच्या आरंभीं त्याचें पूजन प्राचीन काळापासून सर्व हिंदु-लोक करितात, या परंपरेस अनुसरून हेमाद्रीनें ग्रंथाचे आरंभीं ग्रंथ निर्विघ्नपणें पार पडावा म्हणून गणेशस्तवन केलें, यावरून हेमाद्रींचें उपास्यदैवत 'गणपति' असावें असें निश्चित अनुमान करणें चुकीचें होईल

'कल्याणानि ददातु वो गणपतिर्यस्मिन्नतुष्टे सति ।
क्षोदिष्ठस्यपि कर्मणि प्रभुरपितु ब्रह्मापि जिन्हायते ॥
जाते तच्चरणप्रणामसुलभे सौभाग्यभाग्योदये ।
रङ्कस्याङ्गनकुशा निविशतेदैवन्द्रलक्ष्मीऽपि ॥

श्री गजाननाच्या प्रसन्नतेची आवश्यकता मामूल वहिवाटीप्रमाणें वरील अवतरणात नमूद केली आहे

हेमाद्रीनें आपले ग्रंथांत श्रीगणेशासंबधानें आदर व्यक्त केला असला तरी, भागवतधर्माकडे त्याचा विशेष ओढा होता ही

गोष्ट श्रीबोपदेवानें लिहिलेल्या ' मुक्ताफल ' व ' हरिलीला ' ह्या ग्रंथावर त्यानें केलेल्या अमूल्य टीकेवरून दिसून येईल पैकीं मुक्ताफल ग्रंथातील समर्पक वेंचे तिसऱ्या भागात दिले आहेत चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथाचे ३१ व्या अध्यायाचे आरंभीं श्लोक दिला आहे तो असा —

" हेमाद्रिरासीद्गुरारिभक्ति
रर्थीत येदाऽखिलधर्मभेद ।
अशेषलोकोद्धरणेऽवतीर्णे ॥
... ... ... ..

यारेरीज मुक्ताफल ग्रंथाच्या आरंभीच्या श्लोकावरून हेमाद्री हा परम विष्णुभक्त ऊर्फ भागवतधर्माचा कट्टा अभिमानी होता असें स्पष्ट दिसतें तसेंच पंढरपूरच्या श्रीविठ्ठलमंदिराच्या जीर्णोद्धाराकरिता हेमाद्रीनें बरीच रक्कम देणगी म्हणून दिली, यावरूनही हेमाद्री हा भागवत धर्माचा पूर्ण अनुयायी होता ह्या विधानास पुष्टि मिळते

### सनातनहिंदुधर्मविरोधीपंथाविषयीं हेमाद्रीची सहिष्णुता-

सनातन हिंदुधर्मास कालवशात् प्राप्त झालेली क्षीणता नाहींशी करून त्याचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं हेमाद्रीनें "चतुर्वर्गचिंतामणी" नावाचा प्रचंड ग्रंथ लिहिला, यावरून हेमाद्रीच्या मनात हिंदुधर्माबद्दल किती जाज्वल्य अभिमान होता हें सहज दिसून येतें तसेंच त्यानें भरतखंडात जागोजाग देवालयें बांधून आपल्या विचारास मूर्तस्वरूप दिलें यादवाच्या राजदरबारात अवैदिक व चातुर्वर्ण्यास विरोध करणाऱ्या महानुभावपंथाच्या अनुयायाचें बरेंच वर्चस्व झालें तरी हेमाद्रीनें धार्मिक बाबतीत त्याचा हेवा अगर छळ केल्याबद्दल कोठें उल्लेख

आदळत नाहीं. उलट जैनधर्मीयांनीं देवगिरी येथें जैनमंदिर बांधण्यासंबंधीं खटपट चालविली असतां हेमाद्रीनें स्वतःचें वजन खर्च करून दरबारांतून त्यासाठी परवानगी मिळवून दिली, यासंबंधींचा उल्लेख जैनयति श्रीमद्रत्नमंडणगणि यानें लिहिलेल्या "सुकृतसागर" ग्रंथांत केला आहे. तो असा—परमार कुळांतील शेवटचा राजा धाराधीश जयसिंहदेव याचे पदरीं पृथ्वीधर ऊर्फ पेथडकुमार या नावाचा जैन मंत्री होता. त्याची व हेमाद्रीची भेट झाल्यासंबंधींची मनोरंजक हकीकत त्यांत नमूद केली आहे. या गोष्टींत ऐतिहासीक सत्य किती आहे हें सांगणें कठीण आहे. परंतु त्यावरून हेमाद्रीची परधर्मीयांच्या मतासंबंधीं बरीच सहिष्णुता होती अशी परंपरागत जी समजूत आहे तिला दुजोरा मिळतो. पृथ्वीधर हा जैनधर्माचा मोठा अभिमानी होता व जैनमताच्या प्रसारार्थ त्यानें मांडव, मांधाता, नाशिक, चंद्रावति ( हल्लींचें चांदवड ) धार, चितोड, उज्जयनि, जुनागड, धोलका, देवगिरी वगैरे ठिकाणीं सुमारें ८३ जैन मंदिरें बांधलीं. खुद्द मांडव या ठिकाणींच त्यानें शेकडों जैन मंदिरें बांधल्याचा या ग्रंथांत उल्लेख आहे।

आमचा चरित्रनायक हेमाद्रीपंडित हा कट्टा सनातन वैदिक ब्राह्मण होता व त्याचें देवगिरीच्या यादवराजाचे दरबारांत फार वजन होतें. तसेंच देवगिरीचे यादवराजघराणें हिंदुधर्मीय असल्यानें देवगिरीमारख्या ठिकाणीं जैनमंदिरें बांधणें ही गोष्ट अशक्य कोटींतील होय अशी पृथ्वीधराची खात्री होती, तथापि पृथ्वीधराच्या शब्दकोशांत "निराशा" या शब्दास अवसर नव्हता. त्यानें आपला कार्यभाग सिद्धीस नेण्यासाठीं एक अजब युक्ति लढविली ती अशी

नर्मदातीरीं ऑकारेश्वर येथें बाराज्योतिर्लिंगांपैकीं एक स्वयंभु ज्योतिर्लिंग आहे. त्याठिकाणीं पृथ्वीधरानें एक भव्य धर्मशाळा बांधून ब्राह्मणसंतर्पण सुरूं केलें. आपल्या गुणावर लुब्ध होऊन एका परधर्मीयानें ऑकारेश्वरासारख्या निर्जन ठिकाणीं आपलें स्मारक केल्याची बातमी हेमाद्रीच्या कानीं आली. हेमाद्रीनें त्याठिकाणीं स्वतः जाऊन सदरील गोष्टीच्या खरेपणाबद्दल आपली खात्री करून घेतली. तेथील ब्रह्मवृंदांनीं पृथ्वीधरास हेमाद्रीकडे नेलें व उभयतांची गांठ घालून दिली. हेमाद्रीनें पृथ्वीधरास सनातनहिंदुधर्माविषयीं अत्यादर दाखविण्याचें कारण विचारिलें. पृथ्वीधरानें देवगिरी येथें जैनमंदिर बांधण्याचा आपला मनोदय आहे असें प्रांजलपणें त्यास कळविलें. हेमाद्रीनें त्याचा मनोदय पूर्ण करण्याच्या कामीं होईल-तितकी खटपट करण्याचें आश्वासन दिलें.

हेमाद्रीनें पृथ्वीधरास कांहीं दिवस देवगिरी येथें रहावयास सांगितलें. अनुकूल परिस्थिति येतांच त्यानें पृथ्वीधराची रामदेवाबरोबर मुलाखत करून दिली. हेमाद्रीपंडिताचा जैनमंदिर बांधण्यास परवानगी देण्याचेकामीं विरोध नाहीं असें पाहून राजानें देवगिरी येथें जैनमंदिर बांधण्यास परवानगी दिली.

जैनयति श्रीमद्रत्नमंडणगणी शके १३८२ (इ. स. १४६०) सालीं कालवश झाला, देवगिरीचा अखेरचा यादवराजा रामदेवराव याची कारकीर्द शके ११९२ पासून शके १२३१ (इ.स.१२७१ ते १३०९) पर्यंत होती. याच सुमारास धाराधीश-जयसिंहदेव मुसलमानांच्या त्रासानें मांडवगडचा आश्रय धरून राहिला होता. वर दिलेल्या कालावरून ऐतिहासिक सत्याचा अंश नसावा हें वर दिलेल्या

हकिगतींत स्पष्ट दिसतें हेमाद्रीच्या अंगीं परधर्माविषयीं सहिष्णुता हा अलौकिक गुण वसत असल्यामुळें स्वतःच्या धर्मासंबधानें एकनिष्ठ राहूनही इतर धर्मीयांबद्दल सहानुभूति दाखविणें अशक्य नाहीं हें तत्त्व त्याच्या चरित्रापासून घेण्यासारखें आहे.

## हेमाडपति शिल्पशास्त्रपद्धति

भरतवर्षांत हिमालयापासून रामेश्वरापर्यंत हिंदूंची असंख्य देवालयें आहेत, त्यांत हेमाडपति पद्धतीनें बांधलेलीं देवालयें बरींच आहेत विशिष्ट पद्धतीनें इमारती बांधण्याची कल्पना हेमाद्रीनें प्रथम काढली म्हणून त्या पद्धतीस हेमाडपति असें नांव पडलें अशी बहुजनसमाजाची शेंकडों वर्षांपासून समजूत आहे चुन्याच्या मदती वाचून दगडावर दगड रचून बांधकाम करण्याची नवी कल्पना बसवून त्यानें शिल्पशास्त्रांत क्रान्ति घडवून आणिली खानदेश, वऱ्हाड, आंध्रप्रांत, कर्नाटक वगैरे प्रांतांत हेमाडपतीपद्धतीनें बांधलेलीं शेंकडों भव्य व सुंदर देवळें आहेत कल्याण स्टेशन सोडल्यावर पुण्यास जातांना "अंबरनाथ" हें पहिलें स्टेशन लागतें त्याठिकाणीं हेमाडपती पद्धतीनें बांधलेलें फार पुरातन शिवमंदिर आहे या ठिकाणीं दरसाल महाशिवरात्रीस मोठी यात्रा जमते स्थापत्यशास्त्रावर संस्कृत वाङ्मयांत उपलब्ध असलेल्या ग्रंथांत हेमाडपतीपद्धतीचा उल्लेख नाहीं आमचे मित्र कै वझे यांचा प्राचीन हिंदी स्थापत्यशास्त्रासंबधानें दांडगा व्यासंग होता पण स्थापत्यशास्त्रावरील कोणत्याहि ग्रंथांत याबद्दल उल्लेख नाहीं असें त्यांनी प्रस्तुत ग्रंथकर्त्यास पत्रानें कळविलें परंपरागत असलेल्या एकीव माहितीशिवाय याबाबतींत ऐतिहासिक पुरावा कांहीं नाहीं असें मोठ्या दिलगिरीनें

म्हणावें लागतें. हेमाडपंती पद्धतीनें बांधलेल्या इमारतीसारख्या इमारती हेमाद्रीच्या कालापूर्वीही अस्तित्त्वांत होत्या असें पाश्चात्य स्थापत्यशास्त्रज्ञांचें मत आहे. बोपदेवानें आपल्या मुक्ताफळ ग्रंथांत हेमाद्रीनें मूर्तीचे व देवालयाचें नानाविधप्रकार चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथांत दिले आहेत असें म्हटलें आहे. त्यावरून हेमाद्रीनें बरींच देवालयें बांधली, या विधानास पुष्टि मिळते.

हेमाडपंती पद्धतीखेरीज, यादवांच्या राजवटींत इमारती बांधण्याच्या ज्या विविध पद्धती होत्या त्या, आर्यावर्त, आंध्र, "चालुक्य," "कदम्ब," "पल्लव" वगैरे नांवानें प्रसिद्ध आहेत. हेमाद्री करणाधिप असतांना देवगिरीच्या राज्याचा विस्तार नर्मदातीरापासून म्हैसुरापर्यंत पसरला होता. व खुद्द हेमाद्रीनें यादवांच्या राज्यांत बऱ्यांत प्रसिद्ध ठिकाणीं व उत्तर हिंदुस्थानांतील तीर्थांच्या ठिकाणीं अनेक देवालयें बांधलीं. यावरून त्यानें बांधलेल्या देवालयाच्या विशिष्ट पद्धतीस हेमाडपंतीपद्धत असें नांव त्यावेळीं पडलें असावें. बुद्धधर्मीय लोकांनीं हिंदुस्थानांत जागोजाग लेणीं व विहारें बांधली आहेत तीं पांडवाचीं लेणीं या नांवानें संबोधिली जातात. बुद्धधर्मासंबंधानें सनातन हिंदुधर्माभिमान्याम तिटकारा वाटत होता. म्हणून बुद्धधर्माचें नांव साफ बुजून जावें या हेतूनें अशा प्रकारचीं अचाट कामें पांडवाखेरीज व्हावयाचीं नाहींत असें लोकांस भासविण्याचा त्यांचा हेतु असावा. शेंकडो देवळें बांधून हेमाडपंतानें हिंदुधर्माविषयीं लोकांच्या मनांत पुन्हां जागृति उत्पन्न केल्यामुळें त्याचें चिरंतन स्मारक रहावें या हेतूनेंही, त्या पद्धतीस हेमाडपंती हें टोपण नांव तत्कालीन बहुजन समाजाकडून देण्यांत आलें असल्यास आश्चर्य नाहीं!

आतांपर्यंत राजकीय, धार्मिक, सामाजिक व बौद्धिक यावतींत, आमच्या चरित्रनायकानें कसें यश संपादन केलें याचें त्रोटक वर्णन वर दिलें आहे. या गुणाखेरीज हेमाद्रीच्या अंगीं दानशूरत्व, सदाचारसंपन्नता वगैरे अनेक वैयक्तिक गुण होते, अशाबद्दल जागोजाग उल्लेख आढळतात. अशी सर्वगुणसंपन्न विभूति भरतवर्षांत भूतकाळीं झाली नाहीं व भविष्यकाळीं होणार नाहीं असें या ग्रंथाच्या आरंभीं उद्धृत केलेल्या श्लोकांत जे उद्गार काढले आहेत ते यथार्थ आहेत असें म्हटल्यावाचून राहवत नाहीं.



## भाग दुसरा.

### हेमाद्रीची ग्रंथरचना

तस्य श्रीकरणेशस्य काऽपि लेखनचातुरी ।
यशः प्रशस्तिभिस्तूर्णं येन दिग्भित्तयोभृताः ॥
अनेन चिन्तामणिकामधेनु कल्पद्रुमानर्थि जनायदत्तान् ॥
विलोक्य शङ्के किममुष्य सर्वं गीर्वाणनाथोऽपि करप्रदोऽभूत ॥
अथामुनाधर्मकथादरिद्रं त्रैलोक्यमालोक्य कलेर्बलेन ।
तस्योपकारे दधतानुचिन्तां चिन्तामणिः प्रादुरकारिचारु ॥

आज सुमारें सहाशें-सातशें वर्षें महाराष्ट्रांत किंबहुना भरतखंडांत हेमाद्रीची कीर्ति ज्याकारणांमुळें अविछिन्नपणें गाजत आहे त्यांत त्याच्या ग्रंथकर्तृत्वाची प्रामुख्यानें गणना करण्यांत येते. हेमाद्रीची ग्रंथसंपत्ति संस्कृत भाषेंत आहे. मराठी भाषेंतही त्यानें बरेच ग्रंथ निर्माण केले असे म्हणतात पण ते आज उपलब्ध नाहींत याबद्दल दिलगिरी वाटते. हेमाद्रीचें मराठी भाषेवर निस्सीम प्रेम होतें व तिच्या अभिवृद्धीसाठीं त्यानें आपल्या हयातींत शक्य ती खटपट केली, याबद्दल मागें उल्लेख केला आहे. हेमाद्रीनें तयार केलेल्या मेस्तकांचा तत्कालीन मराठी वाङ्मयांत वारंवार उल्लेख करण्यांत येतो, यावरून त्यानें मराठी भाषेंत कांहीं ग्रंथ रचिले असावे असा तर्क आहे. हेमाद्रीनें संस्कृत भाषेमध्यें जे ग्रंथ लिहिले आहेत त्यांवरून त्याचें गीर्वाण भाषेवरील प्रभुत्व, श्रुतिस्मृतिपुराणें वगैरे ग्रंथाचा त्याचा दांडगा व्यासंग, मार्मिक टीका करण्याची त्यांची शैली, ऐतिहासिक दृष्टि, स्वधर्माबद्दल कळकळ वगैरे अनेक गुण दृष्टोत्पत्तीस येतात. हेमाद्रीच्या अगोदर सुमारें शें-दिडशें वर्षांपूर्वी

मुसलमानाचा उत्तर हिंदुस्थानांत अम्मल सुरू होऊन त्या भागात त्याचें चांगलें वस्तान बसलें होतें. बुद्ध व जैनधर्माचें वर्चस्व जरी कमी झालें होतें तरी त्याच सुमाराम दक्षिण महाराष्ट्रात लिंगायताचा व व्हऱ्हाडमहाराष्ट्रात महानुभावाचा असे दोन अवैदिक व चातुवर्ण्यविरोधक नवे पथ उदयोन्मुख झाले होते. याकाळात पौराणिक देवाची उपासना मोठ्या उत्साहानें करण्यात येत होती. परंतु धार्मिक व्यवहार व आचार यासंबधीं विधिनिषेधपर वाक्यें व वचनें अनेक स्मृति व पुराणें यातून जिकडे तिकडे पसरली होती त्यातील वर वर दिसणारा विरोध व विसंगतपणा याचा समन्वय अथवा मेळ घालता न आल्यामुळें धर्मशास्त्राबद्दल तत्कालीन बहुजन समाजात गोंधळ माजला होता. ही असमाधानकारक स्थिति नाहीशी करून धार्मिक व्यवहार व आचार याची सगतवार जुळणी करून व परस्पर विरोधी दिसणाऱ्या वचनाचा मेळ घालून त्यास सुव्यवस्थित स्वरूप प्राप्त होईल अशा रीतीची ग्रंथरचना करण्याकडे तत्कालिन ब्राह्मणाचें व वैदिक धर्माभिमानी इतर वर्णाचें लक्ष्य वेधलें होतें या धोरणानें धारचा भोजराजा यानें धर्मशास्त्रावर एक ग्रंथ लिहिला व उत्तर कोंकणचा शिलाहारवंशीय राजा अपरार्क यानें याज्ञवल्क्य स्मृतीवर शके ११०९ मध्ये टीका लिहिली. धर्मशास्त्रावर अशाप्रकारें ग्रंथ लिहिण्याची त्या कालात उत्पन्न झालेली प्रवृत्ति १३ व्या शतकात हेमाद्रीनें व १४ व्या शतकात माधवाचार्य व सायणाचार्यानें चालू ठेविली

थिओडोर आफ्रेटच्या देखरेखेखालीं तयार झालेल्या “ क्याटलोगम् क्याटलागोरम् ” या नावाच्या पुस्तकाचे जर्मनीत संस्कृत



डॉ भाउ दाजी लाड.

जन्म १८२४ ] [ मृत्यु १८७४ ई

ग्रंथांची व ग्रंथकारांची सूची दिली आहे. त्यांत खालीं लिहिलेल्या ग्रंथाचें कर्तृत्व हेमाद्रीकडे दिलें आहे.

१ चतुर्वर्गचिंतामणि, २ कालनिर्णय, ३ कालनिर्णय संक्षेप ४ तिथिनिर्णय, ५ कैवल्यदीपिका ( श्रीवोपदेवाच्या मुक्ताफल ग्रंथावरील टीका ) ६ आयुर्वेद रसायण ( अष्टांग हृदयावरील टीका ), ७ दानवाक्यावलि, ८ पर्जन्यप्रयोग, ९ प्रतिष्ठा, १० लक्षणसमुच्चय, ११ हेमाद्रिनिबंध, १२ त्रिस्थलविधि, १४ अर्थकांड,

यांपैकीं वरेच ग्रंथ उपलब्ध नाहींत, व श्रीवोपदेवानें "हरिलीला" नांवाचा ग्रंथ लिहिला आहे त्यावर हेमाद्रीनें लिहिलेली टीका सुप्रसिद्ध असून तिचा वरील यादींत उल्लेख नाहीं यावरून आफ्रेट साहेबानें हेमाद्रीच्या ग्रंथाबद्दल दिलेली यादी अपूर्ण असावी असें दिसतें.

## चतुर्वर्गचिंतामणि.

हेमाद्रीचा ' चतुर्वर्गचिंतामणि ' हा ग्रंथ विस्तारानें महाभारताइतका प्रचंड असून हिंदूच्या धार्मिक बाबतींत तो अद्याप आधारभूत व सर्वमान्य गणला जातो. एवढा प्रचंड ग्रंथ राजाश्रयावांचून रचला जाणें अशक्य होय. देवगिरीच्या यादवराजयगण्यांत सिंघण अथवा सिंहण हा मोठा पराक्रमी राजा (इ. स. १२१० ते १२४७) होऊन गेला. त्याचे दोनही मुलगे कृष्ण उर्फ कान्हेर, आणि महादेव हे आपल्या बापाप्रमाणें पराक्रमी असून त्यांची धर्माकडे प्रवृत्ति होती. चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथांतील व्रतखंडामध्यें दिलेल्या राजप्रशस्तींत

कृष्णदेव ऊर्फ कान्हेर यानें हिंदुधर्मास प्राप्त झालेली ग्लानि अथवा क्षीणता नाहींशी करून त्याचें पुनरुज्जीवन केल्याचा उल्लेख आहे

येनानेकमहाध्वरतुरता सवर्ध्यमानोऽनिशम् ।
क्षीणः कालवशात्पुनस्तरुणता धर्मोऽपि सम्पादितः ॥

कृष्णदेवानें अनेक यज्ञयाग करून क्षीणत्व पावलेल्या हिंदुधर्मास पुन्हा ऊर्जितावस्थेस आणलें, असा वरील उद्धृत केलेल्या श्लोकाचा सारांश आहे या ग्रंथाच्या प्रत्येक अध्यायाचे शेवटीं दिलेल्या कोलोफोन ( समाप्तिसूचक वाक्यांत ) मध्यें 'महाराजाधिराज महादेव' यांचें नांव प्रामुख्यानें दिलें आहे, त्यावरून यादवराजा महादेव याचे राजवटींत हा ग्रंथ त्याचे आश्रयाखालीं रचला गेला असें दिसतें श्रीवोपदेवानें आपल्या ' मुक्ताफल ' ग्रंथाच्या आरंभीं व शेवटीं ह्या ग्रंथाचा आदरपूर्वक उल्लेख केला आहे

ह्या ग्रंथाचे मुख्य चार भाग असून प्रत्येक भागास ' खंड ' असें ह्मटलें आहे ह्या ग्रंथास 'परिशेष' म्हणून परिशेष नांवाचें पांचवें खंड जोडलें आहे त्याचे आणखी चार पोटभाग आहेत (१) व्रतखंड, या खंडांत, श्रुति, स्मृति, इतिहास व पुराण ह्यांचे आधारानें हिंदूंचा नित्यनैमित्तिक व्रत, अनुष्ठानें, उपोषण, इत्यादिकांचें सांगोपांग वर्णन केलें आहे पुत्रप्राप्ति, अर्थप्राप्ति, व इतर इष्टफल प्राप्तिसाठीं, अनेक उपास्यदेवतांची आराधना करून त्यांचे उपशमन करण्याच्या हेतूनें वरील ग्रंथांत अनेक दैनिक, मासिक, पार्वणिक व्रतें निर्दिष्ट केलीं असून त्यांचें विस्तारानें विवेचन केलें आहे तसेंच, गर्भाधान, पुंसवन, नामकरण, उपनयन, विवाह वगैरे हिंदूंच्या सोळा संस्कारांचे यथासांग विवरण केलें आहे सारांश हिंदूंच्या नित्यनैमित्तिक धार्मिक आचारांचा

हा ग्रंथ हिंदुधर्मविषयक ज्ञानकोशच (Encyclo-pædia) होय असें म्हटलें असता अतिशयोक्ति होणार नाही ( २ ) **दानखंड;** यात धर्मदृष्ट्या ज्या दानाचें माहात्म्य मानलें जातें व जीं दानें केली असता प्राप्त झालेल्या व भावी सत्कृत्यांचें व क्लेशाचें निराकरण होतें अशी धार्मिक समजूत आहे त्याचें विस्तृत व सागोपाग वर्णन दिलें आहे. जसें, दानाची प्रशंसा, दानाचें लक्षण, दान करणारे व दान घेणारे याच्या पात्रापात्रतेचा विचार, दान करण्यास योग्यायोग्य काल, दान देण्यास कोणते नियम योग्य वगैरे. या **दानखंडांत** भागवतपुराणातील बरेच उतारे दिले आहेत व दान घ्यावयास योग्य अशा वस्तूंच्या यादींत **'भागवत पुराणा'**चा समावेश केला आहे. **वैष्णवभागवतपुराण** ग्रंथाचें दान करणें अत्यंत फलदायक आहे असे हेमाद्रींनें म्हटलें आहे. ( ३ ) **तीर्थखंड**, या भागात भरतवर्षांतील अनेक तीर्थांचें व पवित्र क्षेत्राचें वर्णन दिलें आहे या खंडाची हस्तलिखित अगर छापील प्रत उपलब्ध नसल्यामुळें तत्कालीन तीर्थस्थलांची यादी व त्यांचें ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्व ह्याबद्दल कांहीएक माहिती देता येत नाहीं. ( ४ ) **मोक्षखंड**, यात मुक्तीचा मार्ग स्पष्ट करून सांगितला आहे. तीर्थखंडाप्रमाणेंच या खंडाची हस्तलिखित अगर छापील प्रत उपलब्ध नसल्यामुळें त्यातील अमूल्य माहिती देता येत नाहीं ( ५ ) पुरवणी अथवा **परिशेष खंड**, याचे चार पोटभाग केले आहेत व त्यात अनेक धार्मिक विषयांचें विस्तृत विवेचन केलें आहे

पोटभाग (१) यात अनेक उपास्यदेवता व दैवतें यांचें वर्णन दिलें आहे. पोटभाग (२) यात श्राद्धें किंवा पितृपिंडोदक क्रिया यांचे विविधप्रकार सांगितले आहेत. पोटभाग (३) यात धार्मिक व नित्य नैमित्तिक कर्में करण्यास योग्य ऋतु व काल कोणते याचा निर्णय

केला आहे व पोटभाग (४) यांत अनेक प्रायश्चित्तांचें वर्णन देऊन, नानातऱ्हेच्या दोषांचें अगर पापांचें निरसन होईल असे उपाय सांगितले आहेत

वाचकांच्या सोयीसाठीं या भागाचे अखेरीस व्रतखंडांतील व्रतांची व त्यांत उल्लेखिलेल्या श्रुति, स्मृति, पुराणें वगैरे ग्रंथांची सगतवार जंत्री दिली आहे.

'चतुर्वर्गचिंतामणि' हा ग्रंथ मीमांसा व धर्मशास्त्र या दृष्टींनीं फार महत्त्वाचा आ[illegible] श्रुति, स्मृति, इतिहास व पुराणें ह्यांतील सकृद्दर्शनी परस्परविरोधी दिसणाऱ्या वाक्यांचा मीमांसाशास्त्रास अनुसरून समन्वय करण्यांत हेमाद्रीनें बरेंच कौशल्य दाखविलें आहे यामुळें मीमांसाकार या नात्यानें त्याचा नंबर बराच वर लागेल. हिंदुधर्मशास्त्रांतील दायभाग, दत्तकप्रकरण, स्त्रीधन,प्रायश्चित्त प्रकरण वगैरे बाबतींत निरनिराळ्या धर्मशास्त्रकारांचा देशकाल भेदामुळें बराच मतभेद पडतो, सदरील बाबतींत साधार व युक्तिवादास अनुसरून आपलें मत देऊन गुंतागुंतीचे प्रश्न सोडविण्याचे कामीं हेमाद्रीनें बरीच मदत केली आहे दत्तकमीमांसाकार व हेमाद्री ह्या उभयतांचे दरम्यान धर्मशास्त्रांतील काहीं महत्त्वाचे बाबतींत मतभेद आहेत धर्मशास्त्रांत केवल व द्व्यामुष्यायण अशा दोन प्रकारच्या दत्तकपुत्रांचा निर्देश केला आहे बिनशर्त दत्तक दिलेल्या पुत्रास केवल अशी संज्ञा आहे जनकबापाचे मिळकतीवर हक्क ठेऊन कांहीं शर्तीवर दत्तक दिलेल्या पुत्रास द्व्यामुष्यायण अशी संज्ञा आहे पार्वण व एकोद्दिष्ट श्राद्धकरतेवेळीं सपिंडीकरणाचे बाबतींत त्यास कोणते हक्क प्राप्त होतात याबद्दल धर्मशास्त्रकारांमध्यें मोठा वाद आहे हेमाद्रीनें याबाबतींत दिलेलें मत बऱ्याच धर्मशास्त्रकारांना संमत आहे द्व्यामुष्यायणपुत्र घेण्याची रूढि फार वर्षांपासून बंद पडली असल्यामुळें या वादाचें महत्व

आता फारसे उरले नाही मात्र विवाह,रिक्थ,व अशौच या प्रकरणाशी माधिद्याचा निकट संबंध असल्यामुळे, सदरील विषय धर्मशास्त्रात फार महत्वाचा गणला जातो कमलाकरानें आपल्या निर्णयसिंधु ग्रंथात **हेमाद्रीचा** ५१० वेळा उल्लेख केला आहे.

मदनपारिजात, द्वैतनिर्णय, वैजयन्ती, निर्णयसिंधु, संस्कारकौस्तुभ वगैरे ग्रंथात चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथाचा उल्लेख करण्यात आला आहे मीमांसाकार व धर्मशास्त्रकार या नात्यानें या दोनही शास्त्रात हेमाद्रीनें आपलें नाव अजरामर करून ठेविलें आहे

चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथात १ आचार ( रूढि अथवा वहिवाट ) २ व्यवहार (दिवाणी व फौजदारी कायद्याचा ऊटापोट) ३ प्रायश्चित्त वगैरे ( दंड ) ४ (इष्टापूर्ति नैमित्तिक कृत्यें दान वगैरे) ५ अध्यात्मिकविद्या, वगैरे विषयाचा समावेश करण्यात आला आहे असे पूर्वी लिहिलें आहे, हेमाद्रीच्यापूर्वी वरील विषयावर बरेच ग्रंथ लिहिले गेले होते, परंतु, विस्ताराच्या व विद्वत्ताप्रचुरतेच्या दृष्टीने त्यापैकी एकहि ग्रंथ चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथाच्या बरोबरीस येणार नाही, असे बऱ्याच विद्वानाचे मत आहे, परिशेषखंड या भागाचे श्राद्धखंड, कालखंड, प्रतिष्ठाखंड असे विभाग केलेले आहेत **हेमाद्री** व **माधवाचार्य** या उभयतास धर्मशास्त्राचे स्तंभ असे मानण्यात येते जैमिनी मीमांसाग्रंथाचा ज्यानें अभ्यास केला असेल त्यास हेमाद्रीचे ग्रंथ समजण्यास अडचण पडणार नाही हेमाद्रीनें तैत्तिरीय शाखेच्या ब्राह्मण ग्रंथातील व अथर्ववेदाच्या गोपथ ब्राह्मण ग्रंथातील बरेच उतारे चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथात दिले आहेत त्याप्रमाणेच पुढे नमूद केलेल्या सूत्रातून हेमाद्रीनें सदरील ग्रंथात बरेच उतारे दिले आहेत ते ग्रंथ येणेप्रमाणें — शुक्लयजुर्वेदाच्या वाजसनेयशाखेतील कात्यायन अथवा कातीसूत्र, मैत्रायणीयकटसूत्र, मानवमैत्रायणीयसूत्र,

आपस्तंभसूत्र, बौधायनसूत्र, आश्वलायनसूत्र, शौनकसूत्र, कपोलाद-सूत्र, कौशिकप्रणितश्राद्धकल्पसूत्र, वैखानसगृह्यसूत्र, शौनकगृह्यसूत्र, सांख्यायनगृह्यसूत्र, छांदोग्यपरिशिष्ट, वाजसनेय परिशिष्ट, राणायनीय-सूत्र, पारस्करगृह्यसूत्र, चरणव्यूहसूत्र, व चार वेदांतील इतर सूत्रें

मैत्रायणीयसूत्रांतील उतारे बऱ्याच प्रमाणांत असल्याचें आढळून येतें, याचें कारण हेमाद्रीनें ज्याठिकाणीं चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथ लिहिला त्या देवगिरीनगरींत व तिच्या आसपासच्या प्रदेशांत मैत्रायणी ब्राह्मणाची वस्ति फार होती व अद्यापिहि सदरील शाखेच्या ब्राह्मणांची वस्ति सदरील ठिकाणीं बऱ्याच प्रमाणांत असल्याचें आढळून येतें

शौनक, पिप्पलाद आणि कौशिक हीं सूत्रें अथर्ववेदापैकीं आहेत हेमाद्रीच्या या प्रचंड ग्रंथांत कल्पसूत्रावरील टीकाकार देवस्वामी, धूर्तस्वामी, कर्कोपाध्याय, जयंतस्वामी, अपरार्क, विश्वरूप, हरिहर, वामदेव, गोविंदोपाध्याय, श्रग्धर ऊर्फ श्रग्श्रीधर वगैरे विद्वानांचा उल्लेख वारंवार करण्यांत आला आहे पैकीं देव स्वामी ह्यानें बाद्धायन सूत्रावर आणि आश्वलायन गृह्यसूत्रावर टीका लिहिल्या आहे धूर्तस्वामीनें जयस्तंभ सूत्रावर टीका लिहिली आहे कर्कोपाध्याय यानें कातिय ऊर्फ कात्यायन सूत्रावर, व जैमिनीच्या पूर्वमीमांसेच्या धर्तीवर बहारींची टीका लिहिली आहे सदरील ग्रंथ जर्मन देशांत प्रसिद्ध झाला आहे कर्कोपाध्यायाचीं मतें उद्धृत करून आपलीं मतें कोणकोणत्या बाबतींत भिन्न आहेत यांचा निर्देश हेमाद्रीनें बऱ्याच ठिकाणीं केला आहे जयंतस्वामी यानें आश्वलायन गृह्यसूत्रावर टीका लिहिली आहे मनुस्मृतीचा टीकाकार मेधातिथी ह्याचा जागोजाग उल्लेख करण्यांत आला आहे मेधातिथी हा कुमारीलभट्टाचे ग्रंथांतील उतारे देतो यावरून तो कुमारीलभट्टाच्या मागून झाला असावा असें दिसतें

विश्वरूप यानें याज्ञवल्क्यस्मृतीवर टीका केली आहे व तो विज्ञानेश्वरापूर्वी होऊन गेला असावा असें दिसतें. कारण विश्वरूपाची टीका फार क्लिष्ट आहे असें विज्ञानेश्वरानें आपल्या ग्रंथांत विधान केलें आहे. विश्वरूपानें श्रीशंकराचार्यांच्या अद्वैत मतांवर टीका केली आहे यावरून तो श्रीशंकराचार्यांच्या पश्चात् व विज्ञानेश्वराच्या अगोदर झाला असावा. चतुर्वर्गचिंतामणिग्रंथांत ज्या पुराणांचा व उपपुराणांचा उल्लेख केला आहे, त्यांतील बरेच ग्रंथ आजमितीस उपलब्ध नाहींत.

हेमाद्रीनें **व्यवहार** ह्याविषयाचा संक्षिप्त रितीनें उहापोह केला आहे. परिशेषखंडांतील एका भागांत दाय, रिक्थ, संविभाग ह्या शब्दांच्या व्याख्या दिल्या आहेत तसेंच ब्राम्हणांच्या व इतर वर्णांतील लोकांच्या मालमत्तेच्या हकासंबंधानें व स्त्रीधनासंबंधानें संक्षिप्त रितीनें उहापोह केला आहे. यामुळें हेमाद्रीची प्रख्यात धर्मशास्त्रकारांत गणना केली जात आहे.

श्री वोपदेवानें आपल्या **मुक्ताफल** ग्रंथाच्या आरंभी हेमाद्रीसंबंधानें दिलेल्या श्लोकांत **चतुर्वर्गचिंतामणि** ग्रंथासंबंधानें खालीं लिहिल्याप्रमाणें उल्लेख केला आहे.

विष्णुर्मर्त्ये चतुर्वर्गचिंतामण्यामजीगणत् ।
भेदान् व्रतानां दानानां तीर्थानां मोक्षधर्मिनाम् ।
मूर्तिमान्नादपूजानां हेमाद्रिर्गणकाग्रणीः ।
विष्णुभक्ताङ्गभक्तानां गणयन्मुक्तमारयोः ॥
मुक्ताफलेन ग्रंथेन सद्भागवत-मुक्तिना ।
भक्तिस्यान्यन्मुनामुग्धमार्कण्डेय निशुधिया ॥

मुक्ताफलं सुप्रचितस्फुटभक्तिभेद-
प्रत्यक्षराजितलसत्पद-पद्मरागम् ।
हेमाद्रिसम्भवसुवर्णनिवेशरम्यं,
कण्ठे कुरुध्वमवबन्धमपूर्वलक्ष्मीम् ॥

या श्लोकांपैकीं पहिल्या श्लोकांत हेमाद्रीनें आपलें उपास्यदैवत विष्णु ह्यास प्रसन्न करण्याकरितां चतुर्वर्गचिंतामणि नांवाचा विद्वन्मान्य ग्रंथ रचून त्यांत व्रत, दान, मोक्ष, व तीर्थ ह्यांतील सूक्ष्म भेदांचें वर्णन केलें आहे असें म्हटलें आहे. दुसऱ्या श्लोकांत हेमाद्री हा श्रीविष्णुच्या भक्तांत परम श्रेष्ठ असून त्याचे गुणवर्णन करण्यांत तो नेहमीं मग्न असतो असें म्हटलें आहे. ह्याच श्लोकात त्यास **गणकाग्रणी** असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ असा कीं, राज्यातील द्रव्यभांडाराचे जमाखर्चाचे खर्डे तयार करण्यांत त्याचा हातखंडा होता म्हणजे तो उत्तम दर्जाचा फडणीस होता. याच श्लोकांत मूर्ति, इमारती व उपासना यांच्या सूक्ष्म भेदाचें अथवा प्रकाराचें हेमाद्रीनें जागोजाग विवेचन केलें आहे असें म्हटलें आहे. यावरून इमारती विशिष्ट प्रकारानें रचण्याची कल्पना त्यानें काढली या विधानास पुष्टि मिळते. तिसऱ्या व चौथ्या श्लोकांत भक्तिरसानें ओथंबलेल्या श्रीमद्-भागवत ग्रंथांतील समर्पक सुंदर-स्थळें ऊर्फ मोत्यें (मुक्ताफलें) या ग्रंथात दिली असून त्याचें श्रेय हेमाद्रीला देण्यांत आलें आहे व तें देतांना मोत्यांचे शिंपले व त्यांत निर्माण होणारी मोतीं व सुवर्णमय मेरु पर्वत ह्याचें रुपक करून हेमाद्रीच्या विद्वत्तेचा मोठ्या मार्मिक रीतीनें गौरव केला आहे मुक्ताफल ग्रंथावर हेमाद्रीच्या लिहिलेल्या टीकेंत हेमाद्रीच्या आंगची विद्वत्ता व वादग्रस्त मुद्यावर समतोल व युक्तिवादास

धरून टीका करण्याची शैली जागोजाग दिसून येते. मम्मट, अभिनवगुप्त, हेमचंद्र वगैरे विद्वान लोकांचा या टीकेंत उल्लेख केलेला आढळतो.

**गणकाग्रणी** या विशेषणावरून **करणाधिप** या हुद्याच्या एका विशिष्ट अंगाचा खुलासा होतो. यादवांच्या राजवटींत करणाधिपाकडे फडणविसाची कामगिरी सोंपविण्यांत येत असे ही गोष्ट यावरून सिद्ध होते. **मुक्ताफल** ग्रंथावर हेमाद्रीनें **कैवल्यदीपिका** नांवाची टीका लिहिली आहे तिचे अखेरच्या कोलोफोनांत खालीं लिहिलेला मजकूर आहे:—

" इति श्रीमत्प्रौढप्रतापचक्रवर्ति–महाराजाधिराजसोमयदुवंशोद्भव रामराजमन्त्रिवर्यहेमाद्रिविरचितामुक्ताफलटीका समाप्ता "

यावरून रामदेवराव यादव गादीवर बसल्यानंतर हेमाद्रीकडे ग्य मंत्र्याचे काम कांहीं काल तरी असावें असें सिद्ध होतें. यावाय मुक्ताफल ग्रंथाच्या उपसंहाराच्या अखेरच्या श्लोकांत तत्कान देवगिरीचा राजा रामदेवराव याची श्रीवोपदेवानें प्रशंसा केली है. त्यावरून, श्रीवोपदेव व हेमाद्री हे समकालीन असून रामदेवाच्या राजवटींत त्यांची गणना थोर विद्वानांत केली जात होती ं दिसतें. तो श्लोक येणेंप्रमाणें —

सकलविबुधमानः श्रीनिकेतं यदास्य ।
समदविबुधसिंहः श्रीनिधामांभ्रिस्नेहः ॥
जयति विनयसिन्धुर्धामनेशः सुबन्धु ।
प्रणत-सकलभूपः कृष्णवंशैकदीपः ॥

यांत वर्णन केलेला कृष्णवंशांतील ऊर्फ यदुवंशांतील कुलदीपक ल्कीन रामदेवरावराजावांचून दुसरा कोण असणार !!

कैवल्यदीपिकेच्या शेवटच्या पाच श्लोकांत हेमाद्रीनें श्रीवोपदेवाच्या बुद्धिमत्तेचें वर्णन केलें असून, त्याच्या मुक्ताफल ग्रंथावर आपण टीका लिहिल्याचें कबूल केलें आहे व तो कामराजाचे घरीं राहून आपण पुरी केल्याचें म्हटलें आहे. यावरून हेमाद्री व वोपदेव या उभयतांचे परस्पर संबंध निकट होते असें दिसतें. मुक्ताफल ग्रंथावरून हेमाद्रीच्या चरित्रावर बराच प्रकाश पडतो. या ग्रंथांत श्रीमद्भागवताचें सार विशिष्ट पद्धतीनें केलें असल्यामुळें व त्यांतील काव्य उच्च दर्जाचें असल्यामुळें, तो विद्वान लोकांच्या आदरास पात्र झाला. कैवल्यदीपिका टीका समाप्त होईपर्यंत तरी हेमाद्री व रामदेवराव यांचे परस्पर संबंध सलोख्याचे असावे असें सदरील ग्रंथाच्या अखेरच्या कोलोफोनवरून स्पष्ट दिसतें. या सोम-यदुवंशीय रामदेवराव यादवाच्या राजवटींत यदुकुलावतंस श्रीकृष्णाची लीला व चरित्र वर्णन करणाऱ्या ग्रंथकाराचा मग ते सनातन वैदिक असोत अगर अवैदिक असोत याचा सारखा गौरव होत असे.

व्रतखंडांत उल्लेखिलेल्या पुराणांची व त्यांतील व्रतवैकल्यांची पुढें यादी दिली आहे. त्यावरून सुमारें सहाशें वर्षांपूर्वी कोणकोणतीं व्रतें प्रचलित होतीं त्याची कल्पना करतां येते. सदरील व्रतांपैकीं बरींच व्रतें आपल्या प्रांतांत हल्लीं रूढ नाहींत असें दिसतें. तथापि मंगलागौरीव्रत, होलिकोत्सवविधि, श्रावणीकाव्रतम्, कौमुदीमहोत्सव (कोजागरीपूर्णिमा), सावित्रीव्रतम् वगैरे अनेक व्रतें अद्यापि प्रचारांत आहेत. चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथांत श्रुति, स्मृति, पुराणें वगैरे

नानाग्रथातून समर्थक उतारे दिले आहेत यावरून हेमाद्रीचा विद्याव्यासग केवढा दाडगा होता याची वरीच कल्पना होते.

**चतुर्वर्गचिंतामणि** ग्रथाचे तीर्थखड व मोक्षखड असे दोन भाग अद्यापि छापलेले नसावेत असें दिसतें. तीर्थखंडाची हस्तलिखित प्रत मिळविण्याचा प्रस्तुत लेखकानें वराच प्रयत्न केला परंतु त्याकामीं त्यास यश आलें नाहीं. सदरील खंडावरून सुमारें सहाशें वर्षांपूर्वी भरतखडात कोणती तीर्थें अस्तित्वात होतीं, याबद्दलची साधार माहिती मिळण्याचा सभव आहे

**चतुर्वर्गचिंतामणि** ग्रथाच्या सर्व खडांनीं अत्यत सक्षिप्तरूपानें आतापर्यंत माहिती दिली आहे. तेवढ्यावरूनही हेमाद्रीच्या बुद्धिमत्तेची व विविध शास्त्रासबधीं त्यानें सपादिलेल्या प्राविण्याची थोडीबहुत कल्पना वाचकास झाल्यावाचून राहणार नाहीं.

## आयुर्वेद रसायन.

वाग्भटाच्या अष्टांगहृदय ग्रथावर "आयुर्वेद रसायन" नावाची टीका हेमाद्रीनें केली असून त्यात टीकाकार हेमाद्री हा 'चतुर्वर्गचिंतामणिचा' कर्ता व रामदेवरावाचा करणाधिप होता असें म्हटलें आहे. कै० अण्णा कुंटे यानी अष्टागहृदयग्रथ अरणदत्ताच्या टीकेसह फार वर्षांपूर्वी प्रसिद्ध केला आहे. वाग्भटाचा कालनिर्णय करताना अण्णासाहेब कुंटे यानीं २२ प्रमाणें दिलीं आहेत त्यात अष्टागहृदय ग्रथातील सूत्रस्थान व कल्पस्थान या प्रकरणावर हेमाद्रीनें भाष्य लिहिल्याचें म्हटलें आहे. अष्टागहृदयावर अरणदत्तानें लिहिलेल्या टीकेंत हेमाद्रीच्या नावाचा उल्लेख केल्याचें दिसून येत नाही. हेमाद्रीच्या प्रेरणेनें व त्याच्या

आश्रयाखाली त्याच्या तत्कालिन विद्वान वैद्यानें आयुर्वेदरसायन नावाची टीका लिहिली असावी अशा कल्पना केल्यास ती अस्थानी होणार नाहीं

## कैवल्यदीपिका टीका

श्रीवोपदेव हा हेमाद्रीचा समकालीन होता त्यानें मुक्ताफल या नावाचा पद्यात्मक ग्रंथ रचून त्यात श्रीमद्भागवताचे सार पद्धतशीर दिलें आहे श्रीमद्भागवत हा ग्रंथ भक्तिरसप्रधान असून परमेश्वराशीं सायुज्यता संपादण्यास नवविधा भक्तिसारखें दुसरें उत्तम साधन नाहीं, असें त्यात प्रतिपादन केलें आहे श्रीमद्भागवतांतील उत्तम तत्त्वें साररूपानें एकेठिकाणी केलेलीं असल्यामुळे त्यास 'मुक्ताफल' (श्रीभागवतातील मोत्यें) असें यथार्थ नाव वोपदेवानें दिलें आहे या ग्रंथाचे एकोणीस अध्याय असून त्यांचें वर्गीकरण शृंगार, वीर, करुण वगैरे नवरसांच्या अनुरोधानें केलें आहे सदरहू ग्रंथावर हेमाद्रीनें " कैवल्यदीपिका " नावाची विद्वत्ताप्रचुर टीका लिहिली आहे आपला आश्रित व समकालीन याचे ग्रंथावर हेमाद्रीसारख्या थोर विद्वानानें टीका लिहावी ही गोष्ट सकृतदर्शनी जमळ विलक्षण दिसते परंतु स्वत ग्रंथ लिहून त्यावर त्याच ग्रंथकारानें आपलें भाष्य अगर वार्तिक लिहिल्याची उदाहरणें या देशात सापडतात ' मुक्ताफल ' हा ग्रंथ श्रीमद्भागवतग्रंथाचे सार असून हेमाद्री हा स्वत भागवतधर्माचा कट्टा अनुयायी होता यामुळें पारमार्थिक दृष्टीनें त्यानें सदरील ग्रंथावर टीका लिहिण्याचें मनावर घेतलें असावें मुक्ताफल ग्रंथाच्या अखेरीस वोपदेवानें 'ग्रंथोपसंहार' या सदराखाली हेमाद्रीची प्रशंसा केली आहे व त्यात श्लेष साधून राम चंद्रराव यादवराजाची तुलना दाशरथी रामाबरोबर केली आहे हा

उपसंहार ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाचा आहे. कारण त्यावरून हेमाद्री व बोपदेव हे देवगिरीचे रामदेवराजाचे पदरीं होते असें निखालस दिसतें. शिवाय रामदेवराव यादवाची दाशरथी रामाबरोबर तुलना करण्यांत रामदेवराव यादव हा आपल्या प्रजेचें पालन श्रीरामचंद्राप्रमाणें करीत होता असें ध्वनित केलें आहे. यावरून ज्ञानेश्वर महाराजांनीं रामदेवराव आपल्या प्रजेचें पालन न्यायानें करीत होता असें ज्ञानेश्वरीच्या अखेरीस म्हटलें आहे त्या विधानास बोपदेवाच्या उपसंहारानें जोर मिळतो. बोपदेवानें हेमाद्रीच्या प्रशंसापर जे श्लोक लिहिले आहेत ते येणेंप्रमाणें:---

> चतुरेण चतुर्वर्गचिन्तामणिविणिज्यया ।
> हेमाद्रिणार्जितं मुक्ताफलं पश्यत कौतुकात् ॥
> निर्मथ्य पयसांराशिमन्दरः कौस्तुभं न्यधात् ।
> हेमाद्रिर्वचसां मुक्ताफलं रत्नं हरिप्रभोः ॥
> हेमाद्रिमाद्रियत एव गुणेन येन
> तेनैव पूरितसुखेन सुखत्यमेतत् ।
> मुक्ताफलं प्रतिफलज्जगदीशरूपं
> यत्कर्णकंठकुहरे सुषमास्य काचित ॥
> हे एव चित्रं रामस्य सिन्धुर्बद्धः पुराधुना ।
> हेमाद्रिः स्वमुपानीतः सुर्यावर्त प्रदक्षिणः ॥
> विद्वद्धनेश-शिष्येण भिषक् केशव सुनुना ।
> हेमाद्रिर्बोपदेवेन मुक्ताफलमचीकरत् ॥

हेमाद्रीच्या ग्रंथाची वर यादी दिली आहे. त्यांपैकीं बरेच ग्रंथ उपलब्ध नाहींत हेमाद्रिनिबंध या नांवाचा ग्रंथ हेमाद्रीनें लिहिला होता असें म्हणतात खाजगी व दरबारी पत्रें कशीं लिहावीं याबद्दलचे नमुने यांत नमूद केलेले आहेत. व या दृष्टीनें तो महत्वाचा आहे.

परंतु या ग्रंथाच्या अंतर्गत पुराव्यावरून हा ग्रंथ बराच अर्वाचीन असावा असें दिसतें. हेमाद्री हा मराठी भाषेचा पुरस्कर्ता होता व त्यानें देवगिरीच्या दरबारात मराठी भाषेचा प्रवेश करविला असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे. परंतु त्यानें स्वतः लिहिलेला अगर दुसऱ्याकडून लिहिविलेला एकही ग्रंथ उपलब्ध नसावा हें महाराष्ट्राचें दुर्दैव होय! त्यानें कांहीं मेस्तके तयार केलीं यांत शंका नाहीं मुक्ताफल ग्रंथांत बोपदेवानें हेमाद्रीस **गणकाग्रणी** अशा संज्ञेनें संबोधिलें आहे. खुद्द हेमाद्रीनें आपल्या टीकेंत या पदाचा अर्थ केला आहे तो असा — **गणकाग्रणी** ह्मणजे देशकोषयो रायव्ययौ लिखतु, अग्रणी मुख्य (राज्याचे खजिन्याच्या जमाखर्चाची लिखाणें तयार करण्यांत वाकबगार). यावरून हेमाद्रीनें देवगिरीच्या राजाच्या दिवाणगिरीवर असतांना मोठ्या प्रमाणावर जमाखर्चाचे खंड तयार केले असले पाहिजेत. परंतु पुराव्याच्या अभावीं निव्वळ कल्पनेवर हवाला देणें इतिहास लिहिणाऱ्याच्यादृष्टीनें वाजवी होणार नाहीं

पंडित भगवानलाल इन्द्राजित यांच्या हस्तलिखित संस्कृतग्रंथ समहांत बोपदेवाच्या "हरिलीला" ग्रंथाची एक अर्धवट प्रत आहे त्यावरून सदरील ग्रंथावर हेमाद्रीनें विवेक नावाची टीका लिहिली असें दिसतें मधुसूदनसरस्वती यानें सदरील टीका पूर्णतेस नेल्याबद्दलचा उल्लेख कांहीं ठिकाणीं केलेला आढळतो.

हरिलीलाविवेकोय कामराजस्य वेश्मनि ।
षट्कैरचयाकार तुष्ट्यै हेमाद्रिणांसताम् ॥
. .......... . .......... ....................
सरस्वती श्रीमधुसूदनन निर्व्यूढमेतद्बुधमोदनेन ।
जन समस्तोऽपि रमायनेन मजेशभक्तिं ग्रजतादनेन ॥

चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथाच्या व्रतखंडात नमूद केलेल्या पुराणांची व व्रतवैकल्याची जंत्री.

आदिपुराण...... ..( युगादि विधि, ) प्रदोषविधि
आदित्यपुराण .....( शयनमासनविधि, सुरसुप्रव्रत, पुत्रोत्पत्ति, वनयात्रा महोत्सव )
कालिकापुराण... ..(चतुर्दशी जागरव्रत, इशातव्रत, कालरात्रीव्रत, महाव्रत )
कालोत्तरपुराण . . ( अनंगव्रत, प्रतिमाव्रत, भूमिव्रत, देवव्रत, सूर्यव्रत, सोमाय व कृष्णचतुर्दशीव्रत, शिवव्रतम्, विधिनक्षत्र व पारव्रताम ( शिवव्रत ).
कूर्मपुराण... ......( यमव्रत, कृष्णचतुर्दशी, अमावास्याव्रतम् )
गर्गपुराण....... ...( नक्षत्र होमविधी ).
गारुडपुराण ... ...( गायत्रीव्रत, आयुर्व्रत कांचनपूजन (प्रकिर्णक व्रतानि)
देवीपुराण... . ....( पुत्रप्राप्तिव्रत, मंगलाव्रतम्, रथयात्रा, दमनकपूजा-विधि, उमामहेश्वरव्रतं, शंकरनारायणव्रत, गोयुग्म-व्रतम्, गोरत्नव्रतम्, नक्षत्राभंव्रतं, संक्रान्तिव्रतानि, देवीव्रत ( कृच्छ्रव्रतापर्की ); नंद व्रतम् सामव्रतम्, देवव्रतम्,
नरसिंहपुराण . ....(नरसिंहत्रयोदशी हरिव्रतम्, हरिविडायनम्, पाशव्रतम्.)
नारदीयपुराण .. . ( भीष्मपंचकव्रतम्, ध्यानिशतव्रतम्, कार्तिकमासव्रतम् माघमासव्रतानि )
नृसिंहपुराण.......( सौरनक्त व्रतम् )
पद्मपुराण.... .....( कामव्रत, भीष्मपंचकव्रतम् चंद्ररोहिणीशयनव्रतम्, देवीव्रतम्. )
पद्मपुराण ...... . (द्वादशव्रतम्, अमावास्य पयोव्रतं, दूर्वा विरात्रव्रतम्, धर्मत्रि-रात्रव्रतम्, रंभाव्रतम् मंगलसंदायनव्रत, आदित्यशयन व्रतम्. ब्रह्मनारदत्रीवद रोहिणीव्रतं कान्तिव्रतम्.

सूर्यव्रतम्, स्नेहव्रतम्; शिवव्रतम्; फलव्रतम्, दैण्यव्रतम्:
वारिव्रतम्, मंगंधाव्रतम्; वैश्वानरव्रतम; शिवरहस्य:
अंगलातिकाव्रतम्; देवव्रतम्; सारस्वतव्रतम्; श्रद्धाव्रतम्'
कीर्तिव्रतम्, सामव्रतम्; अहिंसाव्रतम्; सुखव्रतं, नीलव्रतम्
प्राप्तिव्रतं, दिशीव्रत; शक्रव्रतम्; रुद्रव्रतम्: शंभूव्रतं
भूभाजनव्रतम्; प्राज्यापत्यव्रतम्; प्राज्यापतव्रतम्; इंदु-
व्रतम् भीमव्रतम्; चन्द्रव्रतम्; प्रभाव्रतम् ; ब्रह्मव्रतम्:
वसुव्रतम्; नदापदयव्रतम्; वरव्रतम्; वरुणव्रतम्; पर्व-
भूभाजनव्रतम्; धराव्रतम्, कल्पवृक्षव्रतम्; अश्वव्रतम्.
करिव्रतम्; करिष्यामि साधनम्. )

ब्रह्मांडपुराण .. .. (कश्यप नारद संवादे दशादित्यव्रतम्; कर्णव्रतम् अर्थ
श्रावणिकाव्रतम्; महोप्रस्थानं. )

ब्रह्मवैवर्तपुराणम्

भविष्यपुराणम् ( प्रदोषव्रत, कामत्रयोदशी, ईश्वरव्रतम्; सोमव्रतम् महा-
पौर्णमासिव्रतम्; शैवोपवासव्रतम्; शशीव्रतम् पितृव्रतम्;
महाफलव्रतम्; संभोगव्रतम्; शिवनक्तव्रतम्; रथयात्रो-
त्सवः सौम्यव्रतम्; सुखव्रतम्; अर्कव्रतम्; युगावतार-
व्रतम्: नंदाविधि, भद्राविधि, आदित्याधि; सुराविधि
दिवाकरव्रतम्; आदित्यशान्तिव्रत, नक्षत्र पूजाविधी. )

ब्रह्मपुराण ... ...( सूर्यव्रतम्; रविव्रतम्; चान्द्र यशव्रतम्; ( पौषव्रतापैकी )
ब्रह्मकृच्छ्रव्रत, )

भविष्योत्तरपुराण...( अनंगत्रयोदशी, यमदर्शनत्रयोदशी, दुर्गंधदौर्भाग्य
नाशन त्रयोदशी, सर्वमंगलात्रयोदशी;

भविष्योत्पुराणम्... ( मदनमहोत्सव, चतुर्दशीव्रत, पालिचतुर्दशी, कदली
श्रावणीकाव्रतम्; ब्रह्मकूर्चव्रतम्; चंद्रदर्श अष्टमीव्रत-
व्रतम्; जयपौर्णिमासिव्रतम्; वैशाखी कार्तिकी माघीविधी.
कृत्तिकाव्रतम्; होलिकोत्सव विधी, रक्षाबंधन पौर्णमासि-'
व्रतम्; पत्रघट पौर्णिमाव्रतम्; इन्द्रपौर्णमाधीव्रतम्;
संतानदव्रतम्, मदनमाविशीव्रतम्, अशोकानिराग्नव्रतम् )

भविष्यत्पुराण ... (योमव्रतम्; पर्वनक्तव्रतम्; सद्स्नानम् प्रतिकाभिषेका; वंध्याभिषेकाविधी.)

भविष्योत्तर पुराण ( जाति त्रिरात्रव्रतम्; वस्त्र त्रिरात्रव्रतम्; गोपादभिरात्रव्रतम्; कौमुदीमहोत्सव; भद्रचतुष्टयव्रतं; सदाव्रतंनाम्; अन्नदानमहात्म्य; दिपदानविधी; चंडिकाव्रतम्; आदित्यव्रतम्; सूर्यस्यवारे त्रिपुरसूदनव्रतं; रोगहाविधी; नंदाधिनवविधी; कामदानेवेश्याव्रत; संपूर्णव्रतम्; पुत्रव्रत; सप्तसुंदरव्रतम्; चंद्रनाक्षत्रशान्ति; भौमव्रतम्; बुध; गुरु; शुक्रव्रत; शनैश्चव्रतम्; दैनश्चारादिशान्ति; शाम्भरायणीव्रतं; योगव्रतम्; विश्वीव्रतम्; द्वितियभद्राव्रतं; पद्मव्रतम्; आन्दोलनविधी; कोकिलव्रतम्; धाराव्रतम्; गौराभे विक्रमव्रतम्; कृतात कल्याणविधी; कृत्तिकाव्रतम्; होलीकोत्सवविधी; रक्षाबंधनपौर्णिमासिव्रतम्; पद्मघट पौर्णिमाव्रत; इन्द्रापौर्णिमासिव्रतम्; संतानदव्रतम्; मन्त्रश्राविश्रान्तम्; गोपदाभिरात्रव्रतम्; अशोकात्रिरात्रीव्रतम्; जातित्रिरात्रव्रतम्, वस्त्रत्रिरात्रव्रतम्; कौमुदी महोत्सवा, भद्रचतुःष्टयव्रतम्; सदाव्रतम् नाम अन्नदान माहात्म्य; दीपदानविधीः चंडिकाव्रत आदित्यव्रतम्; सूर्यस्यवारे त्रिपुर सूदनव्रतम्; रोगहाविधी, नंदाधिमाविधी; कामदानिवेश्याव्रतम्; चंद्रनक्षत्रशान्ति )

मत्स्यपुराण.........(शिवचतुर्दशी, नवम्यादि उपासनव्रतम्, सूर्य नक्तव्रतम्, नक्षत्र पुरुषव्रतम्; चंद्रसूर्यउपरागस्नानं; अद्भुतशान्तिकानिव्रतानि. )

महाभारत पुराण...( व्रतम्; मन्तपो व्रतानि.)

याज्ञवल्क्य पुराण...(

वराहपुराण.........( त्र्योदशीव्रतः चतुःव्रत, मंधाद्व्रत, ध्वनिपव्रत, फाल्गुनविधीः )

वायुपुराण.........(

लिङ्गपुराण.........( शिवरात्रीव्रतमाहात्म्यं; मलव्यपोहनं पाशुपतव्रत; भवानिव्रतं; महाव्रतम्; जेष्टाव्रतम्; तीव्रव्रतं )

विष्णुधर्मपुराण......( वामदेवव्रतम्; नंदव्रतं; महेश्वरव्रतं; वायुव्रतम्; विह पक्षिव्रतं; यमव्रत; क्षेमव्रत; धनवाप्तिव्रतम्; सर्व काम; कामावाप्ति व्रतं; जयव्रतम्; सुव्रतम्; अशोकपूर्णिमाव्रतम्; लक्ष्मीनारायणव्रतम्; संवत्सरव्रतम्; महाव्रतम्; नदीव्रतम्; लोकव्रतम्; विष्णुव्रतम्; शैलव्रतम्; समुद्रव्रतम्; दिपव्रतम्; श्रीव्रत; पञ्चमूर्तीव्रत; गुणत्वाप्तिव्रतम्; ब्रह्मण्यप्राप्तिव्रतम्; धनावाप्तिव्रतम्; सर्वाप्तिव्रतं; चतुर्युगव्रतम्; देवमूर्तिव्रतम्; पितृव्रतम्; पातालव्रतम्; सप्तसागरव्रतम्; सप्तर्षिव्रतम्.)

विष्णुधर्मोत्तरम् ... (मनोरथपौर्णिमा, सौभाग्यव्रतम्; चंद्रव्रतम्; वरुणव्रतम्; दाम्कव्रतम्; ब्रह्मकूर्चव्रत; पुर्णिमाव्रतम् अदिमेध्यस्नानम्; सर्वकामाप्तिव्रतम्; शैवनक्षत्र पुरुषव्रतम्; भोगावाप्तिव्रतम्; धर्मावाप्तिव्रतम्; धनावाप्तिव्रतम्; आरोग्यव्रतम्; कार्तिकस्नानविधी; दाम्मूर्तिव्रतम्; शिवरथव्रतम्; ग्रहणोपवास दंत्तोत्पतीशांति. )

विष्णुधर्म ... ...( अश्विनीस्नान; शत्रुनाशनव्रतम्; कृत्तिकास्नान; रोहिणीस्नान; सुकलत्रप्राप्तिव्रतम्; पादोदकस्नानम्; शतभिषास्नानं, विष्णुपदव्रतम्; अनंतव्रतम्; रुपसत्रव्रतम्; निराञ्जनविधी; नवनक्षत्रशांति; सुजन्मावाप्तिव्रतम्; ज्ञानावाप्तिव्रतम्; लावण्याप्याप्तिव्रतम्; शिलावाप्तिव्रतम्; ( पौषव्रतानि ) विद्यावाप्तिव्रतम्; चातुर्मास्यव्रतानि; देवशयनोत्थानविधी; असिधाराव्रत; षदेवव्रतम्; सागरवृत्त च व्रतं; आयुधव्रतम्; विष्णुदेवभिव्रतम्; शौचमहाव्रतम्; त्रिविमाव्रतम्; नानाशुभफलानि, अनशनविधी; माहेश्वरस्थानविधि, नानास्नानविधी, )

विष्णुपुराण ...... ( पितृव्रत; वन्द्दीवंन; धृतिव्रतम्; )

विष्णुरहस्य …… ( त्रिविक्रमत्रिरात्रव्रतं; पवित्रारोपणविधि; कृष्णजन्मतानिवासोपवासव्रतम्. )

शिवधर्म … … ( कृष्णचतुर्दशीव्रत; गंधव्रत; शूलदानव्रत, शिवोपवितधर्म, अपरशैवमहाव्रतं, मौनव्रत; शिवलिङ्गव्रत; घृतस्नपनविधी. ).

शिवधर्मोत्तर……( कृष्णचतुर्दशीव्रत; उमामहेश्वरव्रत; अपर उमामहेश्वरव्रतम्; )

सौरधर्म………( सूर्यव्रत ).

सौरपुराण………( सर्वव्रत; कृष्णचतुर्दशी, पापमोचनव्रतम् ).

स्कंधपुराण ………( सोद्यापन शिवरात्रिव्रतम्; शिवयोग युक्त शिवरात्रीव्रतम्; महाराज्ञव्रतम्; महोत्सवव्रतम्; मौनव्रतोद्यापनम्; महालक्ष्मीव्रतम्; दशरथललिताव्रतम्; भौमवारव्रतम्; रोहिणीव्रतम्, धान्यसंक्रांतिव्रतम्; लवणसंक्रान्तिव्रतम्; रूपसंक्रांतिव्रतम्; तेजसंक्रांतिव्रत; सौभाग्य संक्रांतिव्रतम्; फलसंक्रांतिव्रतम्; धनसंक्रान्तिव्रतम्; आयुसंक्रांतिव्रतम्; आज्ञासंक्रांतिव्रतम्, कीर्तीसंक्रांतिव्रतम् विशोक संक्रांतिव्रतम्; महेशव्रतम्;

स्कंधमहाकाल खंड ( यमव्रत )



## देवगिरीच्या यादव राजघराण्याचा इतिहास

### भाग ३ रा.



आस्ते मण्डिनदण्डकापरिसरः श्रीसेउणाख्यः परं
देशः पेशलवेशभूषणवचोमाधुर्यधुर्याकृतिः ।
तस्मिन्देवगिरिः पुरी विजयते त्रैलोक्यसारश्रियां
विश्रान्तिः सुरशालिशैलशिखरस्पर्धिष्णुसौधावलि ।

देवगिरीचे अखेरचे यादवराजे महादेव व रामदेवराव यांच्या राजवटींत हेमाद्री करणाधिप असताना यादवाचे राज्याचा विस्तार फार वाढला होता. व ते आपणास सार्वभौम राजे ह्मणवून घेत असत. उत्तरेकडे नर्मदा, दक्षिणेस कावेरी, पश्चिमेस अरबी समुद्र, पूर्वेस विदर्भाचा काहीं भाग व हल्लींचे निजामाच्या राज्यातील पश्चिमेकडील दक्षिणोत्तर चिरटी या चतु सीमेमधील बहुतेक सर्व प्रदेश त्याच्या पूर्ण अमलाखाली आला होता. अपरात, ( उत्तर कोंकण ) वनवासी, (दक्षिण कोंकण ) सेउणदेश, (हल्लींच्या नाशिक, नगर या जिल्ह्यात समाविष्ट होणारा बहुतेक भाग ) देवगिरी व कोल्हापूर याचे दरम्यानचा मुलुख, कर्नाटक, ह्मैसूर, तैलंगण, लाट, गुजराथ वगैरे प्रांताचा वरील टापूत समावेश केला जात असे. इ. स. ४७५ पासून चालुक्य, ( पूर्व व उत्तर कालीन ) राष्ट्रकूट, कदंब, शिलाहार, यादव ( होयसल यादव व सेउणदेशचे व देवगिरीचे यादव ) वगैरे घराण्यातील महत्वाकांक्षी राजे उपरिनिर्दिष्ट टापूतील प्रदेश आपापल्या पूर्ण अमलाखालीं यावा ह्मणून परस्परांशीं झगडत असत. वरील आटशें-नुउशे वर्षांचे अवधींत केव्हा

चालुक्यांची, तर केव्हां राष्ट्रकूटांची, केव्हां कदंबांची तर केव्हां यादवांची सरशी होत असे. पैकीं चालुक्य घराण्यांतील राजे फार बलाढ्य असून त्यांचा अंमल वरील द्वीपांतील प्रदेशावर फार वर्षे होता. यापैकीं एखाद्या राजघराण्यांत पराक्रमी व धाडशी पुरुष निपजला कीं तो दुसऱ्या घराण्यांतील दुबळ्या राजाबरोबर कांहींतरी कुरापत काढून त्याजवर चढाई करी व त्यास आपला मांडलिक बनवी. यादव वंशवृक्षास बऱ्याचशा शाखा फुटून त्या वरील द्वीपांत जिकडे तिकडे पसरल्या होत्या व त्यांनी आपलीं स्वतंत्र संस्थानें स्थापिलीं होतीं. यादववंशांत होयसळयादव, सेउणदेशचे यादव व देवगिरीचे यादव या तीन शाखांचा प्रामुख्यानें समावेश होत असे. हीं तीनही घराणीं आपला संबंध द्वारकेंतील यदुवंशीय श्रीकृष्णापर्यंत पोहोंचवीत. होयसल यादव हे यदुवंशीय नसून त्यांचा सेउणदेशचे (पूर्वकालिन) व देवगिरीचे (उत्तरकालिन) यादवाशीं कांहीं संबंध नव्हता असें कांहीं विद्वानांचें मत आहे. मुंबई येथील सेंट झेव्हिअर कॉलेजांतील अध्यापक व इतिहास संशोधक रे० फादर हेराम हे वरील मताचे आहेत. **गदग** येथील इ. स. १११३ तील शिलालेखांत होयसल राजघराण्याची थोडी माहिती दिली आहे. त्यांत यादववंशीय भिल्लमदेव यानें होयसल राजघराण्यांतील वीरबल्लाल याजबरोबर युद्ध करून होयसलांची राजधानी द्वारसमुद्र आगिनदोग्ध केल्याचा उल्लेख आहे. शिवाय बऱ्याचशा शिलालेखांत होयसल राजघराणें यदुवंशीय असल्याबद्दलचा उल्लेख आहे. त्याचप्रमाणें या घराण्यांतील राजे आपणांस द्वारावतिपुरवराधीश, विष्णुवंशोद्भव इत्यादि बिरुदें शासनांत भूषण मानीत असत. या तीन

शाखांशिवाय मारयर्दी या नावाची आणखी एक यादवांची शाखा वरील टापूत होती असें आढळून येतें कर्नाटक व म्हैसूर प्रांतांतील, कानडींत असलेले ताम्रपट व शिलालेख यावरून वरील तीनही घराणीं मूळ यादववंशीय असलीं पाहिजेत असा निष्कर्ष निघतो होयसल यादव घराण्यांतील वीरवल्लालानें भिल्लमदेवाचा पराभव करून त्यापासून उत्तर देश जिंकून घेतल्यावर सदरील भिल्लमानें देवगिरी हें नवीन शहर वसवून तेथें आपलें स्वतंत्र राज्य स्थापिलें, असें कित्येकांचें मत आहे सेउणदेशाचे व देवगिरीचे यादव हे सामान्य सस्थानिकांत मोडत असून तत्कालीन बलाढ्य चालुक्य राजांचे ते मांडलिक होते कालांतरानें चालुक्य कुळांत दुर्बळ राजे निपजल्यामुळें यादव कुळांतील पराक्रमी राजांनीं त्यास जिंकून त्यांचें मांडलिकत्व झुगारून दिलें व ते आपणास सार्वभौम म्हणवू लागले

भारतवर्षीयांची इतिहास लेखनाबद्दलची अनास्था सर्वश्रुत आहे त्यामुळें भारतवर्षांतील कोणत्याही राजघराण्याचा सुसंगत इतिहास लिहिण्यास जरूर ती सामुग्री मिळणें जवळजवळ दुरापास्त आहे ऐतिहासिक माहितीच्या अभावीं शिलालेख, ताम्रपट, दानपत्रें, चलनीनाणीं व परकीय देशांतील प्रवाशांनीं लिहिलेलीं वर्णनें याजवर सर्व भिस्त ठेवावी लागते एखाद्या गोष्टीचें वर्णन करतांना तें अलंकारिक भाषेंत खुलवून लिहिण्याची अनिष्ट सवय लेखकांना असल्याचें पदोपदीं अनुभवास येत एखाद्या राजाचे पराक्रम वर्णन करतांना त्याची वाजवीपेक्षा फाजील स्तुति केल्यानें त्यास इतिहासाऐवजीं प्रबंधाचें-पोवाड्याचें-स्वरूप प्राप्त झालेलें दिसतें त्यांतून ऐतिहासिक सत्य निवडून काढणें अशक्य होतें मागील

शतकाच्या अखेरच्या तीस चाळीस वर्षांत सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर, डॉ० भाऊ दाजी, पंडित भगवानलाल इंद्रजित, न्या. तेलंग वगैरे पौर्वात्य पंडितांनीं, त्याचप्रमाणें डॉ. फ्लीट, किल्हॉर्न, बर्जेस्, बॉथेन्, जर्विस्, कॅम्बेल वगैरे पाश्चिमात्य विद्वान लोकांनीं दक्षिणेंतील प्राचीन इतिहासाची साधन–सामुग्री मिळविण्याचे कामीं अविश्रांत श्रम केले. व त्यांच्या संशोधनानें महाराष्ट्राच्या इतिहासावर बराच प्रकाश पडला आहे. परंतु महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास पूर्णपणें व सुसंगतरीतीनें लिहिण्याचे कामीं हल्लींचे विद्वान लोक बिलकुल लक्ष घालीत नाहींत याबद्दल वाईट वाटते. वर निर्दिष्ट केलेल्या व इतर कांहीं संशोधकांनीं वेळोवेळीं तत्कालीन इंग्रजी नियतकालिकांत लेख लिहून शेंकडों शिलालेख व ताम्रपट उजेडांत आणून भारतवर्षीयांस उपकृत केलें आहे.

यादवघराण्यांतील राजे आपणांस यदुवंशीय म्हणवीत असत त्यांचेपैकीं महापराक्रमी राजे भिल्लम, सिंघण, कृष्ण, महादेव, रामदेवराव हे आपल्या नांवापूर्वी " यादवनारायण " द्वारावतीपुरवराधीश " विष्णुकुलोद्भव वगैरे बिरुदें लावून आपला पूर्वसंबंध द्वारकेच्या श्रीकृष्णापर्यंत पोहोंचविण्यांत भूषण मानीत, असें पूर्वी म्हटलें आहे. यादवकुलांचा नाश होऊन श्रीकृष्ण निजधामास गेल्यावर यादवांची जिकडे तिकडे फांकाफांक झाली त्यांपैकीं कांहीं उत्तरेकडे व कांहीं दक्षिणेकडे गेले व त्यांनी त्या त्या ठिकाणीं वसाहती केल्या असाव्या असें दिसतें. यांपैकीं कांहीं यादव राजघराणी सौराष्ट्रांतून नर्मदेच्या खालीं उतरून नाशिक नजीकच्या प्रांतांत आलीं असावी. नाशिकापासून सुमारें

बारा मैलावर सिंडिनेरा ( सिन्नर ) या नांवाचें शहर त्यांनी वसविलें व ते आपल्या राजधानीचें शहर केलें. सिंडिनेरापासून तहत पूर्वेकडे पैठण शहरापर्यंत व उत्तरेकडील सातपुड्यापर्यंतच्या प्रदेशास, यादवघराण्यांतील सेउणचंद्र नांवाच्या एका पराक्रमी राजामुळें सेउणदेश असें नांव प्राप्त झालें. व सदरील यादवराजघराण्यांतील यादव राजे सेउणदेशचे यादव ह्मणून संबोधिले जात असत.

प्रसिद्ध इतिहाससंशोधक चिंतामणराव वैद्य यांच्या मतें यादवकुल समूळ नष्ट झाल्यामुळें यदुवंशीय घराण्यांपैकीं कोणतेही घराणें उत्तरेकडे अगर दक्षिणेकडे जाणें शक्य नव्हते. सबब वरील यादवराजांचा यदुकुलाशीं संबंध जोडणें बरोबर नाहीं. परंतु श्रीमद्भागवत पुराणांतील अकराव्या स्कंधांतील ३१ व्या अध्यायांत दिलेल्या हकीकतीवरून अर्जुनानें अवशिष्ट राहिलेली यादव मंडळी आपल्याबरोबर इंद्रप्रस्थास नेली व तेथील आधिपत्य व्रजनामक एका यादवास देऊन त्यास तेथील गादीवर बसविलें. या व इतर हकीकतीवरून यादवकुल समूल नष्ट झालेलें नव्हते असें दिसते. अवशिष्ट राहिलेल्या यादवांपैकीं कांहीं घराणीं वर लिहिल्याप्रमाणें सौराष्ट्र सोडून उत्तरेकडे व दक्षिणेकडे गेलीं असावीं यांत शंका नाहीं.

या भागाच्या शेवटीं यादववंशाच्या बारा वंशावळी दिलेल्या आहेत त्यांचा परस्पराशीं मेळ बसत नाहीं. परंतु हेमाद्रीनें आपल्या "चतुर्वर्गचिंतामणि" ग्रंथाच्या व्रतखंड भागामध्यें देवगिरीच्या यादव राजघराण्यासंबंधीं प्रशस्ति जोडली आहे, त्यांत दिलेली वंशावळ संपूर्ण असून ती ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाची आहे. सदरील प्रशस्ति परिशिष्ट अ मध्यें दिली आहे. या वंशावळीचे पौराणिक व



डॉ. (सर) रामकृष्ण गोपाळ भांडारकर, एम्.ए.

जन्म ता. ६ जुलै १८३७] [मृत्यु २४ ऑगस्ट १९२५

ऐतिहासिक असे दोन भाग पडतां येतील. पौराणिक वंशावळीचा आरंभ इंदु (चंद्र) पासून होऊन तींत पुराणास धरून व दंतकथेस अनुसरून प्राचीन भारतवर्षीय राजांची नावें यथाक्रम दिलीं आहेत. ऐतिहासिक वंशावळीस सुबाहु राजापासून प्रारंभ होऊन तींतील अखेरचा पुरुष देवगिरीच्या यादवराजघराण्यापैकीं महादेव होता असें म्हटलें आहे. सदरील महादेव देवगिरीच्या यादवराजघराण्यापैकीं अखेरचा राजा रामदेवराव याचा चुलता होय. हेमाद्रि हा महादेवाचे राजवटींत करणाधिपाचे हुद्यावर असून "चतुर्वर्गचिंतामणि" हा प्रचंड ग्रंथ त्याच्या आश्रयाखालीं रचला अशी हकीकत पूर्वी दिलेली आहे. यावरून महादेवाचे पश्चात् देवगिरीच्या गादीवर बसलेल्या यादवराजांची नावें त्यांत दिलीं नाहींत हें साहजिक आहे. या वंशावळींतील पौराणिक भाग अजिनात वगळला असता सुबाहुपासून महादेवापर्यंत दिलेल्या राजांची नावें ऐतिहासिक सत्यास धरून आहेत यात शंका नाहीं. विशिष्ट शिलालेख अथवा ताम्रपट ज्याच्या नेतृत्त्वाखालीं तयार करण्यात आले असतील त्याच्या अज्ञानामुळें अगर नजरचुकीमुळें अशा तऱ्हेचे फरक होणें संभवनीय आहे. उदाहरणार्थ-कै.पा.ग.पटवर्धन यास, अहमदनगर जिल्ह्यातील मौजे अर्धी येथील ताम्रपट एका गृहस्थाकडून मिळाला तो त्यांनीं भा इ स मंडळाच्या तिसऱ्या वर्षाच्या त्रैमासिकात दिला आहे तो परिशिष्ट नं. ४ मध्यें उद्धृत केला आहे. यादववंशीय इरम्मदेवानें कोंकणेश्वर ब्राह्मणास दान दिल्याबद्दलचा हा ताम्रपट आहे. या ताम्रपटात इरम्मदेव हा तिसऱ्या भिल्लमाचा मुलगा असें म्हटलें आहे हेमाद्रीच्या प्रशस्तींत इरम्माच्या ऐवजी परम्मदेव अगर 'इरम्मदेव' असें नाव असून तो चौथ्या भिल्लमाचा नातु होता असें दिसतें 'परम्म' या

शब्दाचा 'इग्ग' असा अपभ्रंश होणें स्वाभाविक आहे. याप्रमाणें शके ९९१ मधील वसईस मारडेश्वर ताम्रपट व शके ९४८ चा कलसबुद्रुक येथील ताम्रपट व शके ९२२ चा संगमनेरचा ताम्रपट यांत दिलेल्या वंशावळी परस्परांशी जुळत नाहीत परंतु हेमाद्रीनें सेउणचंद्र सुबाहुचा मुलगा दृढप्रहार यापासून महादेवरावापर्यंत यादवराजांची दिलेली वंशावळ इतिहासाच्या कसोटीस उतरते म्हणून ती आधारभूत धरून दृढप्रहारापासून प्रत्येक यादवराजाची उपलब्ध असलेली माहिती पुढे देण्याचें योजिलें आहे

## संगमनेर येथील ताम्रपट.

हेमाद्रीच्या वंशावळींत, सुबाहूनें आपल्या चार मुलांमध्यें राज्याची वाटणी करून त्यांपैकीं दक्षिणेकडील भाग आपला दुसरा मुलगा दृढप्रहार यास दिला असा मजकूर आहे ऐतिहासिक कालांतील यादवराजघराण्याची विश्वसनीय माहिती देणारा हा पहिलाच ताम्रपट आहे तो महासामंत दुसरा भिल्लम याचे वेळचा आहे या ताम्रपटाचे तीन तुकडे असून ते एका वर्तुलाकार कडींत अडकविलेले आहेत व त्यावर विष्णूचें वाहन गरुड याची मुद्रा आहे यादवराजे आपली उत्पत्ति विष्णुपासून आहे असें मानीत असल्यामुळें त्यांनीं आपल्या राजघराण्याच्या शिक्कामोर्तबावर गरुडाचे चिन्ह ठेवणें स्वाभाविक आहे या ताम्रपटाची भाषा संस्कृत असून ती अशुद्ध आहे त्यांत संधि नियमाकडे दुर्लक्ष केलें आहे यादवघराण्याची उत्पत्ति प्रभुपासून झाली असें सांगून, आपल्या कुळांत ब्रह्मा, मरीचि, अत्रि, इंदु, पुरूरवा, आयुश, नघुश, ययाति वगैरे राजे निर्माण झाले असें सांगून ती यदुपर्यंत भिडविली आहे

शक ९२२
इ. स. १०००

सदरील ताम्रपटात दिलेल्या वंशावळीतील ऐतिहासिक भाग लक्षात घेतला असता त्यातील मूळ पुरुष सेउणचंद्र होता, असें दिसतें त्यास दृढप्रहार नावाचा मुलगा झाला सदरील दृढप्रहारास भिल्लम या नावाचा मुलगा असून त्याचे पोटीं राजा अगर श्रीराज (राजनि) या नावाचा मुलगा निपजला. श्रीराजास वद्दगी अथवा वद्दगी या नावाचा मुलगा असून तो तत्कालीन बलाढ्य चालुक्य वंशीय कृष्ण अथवा कृष्णराज याचा मांडलिक होता. त्याचा विवाह महानृप धोरप्पा यांची मुलगी व्होडीयव्वा हिजबरोबर झाला होता त्यानें मालवदेशचा राजा मुंज याचा पराभव केला व सर्वकाळ चंचल असलेल्या राज्यलक्ष्मीस रणरंग भीम याच्या पराण्यात पाति-व्रत्याचा अंगिकार करण्यास त्यानें भाग पाडिलें वगैरे, काव्यमय वर्णन या ताम्रपटात दिलें आहे. यावरून मालवदेशचा मुंज राजा पहिल्या भिल्लमाचा समकालिन नसून त्या उभयताच्या युद्धात मालवदेशाच्या राजास अपयश आलें असावें असें यावरून दिसते. पहिल्या भिल्ल-माच्या राजवटींत विजयाभरणनाथ या नावाचें भव्य शिवमंदिर बांधलें गेलें. शके १०२५ च्या कलस-बुद्रुक येथील ताम्रपटात व शके १०६९ च्या वसई येथील ताम्रपटात दिलेली हकीकत प्रस्तुत ताम्र-पटातील हकीकतीपेक्षा भिन्न आहे कलस-बुद्रुक येथील ताम्रपट तिसऱ्या भिल्लमावेळचा असून वसई येथील ताम्रपट दुसऱ्या सेउणचंद्राचे वेळचा आहे. संगमनेरचा ताम्रपट दुसऱ्या भिल्ल-माचे वेळचा असून त्यात ज्या लक्ष्मीचें वर्णन केलें आहे ती त्याचीच राणी असली पाहिजे. शिवाय दुसऱ्या भिल्लमाच्या कारकी-र्दीत विजयाभरणनाथाचा उल्लेख असल्यामुळें तें देऊळ त्यानें

राजवटींत बांधलें गेलें असावें हें उघड दिसतें. तसेंच मालवदेशच्या मुंज राजाचा पराभव यादव घराण्यातील दुसऱ्या भीमानें केला होता. व त्याजपासून त्यानें हिराऊन घेतलेली राज्यलक्ष्मी आपला सार्वभौम राजा रणरंगभीम यास अर्पण केली होती ही गोष्ट निर्विवाद आहे. असें असता सगमनेरच्या ताम्रपटात येवढी ऐतिहासिक ढोबळ चूक व्हावी याचें काय कारण असेल तें असो. ताम्रपट ज्याच्या नेतृत्त्वाखाली तयार झाला त्याची काहीतरी नजरचूक झाली असावी असा तर्क करण्यापलिकडे गत्यतर नाही!

दुसरा भिल्लम इ स १० व्या शतकाचे अखेरीस राज्य करीत होता. व मालव देशचा राजा मुंज हा त्याचा समकालिन होता, दुसरा भिल्लम हा पश्चिमेकडील चालुक्यवंशीय रणरंगभीम उर्फ तैल्प याचा सेनापति अथवा मांडलिक होता, व याच तैलपानें मालवदेशीय मुंज राजाचा पराभव करून त्याचा शिरच्छेद करविला अशी माहिती इतर शिलाशासनावरून दिसून येते. त्याची कारकीर्द इ. स. ९७३ पासून इ. स. ९९० पर्यंत होती. प्रस्तुत ताम्रपटात वड्डिग अथवा वदिग हा कृष्ण अगर कृष्णराजाचा मांडलीक होता असें म्हटलें आहे. परंतु ही गोष्ट इतिहासास धरून नाहीं. कारण शके ८६७ ते ८७६ पर्यंत (इ. स. ९४५ ते ९५६) च्या कालावधींत राष्ट्रकूटवंशीय कृष्णराज (अमोघवर्षवड्डिगाचा मुलगा) याचा तो मांडलीक असला पाहिजे. यावरून सेउणदेशचे यादवराजे इ. स. ९७३ पर्यंत तरी राष्ट्रकूट राजाचे मांडलिक होते यात शंका नाहीं.

चालुक्य राजांनी राष्ट्रकूटाचा इ. स. ९७३ मध्यें विध्वंस केल्यावर यादवाचे मांडलिकत्त्व साहजिकच चालुक्य राजाकडे गेलें. प्रस्तुत

ताम्रपटांत नमूद केलेला चालुक्य राजा महानुधुरप्पा हा निःसंशय त्या घराण्यांतील असावा. 'धुरप्पा' हें ध्रुव या संस्कृत शब्दाचें प्राकृत अपभ्रंष्ट रूप होय. राष्ट्रकूट वंशांत ध्रुव, धोरा, ऊर्फ निरुपम या नांवाचा राजा होऊन गेला हें राष्ट्रकूटांच्या इतिहासावरून दिसतें. वद्दिगाचा सार्वभौमराजा कृष्णराज यास निरुपम या नांवाचा एक कनिष्ट भाऊ होता. व त्याचा मुलगा कक्कल हा कृष्णराजाचे पश्चात् त्याचे गादीवर बसला. ह्या निरुपमास, त्याचा पूर्वज निरुपम याप्रमाणेंच ध्रुव अथवा धोरा या दुसऱ्या नांवानें ओळखलें जात असावें. त्याच्या मुलीबरोबर दुसऱ्या भिल्लमाचा विवाह झाला असावा. या ताम्रपटांत दुसऱ्या भिल्लमाची बिरुदावली पुढें लिहिल्याप्रमाणें आहे.

**महासामंत**—अराति–निसूदन, संग्रामराम, कंदुकाचार्य व सेल्लाविदेग.

पुराणांत विष्णु व कृष्ण हे यदुवंशीय होते असें म्हटलें आहे. म्हणून सेउणदेशचे (पूर्वकालीन) यादवराजे व देवगिरीचे (उत्तरकालीन) आपणांस विष्णुवंशोद्भव, द्वारावतिपुरवराधीश्वर, यादवनारायण अशीं बिरुदें लावून घेत असत.

**फलसग्रुद्रक** येथील शके ९४८ च्या ताम्रपटांत दुसऱ्या भिल्लमास **संग्राम-राम** या विशेषणानें संबोधिलें आहे ही गोष्ट महत्त्वाची आहे. शिवाय या भिल्लमानें सेउण देशांत **सिंदिनेरा** अथवा **श्रीनगर** नांवाचे शहर वसवून तें आपलें राजधानीचे शहर केलें. या ताम्रपटानें **मातुलिंग** नदीच्या कांठावर असलेला अर्जुनोधिका हा गांव ब्राम्हणांस दान दिला आहे. या शिवाय लघुअर्जुनोधि आणि लघुपप्पुला-चंद्र या दोन खेड्यांमधील जमीन दान देण्यांत

आली आहे या गावच्या चतु सीमा —पूर्वेस संगमनेर, दक्षिणेस चिरलीगाव, पश्चिमेस जम्बलेनिंह (नहले निंह) उत्तरेस वन्तुलवेट्ट याप्रमाणें दिल्या आहेत तेवढ्यावरून हा गाव नक्की कोणता असावा हें नकाशावरून समजत नाहीं डॉ बर्जेस् याचें असें मत आहे की प्रस्तुत दानपत्रात उल्लेखिलेला अर्जुनाधिका गाव व मलुरी नदीच्या काठावर हल्लीं असलेलें राजापुर शहर ही एकच असलीं पाहिजेत कारण या दोन गावच्या चतु सीमा परस्पराशी बऱ्याच अशी जुळतात गोदावरी व अडप्पा या दोन नद्याच्या संगमावर सूर्यग्रहणाच्या पर्वणी-वर हा गाव ब्राह्मणास दान दिला आहे दानपत्राची मिति भाद्रपद शुद्ध १ सर्वदीन संवत्सर शके ९८८ अशी दिली आहे ज्या ब्राह्मणास हा गाव दान दिला आहे त्यात ऋग्वेदी, शुद्ध यजुर्वेदी माध्यदिन, कृष्णयजुर्वेदी व मैत्रायणी शाखेचे ब्राह्मण आहेत कौडिण्य, कौशिक, भारद्वाज व गौतम अशा कित्येकाची गोत्रें आहेत दृढप्रहारानें दक्षिणदेशात श्रीनगर या नावाचें मोठें राजधानी शहर वसविलें होतें असें हेमाद्रीनें व्रतखंडातील प्रशस्तींत म्हटलें आहे त्या विधानास प्रस्तुत ताम्रपटातील मजकुरावरून दुजोरा मिळतो या राजधानींत राज्य करीत असता दृढप्रहार यास सेउणचन्द्र या नावाचा मुलगा झाला व त्याचे नावावरून दृढप्रहाराचे अमलाखालीं असलेल्या प्रदेशास सेउणदेश हें नाव काहीं कालानतर पडलें यावरून नाशिक व त्याचे सभोंवतालच्या प्रदेशाचा सेउणदेशात अतर्भाव होत होता हे निर्विवाद आहे तसेंच दृढप्रहाराच्या राज्याचा विस्तार कालगतीनें जरी बराच वाढला होता तरी त्याचे वंशज, "सेउणदेशचे यादवराजे" या टोपण नावानें संबोधिले जात सेउणदेशचे वंशजापैकी भिल्लमानें

श्रीनगर हें राजधानीचे ठिकाण बदलून देवगिरी हे नवीन नगर वसवून त आपलें राजधानीचें शहर केलें म्हणून त्यानंतरच्या यादव कुळातील राजास 'देवगिरीचे यादव' असें नाव पडलें वस्तुत दृढप्रहार व तेराव्या शतकातील अखेरचा रामदेवराव हे एकाच वंशातील होत काहीं शिलाशासनात व इतरत्र दृढप्रहारापासून रामदेवरावपर्यंतच्या सर्व यादव राजाना सेउणदेशचे राजे या नावानें संबोधिलें आहे सदरील संगमनेरच्या ताम्रपटात नमूद केलेला दान सूर्यग्रहणाच्या पर्वणीवर दान केल्याचें म्हटलें आहे दानपत्राची मिति इ स ३१ आगष्ट १००० या दिवशीं पडते परंतु या दिवशीं सूर्यग्रहणाचा योग नव्हता असें काहीं विद्वानाचें मत आहे इंग्रजी पद्धतीप्रमाणें ३० सप्टेंबर १००० रोजीं सूर्यग्रहण होतें पण तें हिंदुस्थानात दिसण्यासारखें नव्हतें दानपत्राच्या मितीस सूर्यग्रहणाचा योग नसताना त्या पर्वणीचा ताम्रपटात उल्लेख केला जाईल हें संभवत नाहीं भरतखंडात कालगणनेच्या बऱ्याच पद्धति आहेत त्यात अमांतपद्धतीनें केलेली कालगणना उत्तरेकडील उज्जैयनीच्या कालगणनेशीं जुळत नाहीं असा अनुभव आहे त्यामुळें सूर्यग्रहणें अगर चंद्रग्रहणें याच्या वेळाच्या बाबतींत बराच तफावत पडण्याचा संभव आहे

## कन्हसुद्रुक येथील ताम्रपट

नगर जिल्ह्यातील अकोला शहरापासून तीन मैलावर कन्हसुद्रुक नावाचा गाव आहे तेथें गंगाधर त्र्यंबक कुलकर्णी यांच्या जमिनीत ताम्रपट सापडला त्याचे तीन तुकडे असून ते एका वर्तुळाकार कडीत अडकविलेले आहेत व कडीवर गरुडाची मुद्रा आहे

ताम्रपटाची भाषा संस्कृत असून लिपी देवनागरी आहे सिंधिनगरच्या ( हल्लींचे सिन्नर ) नर्तकिच्या देवनदींत स्नान करून शोधननाम संवत्सरांत शके ९४८ कार्तिक अमावास्येस कल्सदुद्रुक हा गाव यादववंशीय तिसऱ्या भिल्लमानें श्रीभट्टाचा नातु मणहनायक नावाच्या ब्राह्मणास दान दिला या ताम्रपटांत यादववंशीय राजाचा वृत्तांत दिला आहे त्यांत त्याचा मूळ पुरुष सेउणचंद्र हा होता असें म्हटलें आहे या भागाच्या अखेरीस नं ५ मध्यें ही वंशावळ देण्यांत आली आहे या वंशावळी प्रमाणें सेउणचंद्र हा यादवांचा मूळ पुरुष असून या ताम्रपटाचे मितिपर्यंत या वंशात तीन भिल्लम झाले पैकीं दुसऱ्या भिल्लमाचा विवाह राष्ट्रकूट वंशातील लक्ष्मी नावाच्या राजकन्येबरोबर झाला होता असें म्हटलें आहे दुसऱ्या भिल्लमाचा मुलगा वेसुगी यास सामंतरत्न असें बिरुद लाविलें आहे हेमाद्रीच्या व्रतखंडांत दिलेल्या वंशावळींशी सदरील वंशावळ बहुतेक अशानें जुळत आहे व्रतखंडातील वंशावळींत वड्डिग-वाद्युगिच्या नंतर धाडीयस हें नाव असून वेसुगी नंतर अर्जुन याचें नाव आहे परंतु या उभयतांचा उल्लेख कोणत्याही शिलाशासनांत अगर ताम्रपटांत केलेला नाहीं शके ९४१ च्या वसईच्या ताम्रपटांत दिलेली वंशावळ व शके १०२० च्या आंबे येथील इरम्मदेवाच्या वेळच्या ताम्रपटांतील वंशावळ या परस्परांशीं ततोतंत जुळतात शके १०६३ च्या शिलालेखांत जी वंशावळ दिली आहे त्यांत थोडा फरक आहे प्रस्तुत ताम्रपटांत पहिला भिल्लम हा श्रीराजाचा जनक व दुसरा भिल्लम हा त्याचा नातु म्हणून दर्शविला आहे

शके ९४८
इ स १०२६

शके १०६३ च्या अंजनेरीच्या शिलालेखांत पहिला भिल्लम हा श्रीराजाचा बन्धु व दुसरा भिल्लम हा त्याचा पणतु असें म्हटलें आहे.

तिसऱ्या भिल्लमानें नाशिकपासून सुमारें बारा मैलावर सिंधिनगर या नांवाची राजधानी स्थापिली. कलस-बुद्रुक गांवची भौगोलिक स्थिति अद्याप कायम आहे. हल्लीच्या सिन्नर गांवानजिक देवनदी व शिवनदी यांचा संगम होऊन त्या नांदूर मध्यमेश्वराच्या नैऋत्येस पांच मैलावर गोदावरीस मिळतात. कलस-बुद्रुक या गावच्या चतुःसीमा ताम्रपटांत दिल्या आहेत त्या अशा-पूर्वेस संगमिका, दक्षिणेस ताम्रमस्तर, पश्चिमेस धूहगांव, उत्तरेस पयोधरा नदी. पैकीं संगमिका हा सांप्रतचा संगमनेर गांव होय. धूहगांव हल्लीचा धू गांव, पयोधरा ही हल्लीची प्रवरा नदी असून ती संगमनेर नजीकच्या महाळुंगी उर्फ मळुंगी नदीस मिळते. तिसऱ्या भिल्लमानें सूर्यग्रहणाच्या पर्वणीवर उपरिनिर्दिष्ट मणव्ह नांवाच्या माध्यंदिन शाखेच्या भारद्वाज गोत्रीय मध्यदेशांतील तकारिका येथील रहिवाशी ब्राह्मणास कलस-बुद्रुक गांव दान दिला. तिसऱ्या भिल्लमानें सिंधिनगर ही आपली राजधानी केली, हें विधान हेमाद्रीच्या व्रतखंडांत दिलेल्या हकीकतीशीं विसंगत आहे. कारण सिंदिनगर उर्फ श्रीनगर ही दृढप्रहाराची राजधानी होती असें त्यांत लिहिलें आहे.

पंडित भगवानलाल इंद्रजित यांस नाशिकपासून पंधरा मैलावर अंजनेरी येथें जैन मंदिरांत शके १०६३ चा शिलालेख मिळाला आहे. त्यांत जिनप्रभासूरींच्या नासककल्पांतील कांहीं माहिती दिली आहे. त्यांत दृढप्रहार या महापराक्रमी यादवराजानें नाशिकच्या आसपास चंद्रादित्यपुर नांवाचें नगर स्थापून तें आपलें राजधानीचें

शहर केलें असा मजकूर आहे हल्लींचें चांदोड हेंच तें चंद्रपूर (चंद्रादित्यपुर) असावें, आणखी दृढमहाराचा मुलगा सेउणचंद्र यानें सेउणचंद्र नावाचें नगर स्थापिलें असाही त्यांत मजकूर आहे

पुढें दिलेल्या वसईच्या ताम्रपत्रांत दृढप्रहारराजानें पूर्वी अस्तित्वांत असलेलें चंद्रादित्यपूर नगर वैभवास चढविलें व त्याचा मुलगा सेउणचंद्र यानें सिंदिनेरामध्यें सेउणपूर नावाचें नगर वसविलें असा मजकूर आहे तो, हेमाद्रीच्या व्रतखंडांतील दृढप्रहाराची राजधानी श्रीनगर येथें होती या विधानाशीं विसंगत आहे वसई व अंजनेरी येथील ताम्रपट हे त्यांत दर्शविलेल्या काळीं लिहिले गेले असल्यास त्यांतील माहिती ऐतिहासिकदृष्टया विश्वसनीय मानली पाहिजे या भागाच्या शेवटीं यादवांच्या निरनिराळ्या शिलाशासनांत व ताम्रपटांत आढळून आलेल्या वेगवेगळ्या चारा वंशावळी दिल्या आहेत हेमाद्रीच्या व्रतखंडांतील वंशावळींत दुसरा धाडियस व अर्जुन यांचा उल्लेख आहे परंतु त्यांचा मागमूस इतर वंशावळींत नाहीं

कलसबुद्रुकच्या ताम्रपटांत शके ९४८ क्रोधन संवत्सर कार्तिक आमावास्येस सूर्यग्रहण होतें असें म्हटलें आहे परंतु कैं० केरू नाना छत्रे आणि शंकर बाळकृष्ण दिक्षित यांच्या गणितपद्धतीप्रमाणें सदर तिथीस सूर्यग्रहण येत नव्हतें ता २३ नोव्हेंबर १०२५ रोजीं सूर्यग्रहण नव्हतें असें त्यांच्या गणितावरून दिसतें दक्षिणेकडील अमान गणितपद्धतीप्रमाणें सूर्यग्रहण ता २३ नोव्हेंबर सन १०२५ मंगळवार रोजीं होतें असें दिसतें उत्तरेकडील (उज्जैनीकडील) गणितपद्धतीप्रमाणें क्रोधनसंवत्सर सन १०२३-२४

सालांत होतें. यावरून बऱ्याच शिलाशासनांत व ताम्रपटांत सूर्यग्रहणाच्या व चंद्रग्रहणाच्या मिति दिल्या आहेत त्या चुकीच्या आहेत असें धाडसाचें विधान करण्यापूर्वी उत्तरेकडील व दक्षिणेकडील ज्योतिषगणितपद्धतींत जो ठळक फरक आहे त्याचाही अवश्य विचार केला पाहिजे.

संगमनेर व कलस-बुद्रुक या दोनही ताम्रपटांत दृढप्रहाराचा मुलगा सेउणचंद्र याचा उल्लेख असून त्यानें सेउणपुर नांवाचें शहर स्थापिलें व त्याचे नांवावरूनच त्याच्या अमलाखालीं असलेल्या प्रदेशास सेउणदेश असें नांव पडलें असा मजकूर आहे. हेमाद्रीच्या व्रतखंडांत जी प्रशस्ती दिली आहे तिच्या २२ व्या श्लोकांत हीच गोष्ट नमूद केली आहे. तो श्लोक असा—

ततः स राजा निजराधानीमधिष्ठितः श्रीनगरं गरीयः ।
लेभे सुतं सेउणचन्द्रसंज्ञं यत्संज्ञया सेउणदेशमाहुः ॥

पैठण येथील इ. स. १२७२ च्या ताम्रपटांत या प्रांतास सेउणदेश याच नांवानें उल्लेखिलें आहे. वसईच्या ताम्रपटांत सिंदिनेरामध्यें सेउणचंद्रानें सेऊणपुर नांवाचें नगर वसविलें असें म्हटलें आहे, यावरून सिंदिनेरा हें एका विशिष्ट शहराचें अगर गांवाचें नांव नसून तें एकाद्या प्रांताचें नांव असावें असें दिसतें व तें सेउणदेश याचें रूपांतर असावें. सेउणदेशाची मर्यादा नाशिकपासून पूर्वेकडे थेट देवगिरी ( दौलताबाद ) पर्यंत होती व त्यांत हल्लींच्या नाशिक, नगर व खानदेश यांत मोडत असलेल्या बऱ्याच भागाचा समावेश होत होता असें पूर्वी म्हटलें आहे. सेउण या शब्दापासून खान हें अपभ्रष्ट रूपांतर होऊन सेउणदेशास खानदेश असें सांप्रत नांव पडलें असावें असें

कित्येक विद्वानांचें मत आहे. परंतु हा समन्वय ओढून-ताणून केलेला दिसतो. सातपुड्याच्या खालच्या (पायथ्याशी असलेला) प्रदेश म्हणून त्यास खालदेश असें आरंभीं म्हणण्याचा प्रघात पडला असावा व पुढें ल च्या ऐवजीं न येऊन खानदेश असें नांव प्रचारांत आलें असावें हें संभवनीय आहे. या प्रांतांत जंगली जातींत 'ल' च्या ऐवजीं 'न' वारंवार उच्चारिलेला ऐकण्यांत येतो. जसें-'लाकूट' या ऐवजी 'नाकूट' वगैरे. मुसलमानांच्या अमलाखालीं हा प्रांत आल्यावर गुजराथचा सुलतान पहिला अहमद यानें सेउणदेशास खानदेश असें नांव दिलें असावें असेंही कित्येकाचें मत आहे. भाषा शास्त्रांतील " प ख योरभेद. पोटभेद " या पद्धतीप्रमाणें पेउण याचें खेउण असें अपभ्रष्ट रूपांतर होऊन ' खेउ ' याचे ' खा ' असें अपभ्रष्ट रूपांतर होऊन अखेरीस तें खान म्हणून प्रचारांत आलें असावें.

### वसई येथील ताम्रपट.

प्रस्तुत ताम्रपट दुसऱ्या सेउणचंद्राच्या वेळचा आहे. हा ताम्रपट वसई येथील एका शेतकऱ्यास आपलें शेत खणीत असतांना सांपडला व तो मुंबईचे पुराणवस्तु संशोधक डॉ. भाऊ दाजी याचे हातीं आला व त्यांजकडून तो डॉ. बर्जेस याचे हातीं जाऊन पंडित भगवानलाल इंद्रजीत यांच्या वाचण्यांत आला. या ताम्रपटाचे तीन तुकडे असून ते एका वर्तुळाकार कडींत नेहमीच्या पद्धतीप्रमाणें अडकविलेले आहेत. कडीवर दोन्ही हात जोडलेल्या गरूडाचें राजचिन्ह कोरलेलें आहे. त्याच्या दोन्ही बाजूस शंख दाखविले आहेत. ताम्रपटाची भाषा संस्कृत असून लिपी देवनागरी आहे. ताम्रपटांतील मजकूर गद्य-पद्य

शके ९९१
इ. स. १०६९

आहे ताम्रपटात उपयोगात आणलेली देवनागरी लिपी शिलाहाराच्या वेळच्या शिलाशासनातील लिपींशी जुळती आहे भाषा अशुद्ध आहे

या ताम्रपटातील यादवराजाची दिलेली वशावळ या भागाच्या अखेरीस न २ मध्यें दिली आहे कलस बुद्रुकच्या ताम्रपटात दिलेली वशावळ व प्रस्तुत ताम्रपटातील वशावळ ह्या एकाच नमुन्याच्या असून त्या व्रतखडात हेमाद्रीनें दिलेल्या वशावळी बहुतेकाशी जुळतात असे पूर्वी म्हटलें आहे यादवघराण्यातील ऐतिहासिक मूळपुरुष दृढ-प्रहार ह्याजपासून तिसऱ्या भिलमाचे पश्चात् यादव कुळात निपन झालेल्या दुसऱ्या सेउणचद्रापर्यंत सर्व यादवराजाची त्रोटक हकिगत या ताम्रपटात दिली आहे यादव कुळात दृढप्रहार या नावाचा एक विष्णुवशोद्भव राजा होता तो द्वारावती ( द्वारका ) हून सेउणदेशात आला व त्यानें पूर्वी अस्तित्वात असलेलें चद्रादित्यपुर नावाचे शहर लौकिकास आणलें तो इतका पराक्रमी होता की शत्रूकडील सैनिकाची (पायदळातील) व हस्तिदळातील हत्तींची डोकीं तो सहज लीलेनें फोडी त्याचा मुलगा सेउणचद्र बापाप्रमाणें पराक्रमी असून त्यानें सिंदिनेरात ( सेउण देशात ) सेउणपूर नावाचे शहर वसविलें त्याचे पोटीं धाडियप्पा नावाचा सद्गुणसपन्न मुलगा निपजला व त्याने पराक्रमाच्या व सदाचारीवर्तनाच्या जोरावर यादवघराण्यातील कुल-दीपक असें सार्थ नाव आपणास प्राप्त करून घेतलें त्याचा मुलगा भिल्लम ( पहिला ) हाही आपल्या बापाप्रमाणेंच महापराक्रमी होता म तो पृथ्वीवर केवळ चद्रच निर्माण झाला होता, असें त्यानें काव्यमय वर्णन केलें आहे त्याला चद्राची उपमा कोणत्या अर्थानें दिली ममजण्यास मार्ग नाही सुदर स्त्रियाचे मुखास चद्राची उपमा देण्याचा

कवींचा सामदाय आहे व सुदर पुरुषाची तुलना मदनाबरोबर कर ण्यात येते एखाद्या व्यक्तीचें श्रेष्ठत्व दर्शविण्यासाठीं त्यास ‘ चद्र ’ असें उपपद लावण्याची पूर्वापार रूढी आहे यावरून हा थोरला अथवा पहिला भिल्लम परात्रमी असावा असें दिसतें पहिल्या भिल्ल मास श्रीराम या नावाचा मुलगा होता व तो सर्व पृथ्वीचा केवळ अलकार होता असें त्याचें वर्णन दिलें आहे श्रीरामाचा मुलगा वद्दिग ( वादुगी ) याचा, राष्ट्रकूट वशातील झझा नावाच्या राजाची कन्या वस्थियव्वा हिच्याबरोबर विवाह झाला होता वद्दिगास तेसुक नावाचा मुलगा झाला, व तेसुकापासून भिल्लम झाला यादववशात तिसरा भिल्लम या नावानें तो प्रसिद्ध आहे या भिल्लमास आहवमल्ल असेंही म्हणतात त्याचा विवाह पश्चिमेकडील चालुक्य वशीय जयासिंहाचा राजाची मुलगी व अहमल्लाची बहीण हम्मा हिजबरोबर झाला होता व ही हकीगत पश्चिमदेशचे चालुक्य राजाच्या इतिहासावरून खरी आहे असें दिसतें यानतर दिलेली वशावळ ऐतिहासिक दृष्ट्या सुस गत नाहीं भिल्लमाचा मुलगा दुसरा सेउणचद्र हा फार परात्रमी होता शके ९९१, श्रावण शुद्ध १५ च्या ( सौम्य सवत्सरीं ) दिवशी नाशिक नजीकच्या सिंदी परगण्यातील चिंचोली नावाचा गाव आपल्या सर्व प्रधानादेखत आपला राजपुरोहित सर्वदेवाचार्य यास दान दिला सदरील चिंचोली गाव नाशिकच्या आग्नेय दिशेस १२ मैलावर अद्याप याच नावानें प्रसिद्ध आहे याच्या चतु सीमा पूर्वस टेकडी, आग्नेयेस नाला, दक्षिणेस चिंचोलीचा तलाव, वायव्येस वडगाव्या गावाचे पूर्वेकडील टेकडी, उत्तरेस सिंदीखेड्याचे टेकडीची उतरणी व एक वडाचें झाड, ईशान्येस माहल गावचा निगुर्डीपाला तलाव व सेवाईगाव

प्रस्तुत ताम्रपटात सेउणचंद्राचे पदरीं असलेल्या प्रधान मंडळाचा उल्लेख केला आहे तो ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचा आहे तो येणेप्रमाणें १ सेनापती श्रीधर, २ मुख्यप्रधान-वासुदेव, ३ मुख्यमंत्री–भाभीयक, ४ युद्धमंत्री—श्रीनायक, ५ द्रवैयनायक, ६ परराष्ट्रमंत्री–अंथयक राजपुरोहित–सर्वदेवाचार्य हा सोमदेवाचार्याचा शिष्य असून त्यानें शैवपंथीय ग्रथावर अनेक टीका केल्या आहेत शिवाय तो उत्तम वैय्याकरणी होता पाशुपत पंथाचा गोत्र सांप्रदाय आहे त्याचा तो अनुयायी होता

या ताम्रपटावरून नाशिक प्रांतातील चिंचोली गाव दान दिला असून सदर ताम्रपट वसई येथें कसा आला याबद्दल आश्चर्य वाटते यादवराजाचा अम्मल इ स बाराव्यांच्या अखेरीस उत्तर कोकणावर सुरू झाल्यावर त्या प्रांतातील प्रसिद्ध शहर शूर्पारक ऊर्फ सोपारे या ठिकाणीं सर्वदेवाचार्यांचे वंशज देवगिरीच्या यादवाचें राज्य नष्ट झाल्यावर त्या घराण्यातील शिल्लक राहिलेल्या बिंबदेवोनर (रामदेव रावाचा दुसरा मुलगा) आले असल्यास न कळे ! व हा तर्क खरा असल्यास हा ताम्रपट वसई येथें कसा आला याचें निराकरण होतें

## वाघोली येथील शिलालेख

खानदेश जिल्ह्यात चाळीसगावच्या पूर्वेस सहा मैलावर वाघळी या नावाचा गाव आहे तेथें तीन देवळें आहेत
शके ९९१ पैकीं एक जुने पुराणें मयार देवीचे देऊळ आहे
इ स १०६९ त्याच्या उजवीकडे मानभावी पंथाचें एक पडकें देऊळ आहे तें हेमाडपंती पद्धतीनें बांधलेलें असून त्यांनी

लांबी ३० फूट रुंदी २० फूट व उंची ३३ फूट आहे. या देवालयास नक्षीदार खांब आहेत. यावरून तें देऊळ राजाश्रयाखालीं बांधलेलें असावें असें वाटतें. मंदिराच्या बाहेरील अंगास नंदी अद्याप कायम असल्यामुळें तें शिवमंदिर असावें ही गोष्ट निर्विवाद दिसते. प्रस्तुत शिलालेखाचे अ, ब व क असे तीन भाग आहेत. पैकीं "क" मधील दुसऱ्या भागांत **मौर्यकुलप्रदीप गोविंदराज** यानें व त्याचा सम्राट **महामंडलनाथ सेऊण** या उभयतांनीं शके ९९१ आषाढ वा॥ ३० सौम संवत्सरांत सूर्यग्रहणाच्या पर्वणकाळीं संगमावर सिद्धेश्वर देवाचे व्यवस्थेकरितां संगर्भा व मधुवाटिका ही स्थळें दान दिल्याबद्दलचा मजकूर आहे. आषाढ वद्य ३० स्येस सूर्यग्रहण होतें किंवा नाहीं याबद्दल विद्वानांत मतभेद आहेत. अमांत गणित पद्धतीप्रमाणें सूर्यग्रहण २१ जुलै इ. स. १०६९ या दिवशीं पडलें पाहिजे. सदरील सूर्यग्रहणानंतर पधरा दिवसानीं म्हणजे शके ९९१ च्या श्रावण शुक्ल १५ स दुसऱ्या सेउणचंद्रानें आणखी एक दानपत्र केलें असावें असें दिसतें. या शिलालेखावरून **गोविंदराज** हा दुसऱ्या **सेउणचंद्राचा** मांडलिक होता असें दिसतें. गोविंदराजाच्या पूर्वींच्या वीस पिढींतील राजांचीं नांवें यांत दिलीं असून तीं ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्वाचीं आहेत. सौराष्ट्रांतील वलभीगांवाहून गोविंदराजाचे पूर्वज सेउणदेशांत (खानदेशांत) आल्याचा मजकूरही त्यांत आहे. हे "वलभी" राजे यादवराजाचे मांडलिक असून उभयतांचें मूलस्थान द्वारावती असावें असें दिसतें.

## अश्वी येथील ताम्रपट.

हा ताम्रपट " भारत इतिहास संशोधक मंडळाच्या " त्रैमासिकांत तिसऱ्या वर्षाच्या पहिल्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. तो गणपतराव मोडक यांजकडून गोविंद शंकर रानडे यांच्यामार्फत

शके १०२०
इ. स. १०९८

सदरील मंडळाचे संशोधकांच्या हातीं आला. वसईच्या ताम्रपटाप्रमाणें प्रस्तुत ताम्रपट एका शेतकऱ्यास आपल्या शेताची नांगरट करीत असतांना सांपडला. ताम्रपटाचे तीन तुकडे असून नेहमीच्या वहिवाटीप्रमाणें ते एका कडींत अडकविलेले आहेत. यादवांना मूळ पुरुष विष्णु याचें वाहन गरुड याची मुद्रा प्रस्तुत कडीवर नाहीं, हें अस्मळ चमत्कारिक असून संशयास्पद दिसतें. ताम्रपटाची भाषा संस्कृत असून अक्षर-च-टिका अकराव्या शतकांतील देवनागरी आहे. ताम्रपटांत उल्लेखिलेले यादवराजे देवगिरीच्या यादवाचे पूर्वज होते हें निःसंशय होय. हें घराणें इतिहासांत चांदवड अथवा सेउणदेशचे यादवांचें म्हणून प्रसिद्ध आहे. प्रस्तुत ताम्रपट परिशिष्ट नं. ४ मध्यें दिला आहे. त्यांत दिलेली वंशावळ दृढप्रहारापासून सुरू होऊन तिसऱ्या भिल्लमाचा मुलगा इरम्मदेव ( परम्मदेव ?) याजपर्यंत आहे. ती या भागाच्या अखेरीस नं. ४ त दिली आहे.

हेमाद्रीच्या व्रतखंडांतील वंशावळीशीं सदरील वंशावळ जुळत नाहीं. व्रतखंडांतील वंशावळीत दुसरा धाडीयम, पहिला वेसुगी, अर्जुन, दुसरा वादुगी व दुसरा वेसुगी, भिल्लम ( ४ ) या राजांचीं नांवें दिलीं आहेत तीं सदर ताम्रपटांत आढळून येत नाहींत. परंतु चवथ्या भिल्लमाचा मुलगा दुसरा सेउणचंद्र व त्याचा मुलगा परमर्दिदेव

ऊर्फ परम्मदेव अशी परंपरा सतखटातील वंशावळींत आहे व त्याला सिंहराज या नावाचा मुलगा होता असें म्हटलें आहे. सतखटात तिसरा भिल्लम व चवथा भिल्लम याच्या दरम्यात वादुगी (दुसरा) व वेसुगी (दुसरा) अशा दोन राजाची नावें दिलीं आहेत ती मस्तुतच्या ताम्रपटात नाहींत. परम्मदेव व इरम्मदेव हे एकच असले पाहिजेत. परम्मदेवाचें प्राकृतात इरम्मदेव असें रूपांतर होणें शक्य आहे. सर भांडारकर यांच्या दख्खनच्या इतिहासात सतखडातील प्रशस्ति दिली आहे. त्यात प(ग) रम्मदेव असा पाठ दिला आहे. सबब सदर ताम्रपटातील इरम्मदेव याचे नाव पूर्वीच्या कोणत्याही वंशावळींत आढळून येत नाहीं असें भा इ म मंडळाच्या उपरिनिर्दिष्ट केलेल्या त्रैमासिकातील प्रास्ताविक लेखात जें विधान केलें आहे तें बरोबर नाही. शके १०२० च्या वैशाख ३० स बहुधान्यसंवत्सरात (३ मे इ स १०९८) सोमवती अमावास्येच्या पर्वकालीं नर्मदापुर या नावाच्या पवित्र क्षेत्रात इरम्मदेवानें कोंकणे गाव ब्राह्मणास दान दिला असा उल्लेख प्रस्तुत ताम्रपटात आहे. दानपत्रात कोंकणेग्राम असा उल्लेख असून त्याच्या चतु सीमा येणें प्रमाणें—संगमनेर चौऱ्याऐशीं मधील कोंकणगावच्या चतु सीमा (हा गाव अहमदनगर जिल्ह्यातील संगमनेरपासून तीन मैलावर आहे) पूर्वेस –दुदुदेव म्हणजे हल्लींचे दुधेश्वर नावाचें देवालय–आग्नेयेस –कोंवचगाव–हल्लींचे कोंची, दक्षिणेस –मणिय वल्ली म्हणजे हल्लींचें मनोली, नैऋत्येस –जुइखे गाव म्हणजे हल्लींचें जोवें, पश्चिमेस –वडगाव, वायव्येस सगरी म्हणजे हल्लींचें सागवी, व उत्तरेस कपिथ्थक म्ह हल्लींचें कवठें

प्रस्तुत ताम्रपटांत इरम्मदेव हा तिसऱ्या भिल्लमाचा नातु व दुसऱ्या सेउणाचा मुलगा होता व त्याचा विवाह योगिल्ला नांवाच्या स्त्रीबरोबर झाला होता असें म्हटलें आहे. ही योगिल्ला कोणत्या राजकुलांतील असावी हें समजण्यास साधन नाहीं. त्रिभुवनमल्लानें संपादिलेले सात देश इरम्मानें आपल्या पराक्रमानें जिंकून आपला सार्वभौम राजा परमार्दिन यास परत मिळवून दिले अशी हकीकत या ताम्रपटांत दिली आहे. ' व्रतखंडात ' परम्मदेव हा चवथ्या भिल्लमाचा नातु व दुसऱ्या सेउणाचा मुलगा होता असें म्हटलें आहे. व दुसऱ्या सेउणानें पराक्रम करून परम्मदेवाचा त्याच्या शत्रूपासून बचाव करून कल्याणच्या राजाची गादी त्यास मिळवून दिली अशी हकीगत दिली आहे. दुसऱ्या सेउणराजानें केलेले पराक्रम त्याचा मुलगा इरम्मदेव अथवा परम्मदेव याच्या नांवावर या ताम्रपटांत लादलेलें असावेत असें दिसतें. व्रतखंडांतील प्रशस्तींत दुसरा सेउण व परम्मदेव यांचेसंबंधानें खालील श्लोकांत वर्णन दिलें आहे तें येणेंप्रमाणें:—

ततोऽपि नृपभिल्लमः समरसीमसीमर्मीया-
निरर्गलभुजार्गलायुगलकाललीलालयः ।
ततः समदमेदिनीपनिपतद्धमेदमनः
प्रतापशिशिरिलंघिताखिलजगद्गुणः सेउणः ॥

समस्कृतो येन महाभुजेन द्विषां विमर्दात्परमर्दिदेवः ।
आस्थापि चालुक्यकुलप्रदीपः कल्याणराज्येपि स एव येन ॥
परम्मदेवः स ततो बभूव द्विरदधूर्नेचयनाग्रपृष्ठो ।
प ( पे ) रम्मदेनेव रत्नांचयेन यस्य प्रतापेन चिरं स्फुराति ॥

यावरून अश्विच्या ताम्रपटात परम्मदेव अथवा इरम्मदेव याचें नाव प्रथम उजेडात आलें, या विधानाचा फोलपणा सहज दिसून येईल प्रस्तुत ताम्रपटात ज्या श्रीपरमर्दिन राजाचा उल्लेख केला आहे तो पश्चिमदेशीय चालुक्य कुळातील त्रिभुवनमल्ल परमर्दि सहावा विक्रमादित्य होय त्यास विक्रमार्क, विक्रमाक, विक्रम, परम्म, परमादि, परमनदी व संस्कृतरूपात " परमर्दि " या नावानें शिलाशासनात, ताम्रपटात, व इतरत्र उद्बोधिलें आहे त्यास तीन भाऊ होते ( १ ) थोरला सोमेश्वर, (२ ) जयसिंह, व ( ३ ) विष्णुवर्धन ( विनयादित्य ) (पैकीं) सोमेश्वर हा शके ९७५ (इ स १०५३) मध्यें गादीवर बसला तो आपल्या नावामागें 'त्रिभुवनैकमल्ल' असें बिरुद लावून घेत असे त्याचा बाप पहिला सोमेश्वर हा 'त्रैलोक्यमल्ल' असें बिरुद आपल्या नावा मागें लावीत असे आपले पश्चात् आपले थोरले मुलास गादी मिळू नये अशी पहिल्या सोमेश्वराची मनापासून इच्छा होती, व त्यानें हा मनोदय आपला दुसरा मुलगा विक्रमादित्य यास कळविला होता, परतु पहिला सोमेश्वर हा विक्रमादित्याबरोबर स्वारींत गुतला असता एकाएकीं कालवश झाला, त्यामुळें त्याचा हा मनोदय सिद्धीस गेला नाहीं रीतीप्रमाणें थोरला सोमेश्वर आपल्या बापाचे मागें गादीवर बसला थोड्याच काळात सोमेश्वराच्या जुलमी व अन्यायी कारकीर्दीस त्याची प्रजा कटाळली त्याचा दुसरा भाऊ विक्रमादित्य यास आपले भावाची राज्य करण्याची पद्धत आवडली नाहीं व तो आपला धाकटा भाऊ जयसिंह यासह कल्याण राजधानी सोडून बाहेर पडला सोमेश्वरानें आपल्या फौजेसह त्याचा पाठलाग केला परतु त्या कामीं त्यास यश आलें

नाही विक्रमादित्यानें केरळ, चोल, वेंगी, येथील राजाना शह देऊन त्याना आपलें अंकित केलें पुढें वेंगीचा राजा राजिग, पूर्वचालुक्य वंशीय राजेन्द्र, व विक्रमादित्याचा भाऊ (दुसरा) सोमेश्वर या तिघांनी संगनमत करून विक्रमादित्याबरोबर घनघोर संग्राम केला त्या कामीं यादववंशीय (दुसरा) सेऊण यानें ऐनवेळीं विक्रमादित्यास चांगली मदत केल्यामुळें त्यास पराकाष्ठेचें यश मिळालें व सोमेश्वर त्याच्या हस्तगत झाला पुढें त्यास पदच्युत करून विक्रमादित्यानें कल्याणची गादी मिळविली त्याचा पट्टबंधोत्सव (राज्याभिषेकोत्सव) शके ९९८ (इ स १०७६) वरनाम संवत्सरी झाला (दुसरा) सेऊणचंद्र हा चालुक्यवंशीय परमर्दिन विक्रमादित्याचा समकालीन होता व तो शके ९९१ सालीं राज्य करीत होता या हकीगती वरून चालुक्यवंशीय परमर्दिन राजास इरम्मदेव अगर परम्मदेव यांजकडून मदत झाल्याचें दिसून येत नाहीं व तशाप्रकारचा उल्लेखही कोठें आढळून येत नाहीं

बसई व वाघोली येथील ताम्रपटात दुसऱ्या सेऊणचंद्राचा प्रामुख्यानें उल्लेख केला आहे तो फार पराक्रमी होता असें त्याचें वर्णन केलें आहे वाघोलीच्या ताम्रपटात मौर्यकुलप्रदीप गोविंदराज याम महामंडळनाथ (दुसरा) सेऊणचंद्र याचा मांडलिक असें म्हटलें आहे वरील विवेचनावरून यादववंशीय दुसरा सेऊणचंद्र व चालुक्यवंशीय परमर्दिन विक्रमादित्य (सहावा) हे समकालीन असून एकमेकांशीं मित्रत्वाच्या नात्यानें वागत असत असें दिसून येतें प्रस्तुत ताम्रपटांतील " श्रीयोगिन्द्रेति य नाम्ना रविनें भुवश्रयम् " या वाक्याचा नीट बोध होत नाहीं 'य' च्या ऐवजीं 'यस्य'

असा पाठ गृहीत धरल्यास, त्रिभुवनाला रजविणारी केवळ लक्ष्मी-सारखी ' योगिल्ला ' या नावाची ज्याची भार्या असा इरम्मदेव, असा या ओळीचा सरळ अर्थ निघतो. परतु ' योगिल्ला ' असें नाव कोठेंही आढळून येत नसून ती इरम्मदेवाची बायको असल्या-बद्दलचा कोठेंही उल्लेख नाही. या परमर्दिन विक्रमादित्यानें ५० वर्षे राज्य केलें व शालिवाहन शक झुगारून देऊन त्यानें आपल्या नावाचा शक सुरु केला त्यास एकदर सहा राण्या होत्या. पैकीं पट्ट-राणीचें नाव लक्ष्मादेवी असून ती शके १०१६ मध्यें कल्याण राजधानींत राहून आपला अम्मल गाजवीत असे. शके १०२७ मध्यें १८ अग्रहाराचा धर्मापुर येथें, व शके १०३१ मध्यें नित्तर्मिगी गावावर तीं आपला अमल चालवीत असे, असें तिच्याविषयीं वर्णन दिलें आहे. यावरून विक्रमादित्याची वैभवशाली व प्रतापी पट्टराणी तीन ठिकाणीं आपला अमल चालवीत होती असें तत्कालीन चालुक्य-राजाच्या शिलाशासनावरून दिसतें कदाचित् ताम्रपट ज्याच्या नेतृत्वाखालीं तयार झाला त्याच्या नजरचुकीमुळें अगर ऐतिहासिक-ज्ञानाच्या अभावामुळें 'परमर्दिन' व इरम्मदेव यादव हे एकच असावे असें समजून वरील प्रकारचा घोटाळा झाला असल्यास नकळे!!

प्रस्तुत ताम्रपट पंडित भगवानलाल इंद्रजित यांचे नजरेखालून गेला असावा असें दिसते. या ताम्रपटाच्या चौदाव्या ओळींत " अर्वाक्तम्य " असें पद आहे त्याचा अर्थ पंडित मजकूर ह्यानीं ' त्याच्यापूर्वी ' असा केला आहे. परतु त्या पदाचा खरा अर्थ 'त्याचे पश्चात्' असाच केला पाहिजे असें सर रामकृष्णपंत भांडारकर ह्यानी सप्रमाण सिद्ध केलें आहे. ताम्रपटाच्या एकोणिसाव्या

ओळींतील "यदन्वया" ह्या पदाचा अर्थ पंडित मजकूर यांनी "राष्ट्रकूटवंशातील झंझराजाची कन्या लस्थियव्हा हिला दत्तक घेतलें" असा केला आहे हा अर्थ अप्रस्तुत असून ऐतिहासिक-दृष्ट्या चुकीचा आहे म्हणून सर रामकृष्णपंत भांडारकर यांनी 'यदन्वया' या पदाऐवजीं 'यद्वन्वया' असा पाठ सुचविला आहे हा पाठ स्वीकारला असता यांतील अर्थाची सुसंगत व्यवस्था लागते शिलाहार वंशातील राजकन्या लस्थियव्हा हिचा विवाह यादववंशीय राजाबरोबर होऊन त्यास पुत्र झाला तो अल्पवयस्क असताना त्याचे वडील निवर्तले म्हणून तो बालराजा सज्ञान होईपर्यंत सर्व राज्यकारभाराचें ओझें तिजवर पडलें व ती यदुकुलाचा आधारस्तंभ झाली या विलक्षण परिस्थितीमुळें सदरील लस्थियव्हा, ही राष्ट्रकूट, शिलाहार, व यादव या तिन्ही कुलाच्या आदरास प्राप्त झाली असा सरळ अर्थ लावण्याचें सोडून पंडितमजकूर विनाकारण आडरानात शिरले असा सर रामकृष्ण-पतांनीं आपला अभिप्राय दख्खनच्या इतिहासांत नमूद केला आहे

व्रतखंडातील वंशावळीप्रमाणें वेसुकीनंतर अर्जुन या नावाचा राजा झाला परंतु पंडित भगवानलाल याम मिळालेल्या दानपत्रांत अर्जुनाचे नांव गाळलें असून एकदम भिल्लमाच्या नावाचा उल्लेख केला आहे त्याचा विवाह चालुक्यवंशीय जयसिंहाची कन्या व आहवमल्ल यांची बहीण हम्मा ऊर्फ अव्वल्लदेवीबरोबर झाल्यानें पूर्वी म्हटलेंच आहे या भिल्लमानें आहवमल्लाचा (म्ह० दुसऱ्या सोमेश्वराचा) मांडलिक म्हणून अनेक लढाया मारिल्या भिल्लमानंतर पंडितजमजकूरच्या दानपत्रांत सेउणाचें नाव दिलें आहे व तें दानपत्र त्याच्याच वेळचें आहे असें पंडितजींचें म्हणणें आहे

उपरिनिर्दिष्ट भिल्लम ( म्ह० अहवमल्लाचा मेहुणा ) हा पंडितजींच्या दानपत्रांतील भिल्लमापासून भिन्न होता यांत संशय नाहीं. कारण प्रस्तुत ताम्रपटांतील २५ व्या ओळींत सेउण याम भिल्लमाचा पुत्र असें न म्हणतां भिल्लमाच्या वंशांत उत्पन्न झालेला इतकेंच म्हटलें आहे. यावरून या उभयताम्ध्यें जो तीन पुरुषांचा खंड पडलेला दिसतो, याचा उलगडा होतो. कदाचित् या वगळलेल्या तीन पुरुषांची कारकीर्द ताम्रपटकर्त्यास महत्वाची न वाटल्यामुळें त्यांचा त्यानें नामनिर्देश केलेला नसावा. खुद्द व्रतखंडांत वरील भिल्लमाचा मुलगा वासुगी याची, कवि मधुर शब्दानें प्रशंसा करीत असत एवढेंच म्हटलें आहे व त्याचेनंतर गादीवर बसलेल्या वेसुगीनें आपल्या राज्यांतील शिरजोर झालेल्या माडलिकांचा बीमोड केला असा उल्लेख आहे. वेसुगीच्या पश्चात् बसलेला भिल्लम हा महापराक्रमी होता एवढाच त्याच्यासंबंधीं व्रतखंडांत उल्लेख केलेला आहे. पंडित भगवानलाल इंद्रजित यास मिळालेलें दानपत्र शके ९९१ सौमनाम संवत्सरांतील आहे. व चालुक्यवंशीय विक्रमादित्यानें कल्याण राजधानी शके ९९८ नलनाम संवत्सरीं हस्तगत केली व आपणास राज्याभिषेक करून घेतला. पंडित भगवानलाल यास नाशिकनजीकच्या अजनेरी गावीं शके १०६३ चा एक शिलालेख मिळाला त्यांत सेउणचंद्रासंबधानें दिलेलें वर्णन व्रतखंडांतील माहितीशीं जुळतें. अर्धीच्या ताम्रपटांतील ३९ ते ४१ या ओळींतील मजकुरावरून दानपत्राच्या मितीस चालुक्यवंशीय त्रिभुवनमल्ल परमर्दिदेव यांचें राज्य होतें असें दिसतें तो आपणास पुढीलप्रमाणें बिरूदें लावीत असे " पृथ्वीवल्लभ, महाराजाधिराज, परमेश्वर,परमभट्टार्क, सत्याश्रय, चालुक्याभरण, इत्यादि "

इश्मदेव यास महामंडलेश्वर असें संबोधिलें आहे. कोंकणें गाव, कन्हाड येथून आलेल्या शाकलशाखेच्या काश्यपगोत्री कुक्कुलपंडितादि तीस ब्राह्मणांस दान दिल्याचा मजकूर यांत आहे. त्याचे पूर्वज कन्हाडाहून सेउण देशांत येऊन राहिल्याचा या ताम्रपटांत उल्लेख केला आहे. ताम्रपटांतील मजकुरावरून तो क्रमवंत ब्राह्मणांपैकीं असावा असें दिसतें.

## अंजनेरी येथील शिलालेख.

हा शिलालेख तिसऱ्या सेउणचंद्राच्या वेळचा आहे असें त्यांतील मजकुरावरून दिसतें. नाशिकच्या वायव्यदिशेस १५ मैलांवर अंजनेरी हें गांव आहे, तेथें सदर शिलालेख सांपडला. तो उत्तम स्थितींत असून संस्कृतांत आहे. लिपि देवनागरी आहे. यांत दिलेली यादवांची वंशावळ या भागाच्या अखेरीस नं.      मध्यें दिली आहे.

शके १०६३-६४
इ. स. ११४१-४२.

ही वंशावळ व्रतखंडांतील वंशावळीहून बरीच भिन्न आहे. पहिल्या धाडीयप्पाचा मुलगा पहिला भिल्लम याग श्रीराज नांवाचा बंधु होता असें या शिलालेखांत म्हटलें आहे. व्रतखंडांत राजुगी हा पहिल्या भिल्लमाचा मुलगा होय असें म्हटलें आहे. त्यानंतर दुसरा धाडीयप्पा व दुसरा भिल्लम यांस वगळून तेमुक या पुरुषाचें नांव दिलें आहे. वसईच्या ताम्रपटांत वेसुकाच्याऐवजी तेसुक असें नांव देऊन जशी चूक झाली आहे तशाच प्रकारची चूक या शिलालेखांत झाली असावी असें दिसतें. यासिवाय झंझराजानी कन्या लच्छियव्वा हिचा विवाह वड्डिगाबरोबर, चालुक्य वंशांतील एका कन्येचा विवाह वेसुकाबरोबर,

आणि चालुक्य वंशीय जयसिंहाच्या बहिणीचा विवाह दुसऱ्या सिंघमा-बरोबर झाल्याबद्दलचा मजकूर या शिलाशासनांत दिला आहे तो पूर्वी दिलेल्या कोणत्याहि शिलाशासनांत अगर ताम्रपटांत नमूद त्यास इतिहासाचा आधार नाहीं. तसेंच व्रतखंडांत दिलेल्या वंशावळींत अगर इतर कोणत्याहि वंशावळींत या तिसऱ्या सेउणचंद्राचा उल्लेख केलेला नाहीं. यावरून या शिलालेखांत पहिल्या सिंघमानंतर उल्लेखिलेले राजे यादववंशापैकीं मुख्य शाखेंतील नसून त्यांच्या उपशाखेपैकीं असावे असें दिसतें. सर रामकृष्णपंत भांडारकर यांचें मत या प्रमाणेंच आहे. या शिलालेखांत अंजनेरी येथील जैन चंद्रप्रभा मंदिराचे व्यवस्थेसाठीं तिसऱ्या सेउणचंद्रानें तीन दुकानें त्या गांवांतील शेटजी वत्सराज व दशरथ यांच्या स्वाधीन केल्याचा उल्लेख आहे. जिनप्रभासुरीच्या "नासक कल्प" ग्रंथामध्यें पुढील आख्यायिका आहे. ती अशी "दिव्यांग ऋषीनें द्वारावती नगर जाळून भस्म केल्यानंतर यादवकुलाचा संपूर्ण नाश होईल या भीतीनें, यादवकुमार वज्र याची स्त्री पूर्ण मासाची गरोदर होती तिचा अग्निपासून बचाव व्हावा म्हणून त्यानें तिला आठवे तीर्थंकर चंद्रप्रभास्वामी याचे मंदिरांत आश्रयासाठीं नेलें. तेथें तिला दृढप्रहार नांवाचा मुलगा झाला. तो फार पराक्रमी असून शत्रूंनां केवळ कर्दनकाळ भासे. त्यानें चंद्रादित्यपुर नांवाचें नगर स्थापिलें त्या ठिकाणीं चंद्रप्रभासस्वामींचें जैन मंदिर अद्याप आहे. सदरील मंदिरांत यादव राजांची वंशावळ आहे ती प्रस्तुत शिलालेखांतील वंशावळीशीं जुळते.

प्रस्तुत ताम्रपटाची ऐतिहासिकदृष्ट्या कांहींएक किंमत नाहीं

असें पूर्वी म्हटलें आहे. जैन धर्माची महती वाढविण्याच्या हेतूनें तद्धर्मीयांनी ऐतिहासिक सत्याची पर्वा न करितां वाटेलतशी भरमसाट वंशावळ दिली आहे.

## गदग येथील शिलालेख.

धारवाड जिल्ह्यातील गदग या गावीं नारायणदेव व त्रिकुटेश्वर या नांवाचीं दोन देवळें आहेत त्यांत संस्कृत व कानडी भाषेंत लिहिलेले बरेच शिलालेख आहेत. पैकीं त्रिकुटेश्वराचें मंदिर फार प्राचीन असून त्याच्या बांधणीवरून तें पूर्वी जैनधर्मीय असावें असें दिसतें. या दोन

शके ११२३
इ. स. ११०१

देवळांत एकंदर अकरा शिलालेख आहेत. पैकीं नऊ एकट्या त्रिकुटेश्वराचे सभामंडपांत असून बाकीचे नारायणदेवाचे मंदिरांत आहेत. यांपैकीं काहीं महत्वाच्या शिलालेखांतील त्रोटक माहिती पुढें देण्यांत येत आहे. नं. २ च्या शिलालेखांत अहवमल्ल देवाचा मांडलिक राजा शोभन यानें शके ९८४ मध्यें त्रिकुटेश्वर देवास स्थावर मिळकत दान दिल्याचा उल्लेख आहे. नं. ३ चा शिलालेख संस्कृत भाषेंत असून कानडी लिपींत आहे. द्वारावतीपुराशीं आपला मूळ संबंध जोडून आपण यादववंशीय आहों असें म्हणविणाऱ्या होयसल यादवकुलाची वंशावळ यांत दिली आहे. शके १०२३ मध्यें त्रिकुटेश्वरास काहीं जमीन दान दिल्याचाही यांत उल्लेख आहे. चालुक्यवंशीय राजे जयसिंह, अहवमल्ल, दुसरा विक्रमादित्य व अहवमल्लाची राणी एकलदेवी यांचीं नांवें यांत

आढळतात. होयसल यादवकुळाची वंशावळ यांत दिली आहे ती येणेंप्रमाणें.




नं. ४ च्या शिलालेखातील दानपत्रात होयसल राजा वीरबल्लाळदेव याचा मंत्री रायदेव (बेळगाह्ळाचा सुभा),—वर्सादेवाचा मुलगा, व मयूरपुरचा अधिपति—यानें दान दिलेल्या गावाचा उल्लेख आहे. तसेंच वीरबल्लाळानें यादवराजा भिल्लमदेव याचा पराभव करून त्याचेकडून कुतल्देश हिसकाऊन घेतला, व लुक्कुडि येथें आपली राजधानी स्थापिली वगैरे मजकूर यात दिला आहे. पाचव्या भिल्लमाच्या वेळचे प्रस्तुत शिलालेखाशिवाय पुढें लिहिलेले तीन शिलालेख आहेत —(१) मत्तुगि [विजापुर] शके ११११, (२) अन्नेगिरि (धारवाड जिल्हा) शके ११०९ व (३) अमृतेश्वर येथील शिलालेख. प्रस्तुतच्या शिलालेखात पाचव्या भिल्लमानें २३ सप्टेंबर ११९१ रोजीं सूर्यग्रहणाच्या पर्वकालीं हेम्मरच्या छावणींतून आपला प्रधान जैतसिंह याचे विनंतीवरून धार्दी.

गांव दान दिल्याचा उल्लेख आहे. तसेंच त्यानें आपल्या नांवापूर्वी पुढें दिलेली विरुदें लाविली आहेत. १ 'समस्तभुवनाश्रय' २ 'महाराजाधिराज'- ३ 'प्रतापचक्रवर्ति' ४ 'श्रीपृथ्वीवल्लभ' ५ 'परमेश्वर' ६ 'परमभट्टारक वगैरे. इ. स. ११८७ च्या अगोदर पश्चिमेकडील चालुक्यवंशीय चौथ्या सोमेश्वराचा तो मांडलिक होता व त्यानें उत्तरेकडील बरेच प्रदेश जिंकून घेतले होते. इ.स. ११८९ च्या अन्नेगिरी येथील शिलालेखांत कर्नाटक प्रांताच्या राज्यलक्ष्मीचा तो वल्लभ झाला म्हणजे त्या प्रांतावर त्यानें आपला अम्मल बसविला असें म्हटलें आहे. तसेंच गदग येथील शिलालेखांत नमूद केलेल्या दानपत्रावरून तो त्यावेळीं हेरूर येथील छावणींमध्यें दक्षिणेकडील प्रांतावरील मोहिमेंत गुंतला होता असें दिसतें. पांचव्या भिल्लमाचा नातु सिंघण याचे वेळच्या शिलालेखांवरून असें दिसतें की गोवा व हंगल येथील कदंबराजे, कऱ्हाडचे शिलाहारराजे, सौदत्तिच रट्टराजे, व होयसळचे यादव यांनी पांचव्या भिल्लमाचे व त्याचा पहिला मुलगा जैतुगि (जैत्रपाल) यानें सार्वभौमत्व कबूल केलें नव्हतें. याशिवाय पश्चिमेकडील चालुक्यांच्या राज्यांपैकीं बराच भाग त्याचे अंमलाखालीं आला नव्हता.

परम्मदेवाचे मागून सिंदराज गादीवर बसला. त्याचे पश्चात त्याचा भाऊ गादीवर बसला. त्याचें नांव वंशावळींत दिलेलें नाहीं. परंतु 'मनरंजन' दिलेल्या वर्णनावरून तो महापराक्रमी होता असें दिसतें. लक्ष्मीपुर (तंजावर) येथून कर्पूरतिलक नांवाचा हत्ती आणवून त्यानें कर्पूरव्रत पुरें केलें. त्याचे पश्चात मल्लुगी याम

राज्यपद मिळालें त्यानें शत्रूशीं लढाई करून पर्णगेट ( पैठण ) नावाचें शहर मोठ्या पराक्रमानें जिंकून घेतलें व तें आपलें वसति स्थान केलें उत्कल उर्फ ओरिसा देशाच्या राजाचे पदरीं हत्तींचा मोठा समुदाय होता तो त्यानें मोठ्या पराक्रमानें आपल्या ताब्यात घेतला मल्लुगीच्या मागून अमरगांगेय हा राजा झाला व त्याचे पश्चात गोविंदराज हा गादीवर बसला त्याचे मागून मल्लुगीचा मुलगा अमरमल्गी, व त्याचे पश्चात कालीयवल्लाळ हे अनुक्रमानें गादीवर बसले या कालीय वल्लाळाचे पुत्र दुर्बल असल्यामुळें राज्यपदास मुकले व त्यानें राज्य त्याचा महापराक्रमी चुलता पाचवा भिल्लम यानें त्याजपासून हिराऊन घेतलें 'व्रतखंडात' या भिल्लमास कालीयवल्लाळाचा चुलता असें म्हटलें आहे त्यावरून तो उपरिनिर्दिष्ट मल्लुगीचा मुलगा म्हणजे अमरमल्गीचा भाऊ असावा असें दिसतें त्यास राज्यपद मिळालें त्यावेळीं तो अतिशय वृद्ध असल्यामुळें त्यास राज्याचा उपभोग फार वर्षे घेता आला नाहीं तो शके ११०० मध्यें गादीवर बसला व शके १११३ त कालवश झाला सदरील भिल्लमानें चालुक्याचा पराभव करून त्याचें सार्वभौमत्त्व हिरावून घेतलें

म्हैसूर देशातील हळेबीड येथील होयसळ यादव हे चालुक्यवंशीय त्रिभुवनमल्ल उर्फ विक्रमादित्य याच्या राजवटींत फार बलाढ्य होत चालले होते व 'दक्खन' देशचें सार्वभौमत्व आपणास मिळावें अशी त्याची महत्वाकांक्षा होती होयसळ यादवराजा विष्णुवर्धन यानें चालुक्याच्या मुलखावर स्वारी केली व कृष्णावेण्या या नद्यांच्या काठीं तळ देऊन चालुक्याच्या सैन्यास शह दिला परंतु चालुक्य राजाचें सैन्य मोठें असून त्याचे मांडलिक आपल्या सार्वभौम राजाशीं

पूर्ण राजनिष्ठ असल्यामुळें होयसलांचा त्यांच्यापुढें टिकाव लागला नाहीं. कांहीं वर्षांनीं चालुक्य वंशांतील राजे दुर्बल झाल्यामुळें त्याचे पदरीं असलेल्या कलचुरी वंशांतील विज्जलानें आपल्या धन्याचें राज्य बळकाविलें. हा विज्जल चालुक्यवंशीय तिसऱ्या सोमेश्वराचे मागून गादीवर बसलेल्या जगदेकमल्लाचा मांडलिक होता. परंतु पुढें थोड्याच वर्षांनीं चालुक्यवंशीय राजा चौथा सोमेश्वर यानें कलचुरी-वंशीय राजाकडून कांहीं प्रांत पराक्रमानें परत मिळविले. बाकीचे प्रांत यादवराजांनीं पूर्वी जिंकून घेतले होते.

याप्रमाणें नर्मदा व कावेरी या नद्यांच्या टापूंत चालुक्य, होयसल यादव, व कलचुरि यांचा तिरंगी झगडा चालू असता उत्तरेकडील यादव स्वस्थ बसले नव्हते. मल्लुगीचा मुलगा पांचवा भिल्लम यानें अंसल राजाकडून श्रीवर्धन नांवाचें नगर युद्ध करून हस्तगत केलें, तसेंच प्रत्यंडक राजाचा त्यानें पुरा मोड केला. धरील राजाबद्दल कांहीं एक माहिती उपलब्ध नाहीं. मंगलवेष्टक ( हल्लींचें मंगळवेढें ) येथील श्रीविल्लण नांवाच्या राजाशीं युद्ध करून त्यास यममदनीं पाठविलें. तसेंच कल्याणची राजसत्ता होयसल यादवांपासून हिसकून घेऊन तेथील राजाचा नाश केला. याप्रमाणें कृष्णानदीच्या उत्तरेकडील मुलुखाचा तो मालक बनला. त्यानें देवगिरी येथें राजधानी स्थापून शके ११०९ इ. स. ११८७ सालीं देवगिरी येथें आपणास राज्याभिषेक करविला.

मनुगि येथील इ. स. ११८९ च्या म्हणजे शके ११११ च्या शिलाशासनावरून यादवराजा पांचवा भिल्लम हा तेनियलहरीट येथें

राज्य करीत होता परंतु या गावामसंबंधीं कांहींच माहिती मिळत नाहीं तो मालवराजानंतरोंनर झगडला गुर्जर राजे हेच कोणी हर्षी याना तो केवळ अजुश होता असें त्याचें काव्यमय वर्णन प्रस्तुत शिलालेखात केलें आहे शके ११५० च्या हरळाहल्लीच्या रतिग्राम येथील व शके ११९० च्या हरिहर येथील ताम्रपटात यादवाच्या वंशावळी दिल्या आहेत त्यात पाचव्या भिल्लमाचा उल्लेख आहे या वंशावळी या भागाच्या अखेरीस दिल्या आहेत

पाचवा भिल्लम व होयसळ यादव वीरबल्लाळ या उभयतांची दक्खनचें सार्वभौमत्व मिळविण्यासंबंधीं स्पर्धा चालू होती त्याचे दरम्यान अनेक लढाया झाल्या त्यात अखेर लोक्किगुंदि (हल्लीचें लकुंडी) येथें निकराची लढाई होऊन भिल्लमाचा मुलगा जैतुगी याचा पूर्ण पराभव झाला, व वीरबल्लाळानें दक्षिणेकडील भाग आपल्या पूर्ण अमलाखालीं आणिला याप्रमाणें सेउणदेशच्या ऊर्फ पूर्वकालीन यादवाच्या वंशाची मूलस्थापना शके ६७६ (इ स ७५४) च्या सुमारास होऊन तिचा शेवट पाचव्या भिल्लमाच्या मृत्यूनंतर म्हणजे शके ११२३ मध्ये (इ स १२०१) झाला याचा अर्थ यादवकुल नष्ट झालें असा नसून त्याचा वंश, जैत्रपालापासून देवगिरीचे यादव (अथवा उत्तर कालीन यादव) म्हणून ओळखिला जाऊ लागला पाचव्या भिल्लमाचे मागून शके ११२३ इ स ११०१ मध्ये जैत्रपाल ऊर्फ जैतुगी हा गादीवर बसला त्यानें होयसळ यादवराजा वीर बल्लाळ यानंतरोंनर पाचव्या भिल्लमानें

केलेल्या युद्धांत बराच पराक्रम गाजविला होता. व्रतखंडांत त्याच्या पराक्रमाचें वर्णन केलें आहे तें असें—

तदनु मदनमूर्तिः कार्तिकीचन्द्रसान्द्रद्युतिविशदयशोभिः
शोभिताशावकाशः।
अभवदवनिपालो जैत्रपालः करालः प्रहरणरणरङ्गत्तुङ्गदुत्तुङ्गखङ्गः॥
दीक्षित्वा रणरङ्गदेवयजने प्रोद्दस्तशस्त्रस्रुवः
श्रेणीभिर्जगतीपतीन्हुतवतायेनप्रतापानले।
तिलङ्गाधिपतेः पशोर्विशसनं रौद्रस्य रौद्राकृतेः
कृत्वापूरुषमेधयज्ञविधिना लब्धस्त्रिलोकीजयः॥

वरील श्लोकाचा आशय असा कीं समरभूमी हेंच पुण्यक्षेत्र मानून जैत्रपालानें यज्ञकंकण बांधिलें आणि तेथें आपला प्रतापाग्नि सिद्ध करून त्यांत आपली शस्त्रें ह्याच कोणी समिधा असें कल्पून त्यांच्या सहाय्यानें प्रथम पुष्कळ राजांच्या आहुति देऊन अखेर तेलंगाचा स्वामी जो अत्यंत क्रूर रुद्र नांवाचा राजा त्यालाही त्यांत आहुती देऊन तो नरमेध समाप्त केला, आणि तीन लोकांवर जय मिळविला. वारंगळानजीक अनमकोंड येथें काकतेय कुळांतील ज्या रुद्रदेवाचा शिलालेख सांपडला आहे तोच हा रुद्र असावा यांत शंका नाहीं. इतर शिलाशासनांतही तेलंगणचा राजा रुद्रदेव याजबरोबर जैत्रपालानें युद्ध झाल्याचें वर्णन केलेलें आढळून येतें, व आंध्र राजाच्या स्त्रियांचें सर्व सौख्य याच जैत्रपालानें हरण केलें असें काव्यमय वर्णन इतर ठिकाणी केल्याचें दिसून येतें.

प्रख्यात गणितीं व ज्योतिषि भास्कराचार्य याचा मुलगा लक्ष्मीधर

हा जैत्रपाल राजाचे पदरी होता व त्याच्या दरबारांतील सर्व विद्वानांत तो अग्रगण्य गणला जात होता. गणित व ज्योतिष याविषयांशिवाय न्याय व मीमांसा या दोन शास्त्रांतही तो पारगत होता. पुढें दिलेल्या पाटणच्या शिलालेखांत याबद्दलचा उल्लेख केलेला आहे.

## पाटण येथील शिलालेख ( खानदेश )

खानदेशांत चाळिसगावचे नैऋत्य दिशेस दहा मैलावर असलेल्या पाटणगांवीं प्रस्तुत शिलालेख डॉ. भाऊ दाजी यांस सापडला. हा संस्कृत भाषेंत लिहिलेला असून गद्य-पद्य आहे. लिपी देवनागरी आहे. यादवराजाचे मांडलिक निकुंभ घराण्यापैकीं सोईदेव व हेमाडिदेव यांनीं ज्योतिषशास्त्राच्या अध्ययनासाठीं वेधशाळा स्थापिली.

शके ११२८-११२९
इ. स. १२०६-१२०७

या वेधशाळेच्या कायमच्या सुव्यवस्थेसाठीं त्यांनीं शके ११२८ प्रभव संवत्सरीं श्रावण महिन्याच्या पौर्णिमेस चंद्रग्रहणाच्या पर्वणीवर भूमिदान केलें. व भविष्यकाळींहि राजे लोकांनीं पुण्यवृद्धीसाठीं या वेधशाळेची जोपासना करावी अशी त्यांत इच्छा प्रदर्शित केली आहे. या श्रावण पौर्णिमेस चंद्रग्रहण नव्हतें. शके ११२९ च्या श्रावण १५ ला होतें. तत्कालिन जैत्रपाल यादवराजानें सदरील वेधशाळेस देणगी दिल्याचें कोठें आढळून येत नाहीं. या शिलालेखांतील मजकुरावरून तत्कालीन ज्योतिषविषयावरील ग्रंथ रचणारास, व दृक्प्रत्यय येण्यासाठीं वेधशाळा वगैरे बांधण्याच्या कामीं, राजाश्रय कसा मिळत असे ही गोष्ट सिद्ध होते. या शिलालेखांत सुप्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य यांची वंशावळ दिली आहे. ती ज्योतिष शास्त्राचा

अभ्यास करणारास महत्त्वाची व बोधप्रद आहे ती अशी—

त्रिविक्रम ( कवि )
|
भास्करभट्ट ( भोजराजाकडून ज्यास विद्यापति ही पदवी मिळाली होती )
|
गोविंद
|
प्रभाकर
|
मनोरथ
|
महेश्वराचार्य ( कवि )
|
भास्कराचार्य ( सुप्रसिद्ध ज्योतिषी )
|
लक्ष्मीधर ( यादवराजा पहिला जैतुगी याचे पदरचा मुख्य पंडित )
|
चांगदेव (सिंघणराजाचे पदरचा प्रख्यात ज्योतिषी व थोर विद्वान् गृहस्थ

या वंशावळीतील त्रिविक्रम हा मोठा कवि होऊन गेला त्याच्या आजाचें नाव श्रीधर असून वडिलाचें नाव देवादित्य होतें त्यानें 'दमयंतिकथा' या नावाचा सुंदर ग्रंथ लिहिला, तो शांडिल्य गोत्री होता त्याचा मुलगा भास्करभट्ट हा धारच्या भोजराजाचे पदरीं पंडित होता त्याने 'करणकुतूहल' नावाचा ग्रंथ लिहिला व त्यास 'विद्यापति' ही पदवी मिळाली होती भास्करभट्टाचा मुलगा गोविंद हा 'सर्वज्ञ' या नावानें प्रसिद्ध आहे या गोविंदाचा पणतु महेश्वराचार्य हा नामांकित कवि होऊन गेला त्यानें 'वृत्ततिलक' या नावाचा ग्रंथ लिहिला. महेश्वराचार्यांचा मुलगा भास्कराचार्य हा सुप्रसिद्ध ज्योतिषी होऊन गेला त्याचे लीलावती, वगैरे अनेक ग्रंथ आहेत त्याचा मुलगा लक्ष्मीधर हा यादवराजा

पहिला जेतुगी ऊर्फ जैत्रपाल याच्या राजवटींत मुख्य पंडित होता. त्याचा मुलगा चांगदेव हा जैतुगीचा मुलगा देवगिरीचा यादवराजा सिंघण याच्या पदरीं प्रख्यात ज्योतिषी होऊन गेला. प्रस्तुत शिलालेखातील संस्कृत भागाच्या शेवटी असलेला मजकूर येणेप्रमाणें —

> श्रीसोइदेवेन मठाय दत्त हेमाद्रिना किंचिदिहा परैश्च ॥
> भूम्यादि सर्व प्रतिपालनीय भविष्यभूपैरिह पुण्यवृद्धौ ॥

स्वस्ति श्री शके ११२८ प्रभव संवत्सरे श्रावण मासे पौर्णिमास्या चंद्रग्रहणसमये श्री सोइदेवेन सर्वजनसन्निधौ हस्तोदकपूर्वक निजगुररचितमठायस्थानदत्त ॥

या शिलालेखाचा विशेष असा आहे कीं, त्यांतील शेवटचा भाग तत्कालीन मराठींत आहे त्यांतील भाषा निकट आहे चांगदेवानें बांधलेल्या वेधशाळेस पाटण गांवातील लोकांनी यथाशक्ति मदत करावी असा त्यांतील भावार्थ आहे तत्कालीन खानदेशी मराठीचा मासला पुढीलप्रमाणें आहे

तद्यथा

ह्या पाटणीं जे केणें उघटे तेहाचा अनि आड जो राउला होता ग्राहकापासीं तो मठा दीन्हला । ब्राह्मणीं जे विक ( ते ) यापासीं ब्रह्मोत्तर ते ब्राह्मणीं दीन्हले । ग्राहकापासी दामाचा वीसोवा आसूपाटी नगरीं दीन्हला ॥ तुल्दा इया चैर। सिद्ध ( ५ ) ॥ बाहीरला आसूपाटी सिधंवे ग्राहकापासी ॥ पाच पोफली य हक्रापासी ॥ पहिले आपाणें आदाणाची लोटी मठा दीन्हली ॥ जेती घाणें वाहती तेती या प्रति पली पली तेल ॥ पथ ( जे ) मविनें ते मठींचेन मापें

बल्लालक्षितिपालपालितभुवा सर्वोपहारश्च य
श्रीसिंहस्य महापतेर्विजयते तद्बाललीलायितम् ॥

वरील श्लोकांत हेमाद्रीनें सिंघणदेवाच्या पराक्रमाचें थोडक्यांत चटकदार वर्णन केलें आहे. कोणा एका जज्जल नांवाच्या राजाचा पराभव करून सिंघणराजानें त्याचे सर्व उन्मत्त हत्ती हिराऊन आणिले. तसेंच कक्कल नांवाच्या राजाचें राज्य त्यानीं जिंकून घेतलें. अर्जुन राजाचा समूळ नाश केला व भोजराजास धरून कारागृहांत टाकलें. रंभागिरी येथील सिंहाप्रमाणें पराक्रमी राजा लक्ष्मीधर यास त्यानें युद्धांत लोळविलें व धारच्या राजाला आपल्या घोडदळानें घेरलें आणि बल्लाळाच्या हातीं असलेला सर्व मुलुख त्यानें काबीज केला आणि हे सर्व पराक्रम जणुकाय बालक्रीडेप्रमाणें सहजगत्या केले. वर नमूद केलेल्या राजांसंबंधीं थोडीशी माहिती देणें जरूर आहे. जनरल कनिंगहॅम् यानें आपल्या आर्किआलॉजिकल रिपोर्ट नांवाच्या ग्रंथांत ( भा. १७ पान ७५ ) चेदी नामक राजकुलाच्या पूर्वेकडील शाखेची वंशावळ दिली आहे, त्यांत जज्जलाचें नांव दिलें आहे. त्याचें आधिपत्य छत्तिसगड प्रांतावर होतें. याच चेदि राजकुलाची पश्चिमेकडील दुसरी एक शाखा होती. त्याची राजधानी त्रिपुर ऊर्फ तेऊर ही होती. त्या शाखेतील राजे आपणास कक्कल्ल ( कोकल ) या नांवानें संबोधून घेत असत. यांत नमूद केलेला भोजराजा बहुत करून पन्हाळ्याचा भोजराजा असावा. हा भोजराजा शिलाहार राजकुलांतील होता. त्याचा पराभव केल्यानंतर यादवानीं कोल्हापूरचें राज्य ग्वालसा करून आपल्या राज्यांत सामील केलें ही गोष्ट सिंघणाच्या राजवटींतील शिलाशासनावरून सिद्ध होतें. सिंघणानंतरच

कोल्हापूर येथें जे कोरीव लेख आहेत त्यांत यादवराजांचीं नांवें असून त्याबरोबर त्या प्रांताचा राज्यकारभार करण्यासाठीं त्यांनीं नेमलेल्या अधिकाऱ्यांचीं नांवें आहेत.

सिंघणाचे वेळचे बरेच शिलालेख आहेत ते परिशिष्टांमध्यें दिलेल्या जंत्रींत दर्शविले आहेत. त्यांपैकीं गदग, खिद्रापुर,
शके ११३२-११६० वहाल, तिलिवळी, हरळाहळ्ळी, अंबा, (आंबे,)
इ. स. १२१०-१२३८ येथील शिलालेख महत्त्वाचे आहेत. त्यावरून सिंघणदेवाच्या पराक्रमाची बरीच कल्पना येते व हेमाद्रीनें त्याचे पराक्रमाविषयींचें जें वर्णन केलें आहे त्यांत ऐतिहासिक सत्य असल्याचें दिसून येतें.

### २ रा गदग येथील शिलालेख.

हा शिलालेख संस्कृत व कानडी भाषेत आहे. सिंघणानें त्रिकुटेश्वरदेवास गांव इनाम दिल्याबद्दलचा प्रस्तुत
शके ११३५ शिलालेख आहे. या शिलालेखाचे आरंभीं असहाय
इ. स. १२१३. केलेल्या ऋतुग गावाचें वर्णन असून त्यांत दानाचें वर्णन दिलें आहे. शिलालेखाच्या मध्यभागीं शिवलिंग, ब्राह्मण व देवळाचा गाभारा दाखवून त्यांत पुजारी ब्राह्मण पूजा करण्यांत गुंतलेले असून, उजवे बाजूस गाय व तिचे वासरूं आणि वरचे बाजूस सूर्यबिंब दाखविलें आहे. डावे बाजूस वसवाची मूर्ति असून वर चंद्र दाखविला आहे. हें देऊळ लिंगायत पंथाचें असावें असें दिसतें. या देवास गांव इनाम देऊन सिंघणराजानें आपली [illegible] महत्त्वाचा [illegible] आहे

## सिद्धापुर येथील शिलालेख.

हा शिलालेख सस्कृत भाषेंत असून कायस्थ लिपींत लिहिलेला आहे या शिलालेखात शके ११३६ च्या चैत्र व ३० स श्रीमुख सवत्सरी सूर्यग्रहणाची पर्वणी साधून कोपेश्वर नामक देवस्थानास सिंघणदेवानें एक गाव इनाम दिल्याचा मजकूर आहे सिंघणदेवानें आपल्या नावामागें "महाराजाधिराज, प्रतापचक्रवर्ति, द्वारावतीपुरवराधीश, श्रीपृथ्वीवल्लभ, यादवकुलकलिकाविलास वगैरे बिरुदें लाविलीं आहेत कोल्हापूर येथील शिलालेखात पन्हाळ्याच्या भोजराजास सिंघणानें आपल्या अमलाखालीं आणिल्याचा उल्लेख आहे. सदरील भोजराजा हा शिलाहार वशातील होता मेजर ग्रॅहॅम यानीं सिद्धापूर येथील न ११ च्या कानडी भाषेंत असलेल्या शिलालेखाचें इग्रजी भाषातर केलें आहे त्याचा आशय पुढें लिहिल्याप्रमाणें आहे. (राजा सिंघणदेव म्हणतो) "माझें राज्य फार भरभराटीचें आहे. तुमच्या वाडवडिलाना व ब्राह्मणाना जो धर्म प्रिय होता तोच मी स्थापन करीत आहे तो कल्पतरुप्रमाणें वृद्धिगत होवो व त्याच्या अकुरापासून पानें फुटोत व त्याच्या फुलापासून फळें येवोत" शिलालेखाच्या मधोमध शकराची पिंडी असून डाव्या बाजूस पुरुष व त्याचेवर चद्र व उजव्याबाजूस नदी व त्यावर सूर्य आहे

शके ११३६
इ स. १२१४

## वहाल येथील शिलालेख.

खानदेश जिल्ह्यात चाळीसगाव तालुक्यातील वहाल गावीं हा शिलालेख आहे तो सस्कृत भाषेंत असून लिपी देवनागरी

आहे. या शिलालेखांत एकंदर १९ ओळी आहेत. सिंघणराजाचा ज्योतिषी अनंतदेव यानें भवानीद्वारजा येथें मंदिर बांधिलें. या शिलालेखाचे दोन भाग आहेत. पहिल्यांत अनंतदेव व त्याचे वाडवडील यांचा उल्लेख असून हा भाग वाङ्मयाच्यादृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. दुसऱ्या भागांत देवगिरीचा यादव राजा सिंघण, त्याचा बाप व आजा यांची प्रशंसा केली आहे. अनंतदेव हा शांडिल्यगोत्री यजुर्वेदी माध्यन्दिन शाखेचा ब्राह्मण होता. त्याचे वंशांत मनोरथ व महेश्वर असे दोन विद्वान् ज्योतिषि होऊन गेले. पैकीं महेश्वरानें ग्रहासंबंधीं शेखर या नांवाचा करणग्रंथ लिहिला आहे. प्रतिष्ठादीपक, फलग्रंथ, व लघुजातक या नांवाचे आणखी तीन ग्रंथ त्यानें ज्योतिषशास्त्रावर लिहिल्याचें समजतें. महेश्वराचा मुलगा श्रीपति, व श्रीपतीचा मुलगा गणपति व गणपतीचा मुलगा अनंतदेव, अशी वंशपरंपरा या शिलालेखांत दिली आहे. तो विद्वान् ज्योतिषि होता. त्यानें ज्योतिषशास्त्रावर कांहीं ग्रंथ लिहिल्याचें समजतें. पाटणच्या शिलालेखांतील त्रिविक्रमाच्या वंशाशी त्याचा संबंध असावा असें दिसतें.

शके ११४४
इ. स. १२२२

सिंघण, जैत्रपाल व भिल्लम यांचें वर्णन दुसऱ्या भागांत दिलें आहे. यांतील ऐतिहासिक भाग एवढाच आहे की, सिंघणाचा बाप जैत्रपाल हा दयेचा सागर होता. व आंध्रदेशाचा राजा गणपति याची गादी दुसऱ्यानें बळकाविली होती ती त्यानें त्यास परत मिळवून दिली व गणपतीचा बचाव केला. सिंघणानें पराक्रमी अर्जुनाचा पराभव केला. या दोनही गोष्टी शके ११०३ च्या पैठणच्या

ताम्रपटात नमूद केल्या आहेत. यात ज्या अर्जुनाचा उल्लेख केला आहे, तो मालव देशातील वर्मदेव राजा असला पाहिजे, सिंघणाच्या राज्यात अनतदेवानें एक देऊळ बांधिलें. गगाधर या नावाच्या नागर ब्राह्मणानें हा शिलालेख कोरला. अनतदेवाचा बधु महेश्वर यानें सिंघण देवाची प्रशस्ति लिहिली आहे.

## हरळाहल्ली येथील ताम्रपट.

या ताम्रपटाचा बराच भाग सस्कृतात असून काहीं भाग जुन्या कानडींत आहे लिपी देवनागरी आहे. धारवाड जिल्ह्यातील कराजगी

शके ११५०-६०
इ स १२३७ ३८

तालुक्यात हरळाहल्ली येथील उदचम्मादेवीचे देवळाचे मागील जागेंत हा ताम्रपट पुरलेला होता त्यात देवगिरीच्या यादव राजाची मल्लुगीपासून सिंघणदेवापर्यंत वशावळ दिली आहे. ताम्रपटाचे तीन तुकडे असून ते $\frac{3}{8}$ इंच जाड कडींत अडकविलेले आहेत. दरएक पत्र्याची लांबी-रुंदी $११\frac{२}{८} \times ७\frac{१}{२}$ आहे कडीवर गुडघे टेकून, व हात जोडून उभा असलेल्या गरुडाचा ठसा आहे त्याच्या उजवे बाजूवर सूर्य व डावे बाजूवर चद्र याच्या आकृति आहेत ताम्रपटाचें वजन ४४१ तोळे आहे सिंघणदेवाचा कर्नाटक प्रातावरील सुभेदार बीचण या नावाचा होता त्याच्या थोरल्या बन्धूचे नाव मल्ल व वडिलाचें नाव चिक्क असें होतें बीचणाच्या बायकोचें नाव आमगण असें होतें. बीचणानें रट्टाचा, दक्षिण कोंकणातील कदबाचा, द्वारासमुद्र येथील होयसळाचा व पाड्यदेशच्या राजाचा पराभव केला कावेरीनदीच्या आसपास त्यानें सिंघणदेवाच्या पराक्रमाचे विजयस्तंभ रोविले हरळाहल्ली

पासून सहा मैलावर वाराही ( म्ह० हल्लींची वर्धा ) नदी तुंगभद्रेला मिळते. वाराहीचे काठीं चीचणानें आपल्या वडिलाचें श्राद्ध करून त्याचें ऋण फेडिलें वाराही नदीचें काठावर असलेल्या सोमनाथ देवालयाचा व विश्वदेव व महादेव यानीं बांधलेल्या दिवाळ्याचा उल्लेख केलेला आहे. दंडेश विश्वदेव हा सिंघणाचा मांडलिक होता त्यानें रतिग्राम गावातील बरीच जमीन खरेदी करून तेथील ब्राह्मणास दान दिली. येथील ग्रामाधिकारी रामगौंड व महामंडलेश्वर जोईदेव याच्या नावाचा उल्लेख आहे.

### तिलिवल्ली येथील शिलालेख.

हा शिलालेख कानडींत असून त्यात १२६ ओळी आहेत. देवगिरीचा सिंघण यादव राजा याची यात भरपूर प्रशंसा केलेली आहे त्याची बिरुदें दिलीं आहेत तीं अशीं

शके ११६० इ स १२३८

“ १ महाराजाधिराज २ द्वारावतीपुरवराधीश, ३ विष्णुवंशोद्भव ४ देवगिरिदुर्गतिलक वगैरे. ” बिदर्भाच्या राजाचा, तुरुष्काचा ( तुर्कांचा ) व जज्जर देवाचा सिंघणानें पराभव केला कोल्हापुरच्या भोजराजास सिंघणानें पळावयास लाविलें. बिज्जलराजा व होयसळ राजा बल्लाळ आणि लक्ष्मीधर यास त्यानें जिंकलें माळव देशाच्या राजाला व बलाढ्य अभिराला, त्याचप्रमाणें मद्र देशाच्याचा त्यानें नाश केला त्यास नेपाळ, अंग, कलिंग, चोल येथील राजे व पाण्ड्यराजे थरथर कापत. त्याच्या हस्तिदलाचा नायक लक्ष्मीदेव होता. या शिलालेखांत सेवन ( यादव ) ठाकूर ( कुंतल प्रांतातील एका भागाचा अधिकारी ) याचा उल्लेख केला आहे. विचारणीय ! प्रांतावर त्याचा ताबा होता महाराजा मंडलेश्वर पुनर

देशाचा भाग त्याचे अमलाखालीं होता. या शिलालेखात अभिराचा उल्लेख केला आहे. यावरून देवगिरीचे यादवघराण्यातील राजे व खानदेशातील अभिर ऊर्फ गवळी राजे हे एक नव्हत असें सिद्ध होतें.

## सिंघणदेवाची गुजराथेवरील मोहिम.

हेमाद्रीच्या प्रशस्तींत सिंघणानें गुजराथेवर स्वारी केल्याचा उल्लेख आढळत नाहीं. सिंघणानें गुजराथ काबीज करण्याचा दोन–तीन वेळा प्रयत्न केला परतु त्यात त्याला यश आलें नाहीं उलट गुजराथच्या राजाबरोबर मित्रत्वाचा तह करून त्यास स्वस्थ बसावें लागले अशी माहिती **आंबे येथील शिलाशासनें, सोमेश्वराचा** कीर्तिकौमुदीनामक ग्रथ, अहिनलवाडा येथील शिलाशासनें, वगैरेवरून मिळते कोल्हापूर येथील न १० च्या शिलाशासनात मात्र सिंघणास, गुर्जरराजा हाच कोणी हत्ति याचा अकुश असें म्हटलें आहे. गुजराथेवरील सिंघणदेवाची मोहिम यशस्वी झाली नाहीं म्हणून हेमाद्रीनें व्रतखडातील प्रशस्तींत याबद्दलचा कदाचित् उल्लेख केला नसावा असें दिसतें

### आंबे येथील शिलालेख

हा शिलालेख सस्कृत भाषेंत असून त्याची लिपी देवनागरी आहे या शिलालेखात सिंघणाच्या गुजराथेवरील स्वारीची हकीगत आहे सिंघणानें देवगिरीचें राज्य शके ११३२ पासून ११६९ पर्यंत केलें

शके ११६२
इ स १२४०

त्याच्या पदरीं खोलेश्वर व राम या नावाचे मौद्गल जातीचे ब्राह्मण दोन प्रधान होते सिंघणानें त्यास गुजराथच्या मोहिमेवर पाठविलें.

त्यावेळचा गुजराथचा राजा लवणप्रसाद व त्याचा मुलगा वीरधवल याच्या सैन्याबरोबर सिंघणाच्या सैन्याचें घनघोर युद्ध झालें, त्यात राम पडला. रामाची बहीण लक्ष्मी हिनें ब्रह्मपुरी येथें त्याचें स्मारक म्हणून रामनारायणाचें मंदिर बांधिलें. त्यात हा शिलालेख आहे. त्यातील मजकूर कविराज यानें संस्कृतात पद्यमय रचिला असून तो परिशिष्ट ७ मध्यें दिला आहे. या शिलालेखात सिंघणासारखा पराक्रमी राजा पूर्वी झाला नाहीं, व पुढें होणार नाहीं असें म्हटलें आहे. व खोलेश्वराचा मुलगा राम यानें गुजराथचे मोहिमेंत जो पराक्रम गाजविला त्याचें बहारीचें वर्णन केलें आहे. सिंहगड घेताना शिवाजीचा उजवा हात तानाजी पडला, परंतु शिवाजीचें उद्दिष्ट कार्य पार पडलें! त्याचप्रमाणें सिंघणाचा राम जरी लढाईत पडला तरी सिंघणाचा शह गुजराथला कायमचा लागला।

कीर्तिकौमुदी नावाचें एक संस्कृत काव्य सोमेश्वरानें लिहिलें आहे. त्यात गुजराथच्या चालुक्य राजाचें वर्णन दिलें असून वस्तुपाल व तेजपाल या बन्धुद्वय प्रधानाची भरपूर स्तुति केली आहे. चालुक्यराजाची व्याघ्रपल्ली (वाघेला ठाकूर) नावाची एक शाखा होती. त्यांपैकी राजा लवणप्रसाद याचा गुजराथच्या एका भागावर अमल होता. त्याचा मुलगा वीरधवल हा देखील आपल्या बापाप्रमाणेंच पराक्रमी होता. या बाप-लेकांनीं तुंबळ युद्ध करून खोलेश्वर आणि राम यांनीं स्वारी परतविली. याच काव्यात सिंघणानें गुजराथेवर आणखी एकदा स्वारी केली होती परंतु सिंघणानें सैन्य भडोच (भृगुकच्छ) येथें पोहोचल्यावर उभय पक्षांत निर्गंध

युद्ध होऊन त्यांत सिंघणास हार खावी लागली असें लिहिलें आहे.

कोणीएक मुद्गलगोत्री खोलेश्वर नावाचा ब्राह्मण सिंघणाच्या पदरीं मोठा पराक्रमी मंत्री होता. त्यानें गुर्जर देशाच्या राजाची रग जिरविली, माळवदेशीय राजास कीटकाप्रमाणें चिरडून टाकिलें, अभिरराजाचें कुळ अजिनात नष्ट केलें, तो आपला धनी सिंघणदेव याच्या शत्रूस दावाग्निप्रमाणें भासत होता व त्यानें शत्रूचें निर्दालन करण्याचे कामीं सिंघणास कांहींएक काळजी ठेविली नव्हती, वगैरे आशयाचें खोलेश्वराच्या पराक्रमाचें वर्णन बऱ्याच ठिकाणीं केलेलें आढळतें. या खोलेश्वरानें आपला पुत्र राम यास आपले पश्चात् आपल्या अधिकारावर नेमिलें होतें. त्याच्या नेतृत्वाखालीं सिंघणानें पुन्हा एकदा गुर्जर प्रांतावर स्वारी केली. राम नर्मदेपर्यंत चाल करून गेल्यावर त्याठिकाणीं गुजराथच्या सैन्यानें त्यास गांठलें. उभय पक्षा मध्यें झालेल्या निकराच्या लढाईंत गुजराथच्या राजाचे हजारो शिपाई धारातीर्थीं पडले ही गोष्ट खरी, परंतु सिंघणाकडील राम त्या लढाईंत मारला गेला. यावरून सिंघणानें गुजराथेवर निदान दोन वेळा स्वाऱ्या केल्या असाव्या असें दिसतें. गुजराथच्या इतिहासांत या गोष्टीला पोषक असा वृत्तांत आहे.

कीर्तिकौमुदी काव्यांत देवगिरीच्या यादवराजाचा गुजराथच्या राजाना केवढा दरारा होता याचें हुबेहूब वर्णन केलें आहे.

श्रुतसिंहणसैन्यसिंहनादप्रसरा गुर्जरराजराजधानी ।
हरिणीव हरिन्मुखावलोकचकितान्तःकरणा मुहुर्बभार ॥ ४३ ॥
गृहमारभते न कोऽपि कर्तुं कुरुते कोऽपि न सङ्ग्रहं कणानाम् ।
स्थिरता च न चापि नीतिचेतः परचक्रागमशङ्कयाप्रजानाम् ॥ ४४ ॥

अवधीरितधान्यसंचयानां बहुमानं शकटेषु मानवानाम्।
विपदामुदये हि दुर्निवारे शरणं चक्रभृदेव देहभाजाम्॥ ४५॥

समुपैति यथा यथा समीपं रिपुराजध्वजिनी मदात्तदानीम्।
परतः परतस्तथा तथासौ जनता जातभयोच्छ्रया प्रयाति॥ ४६॥

कीर्तिकौमुदी स. ४

सिंघणाच्या सैन्याचा सिंहनाद जिकडे तिकडे दुमदुमलेला ऐकून गुजराथची राजधानी, ज्याप्रमाणें सिंहाचें तोंड पाहून हरिणी चकित होते त्याप्रमाणें तिची स्थिति झाली. म्हणजे सिंघण राजाच्या दहशतीनें ती थरथरा कांपू लागली. त्या भीतीनें कोणीही नवीन घर बांधण्यास धजेना. अथवा धान्य साठविण्यास कोणाचाहि धीर होईना. परचक्राच्या भीतीनें सर्वांचीं मनें उद्विग्न झालीं. शेतांतील धान्याचें रक्षण करण्याचें सोडून देऊन गाड्या मिळविण्याची सर्व लोक विलक्षण काळजी वाहूं लागले आणि शत्रूची फौज जसजशी अधिकाधिक जवळ येऊं लागली तसतशी सदरील राजधानींतील लोकांच्या काळजांत धडकी भरून जो तो आपापलीं घरें दारें सोडून पळूं लागला. यापुढें कीर्तिकौमुदींत पुढील श्लोकांत आणखी मनोरंजक वर्णन आहे.

तदुपेत्य जवेन यादवेन्द्रे धवलक्ष्मापवलस्य तुच्छपौरगर्वम्।
भ्रुकुटीकुटिलं चकार कोपादलिकं धीरगुणप्रसादितोऽपि॥ ४७॥

उपकण्ठमकुण्ठविक्रमस्य स्फुरदुत्तमयशाहिरण्मयी स्रक्।
सुरभेरुपकुम्भभूपसूनुः सुरसा निदिदेश पादुपर्णी॥ ४८॥

परिपन्थिवरूथिनीं प्रभूतां स नृपस्तुच्छपरिच्छदोप्यगच्छत् ।
यलि नाप्यरिणा रणप्रवृत्तौ सुभटानां द्विपदानि संमुखानि ॥ ४९ ॥

बलवारिधिराजगाम शत्रोरुपतापीतटमुर्वरोपतापी ।
रभसादभिधावतिस्म वीरः स महीतीरमहीनबाहुशक्तिः ॥ ५० ॥

प्रचुरं तदरातिराजचक्रं तदजय्यं च बलं चुलुक्यभर्तुः ।
विमृशन्बहुशोपि संदिहानो न जनोनिश्चिनुते गतिं स्तितिवा ॥५१॥

रिपुसैन्यनिवेशभूः प्रजानांविदिताभूदनिवेदितापिदूते ।
गगनाङ्गणगाहनोल्बणैस्तज्ज्वलितग्रामसमूहधूमवृन्दै ॥ ५२ ॥

भृगुकच्छमहीमहीनसस्यां चरतस्तानचिरेण वृष्णिवर्गान् ।
न बहूनपि दुर्जया जय्य. समरेमन्यत वीरकेसरी स ॥ ५३ ॥

कीर्तिकौमुदी स ४

" सिंघण राजाचें सैन्य फार त्वरेनें चाल करून येत आहे असें लवणप्रसाद यास समजताच त्यानें रागानें आपल्या भुंवया वर चढविल्या. त्याची फौज लहान होती याची त्यास जाणीव होती तथापि ती बरोबर घेऊन शत्रूच्या मोठ्या सैन्यास तोंड देण्यासाठीं तो निघाला. सिंघणाचें सैन्य तापीच्याकांठीं पोहोंचलें तेव्हां लवण-प्रसाद मोठ्या त्वरेनें चाल करून महीच्या कांठीं जाऊन थडकला. शत्रूचें सैन्य फार मोठें व चालुक्याची फौज अतिशय पराक्रमी यामुळें विजयश्री कोणास माळ घालील याबद्दल लोकांचीं मनें साशंक झालीं. सिंघणाकडील सैन्य आपल्या मार्गांतील खेड्या-पाड्यांचीं जाळ-पोळ

करीत जाई. त्यायोगानें उत्पन्न झालेल्या धुराच्या लोटामुळें लवण-प्रसादाकडील सैन्यास शत्रूचा तळ कोठें आहे याचा मागमूस लागेना. अशा विकट परिस्थितींत शत्रूच्या सैन्यास तोंड देण्यासाठीं आपल्या सैन्याची हालचाल कशा रीतीनें करावी याबद्दल लवणप्रसादास मोठा पेंच पडला. शेतांत उभी पिकें असतांना यादवाच्या सैन्यानें भृगु-कच्छाच्या ( हल्लींच्या भडोचच्या ) आसपासच्या मुलखावर हल्ला करून तो व्यापून टाकिला, तरी देखील त्या गुजराथच्या सिंहास ( लवणप्रसादास ) शत्रूच्या सैन्यापुढें आपणास हार खावी लागणार नाहीं असा पूर्ण आत्मविश्वास होता. "

लवणप्रसाद व वीरधवल या पिता-पुत्रांची वर लिहिल्याप्रमाणें तारा-बळ उडाली असता आणखी एक अकल्पित गोष्ट घडून आली; त्या-मुळें त्यांच्या संकटपरंपरेंत अधिकच भर पडली. त्यांच्या या संकटा-वस्थेचा फायदा घेऊन उत्तरेकडून चार राजांनीं गुजराथप्रांतावर स्वारी केली. "विपद्विपदमनुधावति" म्हटें एकदा येऊं लागली म्हणजे ती एकामागून एक अशी येऊं लागतात. या जगाच्या रूढीस अनु-सरून प्रथमपासून लवणप्रसादाच्या गोटांत सामील असलेले गोध्रा व लाट प्रांताचे राजे यांनीं त्यास एकाएकीं दगा दिला व ते उभयतां मारवाडच्या राजास जाऊन मिळाले. शेवटीं ही कीं सर्व बाजूंनीं लवण-प्रसादाचे सैन्यास गराडा पडला असताहि त्या पिता पुत्रांनीं धैर्य किंचितहि गमवलें नाहीं. त्यांच्या या अचाट धैर्याचें कौतुक करावें तितकें थोडेंच आहे ! दक्षिणबाजूकडून यादवसैन्यानें जो शह दिला होता त्यास प्रतिकार करण्याचें काहीं काळ लवणप्रसादानें तहकूब करून उत्तरेकडून या निर्दिष्ट केलेल्या तीन राजांच्या संयुक्त सैन्यावर

सामना करण्यासाठीं आपल्या फौजेचा मोर्चा त्यानें उत्तरेकडे फिरविला. यामसंगाचें वर्णन सोमेश्वरानें आपल्या ' कीर्तिकौमुदी ' मध्यें फार बहारीचें केलें आहे.

पुरतो यदि सिंहणस्य सैन्यं यदि पृष्ठे मरुभूभुजश्च तौ च ।
न बभूव तयोरचिन्त्यशक्तयोर्मृगराजस्य विपर्ययस्तथापि ॥ ५९ ॥
पुरतः सरतो यदुप्रवीराननुगच्छन्समेग करीव मत्तः ।
व्यथितः प्रतिपार्थिवैः स पश्चात्सपदि व्याववृते नृपः सकोपः ॥६०॥
जगति ज्वलिताखिलप्रदेशः प्रचुरीभूतमलिम्लुचप्रचारः ।
स परस्परविग्रहो ग्रहाणामिव तेषामभवन्नरेश्वराणाम् ॥ ६१ ॥
अवलोक्य चुलुक्यपार्थिवौ तौ विपरीतैर्यदुभिर्नृपे परीतौ ।
स्मरदर्शितकराविवाम्बुवाहैर्जनतेयं मनुतेस्म दुर्दिनं तत् ॥ ६२ ॥
वलितेपि चुलुक्यपार्थिवेस्मिन्न कृतं तैर्यदुभिः पुरः प्रयाणम् ।
हरिणैरनुगम्यते न मार्गो हरिणा तत्क्षणमाश्रितोज्झितोपि ॥ ६३ ॥

कीर्तिकौमुदी स. ४.

यातील शेवटच्या श्लोकाचा सारांश असा आहे कीं, चालुक्य-राजानें यादवाच्या सैन्याचा समाचार घेण्याचें सोडून देऊन उत्तरेकडे आपल्या सैन्याचा मोर्चा फिरविला, तरीदेखील यादवाचें सैन्य पुढें सरसावलें नाहीं व लवणप्रसादाच्या सैन्याचा त्यांनीं पाठलाग केला नाहीं. याचें कारण कीर्तिकौमुदिकार सोमेश्वर त्याच श्लोकांत काव्यमय भाषेंत देतो तें असें, " सिंह आपला मार्ग सोडून गेला तरी हरिणें भीतीमुळें त्या मार्गानें जाण्यास धजत नाहींत. "

लवणप्रसादाच्या सैन्याचा पाठलाग न करितां यादवाचें सैन्य जागच्याजागीं स्थिर राहिलें, यांत कांहींतरी विशेष कारण असलेंच

पाहिजे. सोमेश्वरानें कीर्तिकौमुदींत म्हटल्याप्रमाणें, यादवांची फौज तापी नदीच्या नजीक येतांच गुजराथच्या राजाचें व त्याच्या प्रजेचें धाबें दणाणून गेलें होतें, तेव्हां लवणप्रसाद यास शत्रूंच्या सैन्यांनीं चोहोंकडून घेरलेलें पाहून त्याप्रसंगाचा फायदा घेण्यास ती पुढें सरसावली नसती ही गोष्ट संभवत नाहीं! लवणप्रसादानें सिंघणाच्या सैन्याचा पराभव करून त्यास परतविलें असतें, तर खुद्द सोमेश्वरानें त्या विजयाचा मोठ्या गौरवानें उल्लेख केला असता. परंतु जी गोष्ट मुळांतच घडली नाहीं ती आपल्या ग्रंथांत नमूद करण्याचें धाष्टर्य सोमेश्वराकडून कसें होईल? यावरून लवणप्रसादानें सिंघणाबरोबर सलोखा करून दक्षिणेकडून आपल्यावर आलेलें संकट निदान तात्पुरतें तरी टाळलें असावें असा तर्क करण्यास जागा आहे. पण सोमेश्वरानें गुजराथच्या राजाच्या गौरवार्थ म्हणून जें काव्य लिहिलें, त्यांत, त्यास कमीपणा आणणाऱ्या प्रसंगाचें दिग्दर्शन करण्याचें मोठ्या खुबीनें टाळलें आहे; व महत्त्वाचे मुद्यावर मुग्ध राहून ऐतिहासिक सत्य कथन करण्याचेकामीं कुचराई केली आहे. वास्तविक पाहिलें असतां चोहोंकडून संकटें आलीं असतां लवणप्रसादानें त्यांतल्यात्यांत बलाढ्य राजापैकीं सलोखा करून आपणावर आलेलें मोठें विघ्न मुत्सद्दिगिरीनें टाळलें याबद्दल सोमेश्वरानें त्याचें कौतुक करावयास पाहिजे होतें!

कै. सर रामकृष्णपंत भांडारकर यांस "लेखपंचाशिका" नांवाच्या लिहिलेल्या संस्कृत ग्रंथांत, दानपत्रांतील, तहनाम्यांतील व इतर राजकीय व खाजगी पत्रव्यवहारांतील मजकूर कसे लिहावे याबाबतचे मसुदे दिले आहेत. म्हणजे ज्या ज्या लोकांस दानपत्रें, तहनामे इत्यादि लिहिण्याचा प्रसंग येईल त्या त्या लोकांस या

ग्रंथातून मसुदे घेण्यास सुलभ पडावें या हेतूनें हा ग्रंथ लिहिला असावा असें दिसतें हल्लीच्या काळात गहाणखतें, खरेदीखतें, उलट खरेदीखतें, वेदविपत्र, मांडेचिठ्या वगैरे कायदेशीर कागदपत्र कसे लिहावे याबद्दलचे मसुदे एका ठिकाणीं ज्यात संकलित केले आहेत अशी पुस्तकें सॉलिसिटर्स लोक आपल्यापाशा बाळगितात व आपल्या अशिलास ज्याप्रकारचा दस्तैवज करून घेणें अगर देणें असेल त्याचा नमुना अशा पुस्तकातून ते घेतात वरील 'लेखपचाशिका' ग्रंथ याच नमुन्याचा असला पाहिजे सदरील ग्रंथ कोणी लिहिला त्याचें नाव उपलब्ध नाहीं परंतु हा ग्रंथ विक्रम संवत् १२८८ मध्यें कोणी तरी विद्वान गृहस्थानें लिहिला असावा कारण त्यात नमूद केलेल्या निरनिराळ्या कागद-पत्राची मिति एकच म्हणजे विक्रम संवत् १२८८ वैशाख शु॥ १५ ही दिली आहे एका दानपत्राचा मसुदा नीट समजला जावा म्हणून त्यात, तत्कालीन विशिष्ट व्यक्तींची नावें नमूद केली आहेत ग्रंथकारानें त्या मसुद्यात अनहिलपट्टण येथील चालुक्यकुलाची वंशावळ, मूळराजापासून दुसऱ्या भीमापर्यंत दिली असून त्या दानपत्रातील देणगी, राजा लवणप्रसादानं दिली असं म्हटलें आहे याचप्रमाणे दोस्तीच्या तहनाम्याला "यमलपत्र" असें नाव देऊन त्याचा नमुना त्यानें दिलेला आहे त्यात तह करणारे पक्षकार म्हणून, सिंघण व लावण्य प्रसाद (लवणप्रसाद) या उभयतांची नावें नमुन्यादाखल दिलीं आहेत तो नमुना असा –" संवत् १२८८ वर्षे वैशाख शुदी ( शुद्ध ) १५ सोमेंचेह श्रीमद्विजयकटके महाराजाधिराजश्रीमत्सिंहणदेवस्य महामण्डलेश्वरराणकश्रीलावण्यप्रसादस्य च । सराज (साम्राज्य अथवा सम्राट )

कुलथी श्रीमत्सिंहणदेवेन महामंडलेश्वर राणश्रीलावण्यप्रसादेन पूर्वरूढ्यात्मीय २ देशेषु रहणीयम्। केनाऽपि कस्यापि भूमि नं आक्रमणीया," विक्रम संवत् १२८८ वैशाख शु॥ १५ या दिवशीं विजयी तळाच्या छावणींत महाराजाधिराज प्रतापी सिंहणदेव (सिंघणदेव) व महामंडलेश्वर राणक प्रतापी लावण्यप्रसाद (लवणप्रसाद) यांच्या दरम्यान तहनामा झाला तो असा; सार्वभौम राज्य हेंच ज्याचें वडिलोपार्जित धन असा जो धीमान् सिंहणदेव, व राणा प्रतापी लवणप्रसाद या उभयतांनी पूर्वापार वहिवाटीप्रमाणें आपापल्या मुलखांत रहावें. कोणीही कोणाचा मुलुख बलात्कारानें घेऊं नये.

या तहनाम्यांत आणखीही कांहीं शर्ती आहेत त्या अशा कीः—उभयतांपैकी एकावर शत्रूनें हल्ला केल्यास दुसऱ्यानें आपलें सैन्य त्याच्या मदतीस पाठवून संयुक्त सैन्यानिशीं त्याचा प्रतिकार केला पाहिजे. तसेंच उभयतांपैकीं कोणाहि एकाच्या मुलुखांत एखादा राजा मौल्यवान वस्तु घेऊन पळून गेल्यास त्याला दुसऱ्यानें थारा देऊं नये. म्हणजे हा तह परस्परांच्या बचावाकरितां केला होता असें दिसतें. या मसुद्यांत इतरांचीं नांवें दाखल न करितां सिंहण व लवणप्रसाद यांचीच नांवें दाखल करण्यांत ग्रंथकाराचा विशिष्ट हेतु असावा यांत शंका नाहीं. कारण वरील उताऱ्यांतील 'श्रीमत विजयस्कंधे' ( विजयी सैन्याच्या तळांत ) हें पद अर्थपूर्ण असून त्यांत सिंहणास सार्वभौम राजा असें म्हटलें आहे. यावरून हा तहनामा सदरील ग्रंथनिर्मितीपूर्वी कांहीं काळ अगोदर झाला असावा, व त्याची स्मृति त्यावेळीं ग्रंथकाराच्या मनांत जागी असावी. यावरील वि. सं. १२८८ ह्या

अगोदर काही वर्षे गुजराथेवर सिंघणानें स्वारी केली होती, अशाबद्दल ऐतिहासिक पुरावा मिळतो

वरील विवेचनावरून लवणप्रसाद यानें देवगिरीचा सिंहणदेव ( सिंघण ) याचा पराभव केला ही गोष्ट खरी नसून गुजराथच्या राजास त्याच्या पराक्रमाची जाणीव असल्यामुळें त्यानें त्यानंतर दोघांचा तहनामा केला हीच गोष्ट निर्विवाद होय सर रामकृष्णपंत भांडारकर यास " लेखपंचाशिका ' हा ग्रंथ सापडला नसता तर या मोहिमेच्या निकालाचा प्रश्न वादग्रस्त राहिला असता.

' कीर्तिकौमुदी " त, यादवराजा सिंघण याच्या गुजराथेवरील ज्या मोहिमेचें वर्णन दिलें आहे ती पहिलीच असली पाहिजे. कारण या मोहिमेच्यावेळीं सिंहणाच्या सैन्याचें अधिपत्य खोलेश्वराकडे होतें लवणप्रसाद यानें आपला धनी अनहिलपट्टणचा राजा दुसरा भीम याचें स्वामित्व शके ११४१ त, झुगारून दिलें होतें व तो आपणास स्वतंत्र राजा असें म्हणवून घेऊं लागला होता सिंघणाच्या कारकीर्दीत या सुमारास सुमारें नऊ वर्षे लोटली होती वर निर्दिष्ट केलेला तहनामा शके ११५३ च्या सुमारास झाला असावा आंबे येथील प्रस्तुत शिलालेख शके ११६० मधील आहे या शिलालेखातील मजकुरावरून सिंघणाच्या गुजराथच्या मोहिमेंत खोलेश्वराचा भाऊ राम हा मारला गेला असें दिसतें त्याचे पश्चात् त्याचा मुलगा अज्ञान असल्यामुळें त्याच्या मिळकतीचा कारभार त्याची बहिण लक्ष्मी ही पाहू लागली शिवाय ज्या गुजराथच्या मोहिमेंत यादवाकडील राम पडला त्यावेळीं गुजराथच्या गादीवर वीरधवलाचा मुलगा विसलदेव हा होता अनहिल

वाडयाच्या ११ नंतरच्या ताम्रपटात सिंघणाच्या सेना-समुद्राला ज्या वडवानलानें सुकविलें तो मीच अशा प्रकारानें गर्वोक्तीचे उद्गार गुजराथचा राजा विशलदेव यानें काढिले आहेत. विशलदेवाचा सदरील ताम्रपट महत्त्वाचा असल्यामुळें त्यातील काहीं भाग पुढें दिला आहे तो येणेंप्रमाणें ---

( १ ) स्वस्ति श्रीमद्विक्रमकालातीत सप्तदशाधिकत्रयोदशशत-निक संवत्सरे लौकिक जेष्ठमासस्य---

( २ ) कृष्णपक्षचतुर्थ्यां तिथौ गुरावद्येह श्रीमदणहिल्लपाटके समस्तराजावलीविराजित परमेश्वर परम---

( ३ ) भट्टारक उमापतिवरलब्धप्रसादप्रौढप्रतापचौलुक्यकुलक-मलिनीकलिकाविकाशमार्तंड सिंघण---

( ४ ) सैन्यसमुद्रशोषणवडवानल मालवाधीशमानमर्दनमदे राटकदेश कनुपराज्य वशोक दोच्छे [ द ].

( ५ ) न कुद्दालकल्पकर्णाटराजनलधिनतया स्वयंवर पुरुषोत्तम भुजबल भीम अभिनव सिद्धराज अप---

( ६ ) राजैनेस्यात्रिशकलविद्यावल्लीसमलंकृत महाराजाधिराज श्रीमद्विशलदेवकल्याणविजयिराज्ये---

( ७ ) तदनुशासनानुवर्तिनि महामात्यश्रीनागडे श्रीकरणादि समस्तमुद्रा व्यापारान् परिपंथयतीत्येव---

( ८ ) काले प्रवर्तमाने अस्यैव परमप्रभो श्रीविग्रहराजस्य प्रसाद पत्तनपापोर्द्ध पथके भुज्यमानकडन्मा---

(९) जयश्रीनिर्भरालिंगितशरीर महामंडलेश्वरराणकश्रीसाम तसिंहदेव नगरपौरान् अन्यानपिस—

(१०) र्व्वं [ न ] थिट्स्य सर्वेषाविदित पत्रशासन रचयति यथा॥ यन्मया महादानोदकमक्षालितनामेनस्तरत् ।

वरील उताऱ्यात विमलदेवाने आपणास प्रौढप्रताप चौलुक्यकुल कमलिनी मार्तंड वगैरे विरुदें लावून घेतली आहेत व माळव, मेवाड वगैरे देशाच्या राजाना आपण पादाक्रांत केले असें गर्वोक्तिनें म्हटलें आहे

अनहिलवाड्याच्या गादीवर विमलदेव हा शके ११५७ म्हणजे इ स १२३५ साली नमला गुजराथच्या दुसऱ्या मोहिमेंत यादवा-कडील सेनापति राम पडला ही गोष्ट नि सशय होय, परतु त्या युद्धाचा अखेर निकाल काय झाला याबद्दल काहींच माहिती उपलब्ध नाहीं

महानुभाववाङ्मयात "विराटपाठी चरित्र" या नावाचा एक चरित्र-ग्रथ आहे त्यातील उतारा पुढें दिला आहे त्यावरून सिंघणाने गुजराथ प्रातावर केलेल्या दुसऱ्या मोहिमेवर थोडा प्रकाश पडत आहे सदरील ग्रथ त्या मोहिमेनतर थोड्या वर्षांनीं लिहिला गेला असल्यामुळें त्यात ऐतिहासिकसत्य असण्याचा सभव आहे

" शके ११०३ विरोध सवत्सरी भाद्रपन्मासी शुक्रवार द्विती येमा पुर म्हणिजे भरवस ( भडोच ) त्रिमल्लदेवराजा त्यासी महूरुपीचा श्राप म्हणून पुत्र नाहीं त्याचा प्रधान विशाळदेव तो सामक ब्राह्मण लाटदेशीच्या त्रिमल्लदेवरायें मरणसमयीं विशाळ देवासी राज्य दीधलें व पालकपुत्र निरोपिला तोहि निवर्तला

विशाळदेवासी पुत्र नाहीं मग हरिपालदेव वहुतां नवमें जाला तो वहुता प्रकारें पुरुषार्थी जाला. तयाचा विक्राव जाला तयासि वरुषें २२ भरलीं. तंव सिंघणरायाचें कटक गुजरावर चालिलें. जे रायेवीण प्रधान राज्य करीत असे तर ते राज्य घ्यावें म्हणोनी सिंघणें चाल केली. जगळदेव विंझदेव आणि एक असे तीन योध्ये गुजरावर पाठविले. तें ऐकुन विशाळदेवें आपले सकळही वल्हाने पाठविले. सवे झुंजमल्ल प्रधान दीधला मग येरयेरादळा झुंझ जाले. सिंघणाचेनि दळें प्रधानाचे दळ भंगले मग प्रधानपुत्रें कटकेची आव्हती मांडिली. पूर्वेच्या द्वारवंठे निघून स्वारी केली हें ऐकून जाधवी मुरड घेतली. ते प्रधानपुत्रें भंगिले ठाव वैसवित वेळापुरीवेन्ही आला. मागुतें आपल्या नगरासी गेला. मग सिंघणें शिष्टाई केली मग प्रधानाची कटकें वहुडली ऐसा पराक्रमाचा तो प्रधान पुत्र होता."

उत्तरेकडील प्रांत जिंकण्यास व जिंकलेल्या प्रांताचें रक्षण करण्यास सिंघणानें आपल्या सेनापती खोलेश्वर यानी नेमणूक केली होती. त्याचप्रमाणें दक्षिणेकडील कर्नाटक वगैरे प्रांताचा कारभार पहाण्यास व त्या बाजूनें परचक्र आल्यास त्यास टक्कर देण्यासाठी सिंघणराजानें चिकाचा मुलगा व मल्लाचा धाकटा भाऊ वीचिण्ण ऊर्फ बीच यास नेमिलें होतें. हा बीचण्ण खोलेश्वराइतकाच पराक्रमी असून त्यानें दक्षिणेकडील राजांस सिंघणाविरुद्ध डोकें वर उचलूं देण्यास अवकाश दिला नाहीं. दक्षिण महाराष्ट्रांतील रट्ट या नावाच्या संस्थानिकास गोवें प्रांतांतील कदंब राजास व गुत्त ऊर्फ गुप्त या नांवाच्या संस्थानिकास, पांड्ये राजास, होयसल यादवास व दक्षिणेकडील इतर मांडलिक राजांस त्यानें जेरीस आणून त्यांजवर यादवांचा अंमल

बसविला. व कावेरी नदीच्या कांठीं विजयस्तंभ उभारून त्यावर सिंघणाच्या पराक्रमाचें वर्णन लिहिलें. याप्रमाणें नर्मदेपासून तो थेट कावेरीपर्यंत सिंघणराजानें आपल्या साम्राज्याचें विजयी निशाण फडकविलें.

सिंघणाचा मुलगा जैतुगी ऊर्फ जैत्रपाल हा आपल्या बापाप्रमाणेंच पराक्रमी होता. व तो आपल्या शत्रूस केवळ काळासारखा भासत असे. तो आपले बापाच्या हयातींतच कालवश झाला असें दिसते. कारण सिंघणराजाचा अंत शके ११६० मध्यें झाला, व त्याचा नातु (म्हणजे जैतुगीचा मुलगा) कृष्ण ऊर्फ कान्हेर हा त्याचेपश्चात् गादीवर बसला. यावरून 'व्रतखडांतील' प्रशस्ति नं.१ मध्यें सिंघणाच्या पश्चात् त्याचा मुलगा जैत्रपाल याचें नांव अजिबात गाळलें असून त्याचे नातु कृष्ण व महादेव यांचा उल्लेख केला आहे. 'व्रतखंडांतील' राजप्रशस्ति नं. २ मध्यें सिंघणाचा मुलगा जैत्रपाल ऊर्फ जैतुगी याच्या पराक्रमाचें वर्णन दिलें आहे तें असें.—सर्व गुणांचा तो आगर असून शत्रूस तो केवळ मूर्तिमंत यमाप्रमाणें भासत होता. आपल्या सैन्यापेक्षां शत्रूचें सैन्य मोठें असलें तरी त्याजबरोबर झगडण्यास तो डगमगत नसे. आपल्या वडिलांबरोबर लढायांत हजर राहून व शत्रूंबरोबर झुंजून त्यानें मोठा पराक्रम गाजविला होता असें या वर्णनावरून दिसतें.

### कृष्णदेव ऊर्फ कान्हेर (कन्हर)

हेमाद्रीच्या व्रतखंडांत सिंघणाचे मागून त्याचे नातु (मुलाचे मुलगे) गादीवर आल्याचा उल्लेख आहे.

शके ११६०-८२
इ. स. १२४७-१२६०

"कृष्णो महादेव इति प्रतीतौ जातौ ततः सिंहनृपस्य पौत्रौ। तयोस्तु पूर्वप्रभवः पुरस्तात्कृष्णोति-विख्यात मतिर्नृपोभूत्॥" कृष्ण या शब्दाची प्राकृत रूपांतरें

कन्हर-कान्हेर-कन्हार, कंधार अशीं केलेलीं आढळतात, व याप्रमाणें शिलालेखांत, ताम्रपटांत व महानुभवांच्या वाङ्मयात वरीलपैकीं कोणत्यातरी नांवानें त्यांचा उल्लेख केलेला आढळतो.

मुतखंडांत त्याच्या पराक्रमाचें वर्णन खालीं लिहिल्याप्रमाणें केलें आहेः—

> येनाकारि विशालवीसलचमूसंहारकालानले
> हेलोन्मूलितमूलराजसमरे निर्वीरमुर्वीतलम् ।
> येनानेकमहाफलक्रतुकृता संवर्ध्यमानोऽनिशं
> क्षीणःकालवशात्पुनस्तरुणतां धर्मोपि संप्रापितः ॥

मुतखंड प्रशस्ति नं. २ मध्यें त्याच्या पराक्रमाच्या वर्णनांत आणखी भर घातली आहे ती अशी.

> हप्यद्वारणवाजिवारणरणक्षोणीषु जित्वा बहून्
> दासीकृत्य तथापरान्विहितवानन्यानरण्यौकसः ।
> इत्थं पार्थिवराजराजिविजयव्यापारपारंगत
> श्चक्रे शक्रजयाय कृष्णनृपतिःसलोकयात्रागतम् ॥

गुजराथचा राजा विसल याच्या सैन्याचा त्यानें धुव्वा उडविला व आपल्या आजाचें, गुजराथमांत पूर्ण कावीज करण्याचें अपुरें राहिलेलें कार्य त्यानें पुरें केलें. मदोन्मत्त हस्तिदलें व घोडदलें बरोबर घेऊन समरांगणावर आलेल्या शत्रूंस नामोहरम करून त्यांना आपले दास बनविलें व कित्येक राजांना अरण्याचा आश्रय करण्यास भाग पाडिलें. पृथ्वीवरील सर्व राज्यें जिंकून तो इंद्रास जिंकण्यासाठीं स्वर्गलोकावर स्वारी करण्यास गेला. ही पवाड्या स्वरूपाची काव्यमय स्तुति बाजूस ठेवली तरी तलवारीच्या जिवावर व तडफेनें त्यानें दिग्विजया

हकीकतीवरून माळव, गुजराथ व कोंकण प्रांतावर त्याचा मोठा दरारा होता असें दिसतें चौलदेशाचें राज्य जिंकून त्यावर त्यानें आपला अमल बसविला तैलंगण देशाच्या पदच्युत केलेल्या राजास त्यानें पुन्हा गादी मिळवून दिली कृष्णदेवाच्या वेळचे ताम्रपट व शिलालेख बरेच आहेत पैकीं चिक्कबागेवाडी, बेहट्टी, मनोली व चटदामपुर येथील महत्वाचे असून बाकीच्यात कन्हरदेवानें अगर त्याच्या पदरच्या मंत्र्यानीं निरनिराळ्या देवस्थानास दानें केल्याचा मजकूर आहे

## चिक्कबागेवाडी येथील ताम्रपट

चिक्कबागेवाडी हें गाव बेळगाव जिल्ह्यात आहे या ताम्रपटातील मजकूर असा आहे कीं, सिंघण देवाचे राजवटींत देवगिरीच्या यादवाच्या अमलाखालीं दक्षिणेकडील जे प्रांत होते त्यावर बीच ऊर्फ बीचण्ण या नावाचा प्रतिनिधि (सुभेदार) नेमण्यात आला होता त्यास मल्ल ऊर्फ

शके ११७१
इ स १२४९

मल्लीशेटी या नावाचा एक वडील भाऊ होता तो मुद्गल येथील रहिवाशी असून कुहुडी प्रांतावरील एक अधिकारी होता त्यानें कृष्णदेवाचे परवानगीनें निरनिराळ्या गोत्राच्या बत्तीस ब्राह्मणास जमिनी दान दिल्या, त्यात अर्वाचीन काळातील महाराष्ट्रीय ब्राह्मणाची उपनावें आढळतात कोंकणस्थब्राह्मणातील पटवर्धन व घैसास, आणि देशस्थ ब्राह्मणातील घळीसास, पाठक व तिवाड या उपनावाचा यात उल्लेख केलेला आहे तिवाड या उपनावाचे देशस्थ ब्राह्मण घाटावर व उत्तर कोंकणातही आहेत बिचण्णाचे

पश्चात् त्याचा अधिकार व दर्जा त्याचा मुलगा चौंड यास प्राप्त झाला होता. त्याचें नांव एका दानपत्रांत दिलेलें आढळते ! त्यानें कृष्णदेवाची देवगिरी येथें समक्ष भेट घेऊन दानपत्रांत नमूद केलेला गांव ब्राह्मणांस दान देण्याबद्दल त्याची मंजुरी मिळविली, अशा आशयाचा त्यांत मजकूर आहे.

## मनोली येथील शिलालेख.

हा शिलालेख पंचलिंगदेवाच्या मंदिरांतील एका दगडावर खोदला आहे. बेळगांव जिल्ह्यांतील सौंदत्ति गांवापासून सहा मैलावर, मलप्रभा नदी व सौंदत्ति यांचे दरम्यान पंचलिंग नांवाचें एक पवित्र स्थान आहे. शिला-लेखांतील भाषा जुनी कानडी आहे. सिंघणदेवाचा सेनापति पुरुषोत्तम यानें सदरील देवस्थानास शके ११९५ त कांहीं जमीनी दान दिल्याचा यांत उल्लेख आहे. सदरील दानपत्रांत कृष्णदेव हा जैतुगीचा मुलगा, सिंघणाचा नातु, व देवगिरी येथील राज्यकर्ता होता असें त्याचें वर्णन केलें आहे. त्याच्या नांवापूर्वी पुढें लिहिल्याप्रमाणें बिरुदें लाविलीं आहेत:–'भुजबल' 'प्रौढप्रताप' व 'चक्रवर्ति,' वगैरे.

शके ११७४
इ. स. १२५२

## चिकेरवाडी येथील ताम्रपट.

या ताम्रपटाचे तीन तुकडे असून ते एका कडींत अडकविलेले आहेत, त्यावर हनुमानाची मुद्रा आहे. कन्हरदेवाचा मंत्री मल्लिसेटी यानें तेथील महादेवाच्या मंदिराचे सेवाभागी पश्चिम ब्राह्मण होते त्यांस मांदेय चागेवाडी येथील कांहीं जमिनी दान दिल्या होत्या ! परंतु त्या कामी देव-गिरीचे कन्हरदेव राजाची मंजुरी घेतलेली नव्हती. मल्लिसेटीच्या

शके ११७५
इ. स. १२५३

पश्चात् त्याचा मुलगा चौंडशेटी यानें देवगिरीस जाऊन त्या दानपत्रास राजाची मंजुरी मिळविली. सिंघणदेवास जैतुगी या नांवाचा एक मुलगा होता असा यांत उल्लेख आहे.

## बेहट्टी येथील ताम्रपट.

हा ताम्रपट संस्कृतभाषेंत असून कायस्थ लिपींत आहे. त्यावर हनुमानाची मुद्रा आहे. या ताम्रपटावर सूर्य-चंद्र कोरलेले आहेत. गांवाचें नांव बेहट्टी असें दिलें आहे. कृष्णदेवाचा प्रधान चौंडराज यानें

शके ११७५
इ. स. १२५३

कोक्नूर गांव दोन ब्राह्मणांस दान दिल्याचा यांत उल्लेख आहे. कुंतल प्रांतांत तीनशें खेड्याचा बेलगोला या नांवाचा परगणा आहे, त्यांत या गांवाचा समावेश होतो. हा ताम्रपट कन्हेरदेवाच्या राजवटीच्या प्रारंभापासून सातव्या वर्षांतील आहे.

## कोल्हापुर येथील शिलालेख.

कोल्हापुरच्या राजवाड्यांत हा शिलालेख आहे. यादवनारायण

शके ११७२
इ.स. १२५०

श्रीकन्हरदेव याचे राजवटींत कमय्या नाईक हा प्रधानगिरीचे कामावर असतांना कोल्हापुर येथील जकात ( Customs duty ) वसूल करण्याचें काम जैतमल्ल राऊत या नांवाच्या अधिकाऱ्याकडे सोंपविण्यांत आलें होतें.

याखेरीज कोल्हापुर शहर व त्याच्या आसपासच्या प्रांतात कन्हरदेवाच्या वेळचे कानडी भाषेंत कोरलेले बरेच शिलालेख व ताम्रपट आहेत पण ते ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचे नाहींत.

कृष्णदेव ऊर्फ कन्हर हा कट्टा हिंदुधर्माभिमानी होता. त्यानें पुष्कळ यज्ञ केले, व सनातन हिंदुधर्मास कालवशात् प्राप्त आलेली ग्लानि दूर करण्याचें श्रेय त्यानें संपादिलें असें व्रतखंडांत म्हटलें आहे. वैदिक कर्ममार्गावरील लोकांची श्रद्धा कमी होत चालली असें त्याच्या नजरेस आल्यामुळें त्याजमध्यें धर्मजागृति करण्याचे बरेच प्रयत्न त्यानें केले. कन्हरदेवाच्या राजवटींत महानुभावपंथ उदयोन्मुख झाला होता. या पंथास "जयकृष्णीयपंथ अथवा कृष्णसांप्रदाय असें दुसरें नांव आहे. ज्याप्रमाणें वैष्णव पंथाचें उपास्य दैवत विष्णु, व शैवपंथाचें शिव, त्याप्रमाणें महानुभावपंथाचें उपास्यदैवत श्रीकृष्ण होय. या पंथाबद्दलची थोडी माहिती पुढील भागांत देण्याचें योजिलें आहे. महानुभावी वाङ्मयांत कन्हरदेवाचा उल्लेख केलेला आढळतो. या पंथाचा "लीळाचरित" या नांवाचा धर्मग्रंथ आहे. महानुभावपंथाचा संस्थापक व "लीळाचरिताचा" कर्ता श्रीचक्रधर हा कृष्णदेवाचा समकालिन होता असें दिसतें. श्रीचक्रधर स्वामीच्या दर्शनास देवगिरीचा यादवराजा कृष्णदेव हा आपला बन्धु महादेवराव यासह शके ११७८ सालीं मौजे लोणार जिल्हा बुलढाणा येथें गेल्याचा उल्लेख महानुभावीय मराठी वाङ्मयांत केलेला आढळतो त्याबद्दलचा उतारा पुढें दिला आहे.

"कुंटी भैरवीं अवस्थान राजया दर्शन (लोणारी) सोमवनी पर्शी कान्हरदेवराय दर्शना आला. समागमें महादेवराव राय धाकुटा होता. रायेनीं आधु दर्शना केलिया परी न येता तयाचां आनि पुनकेली थाम पाहतां बंदीजन म्हनती "देइ ओर्जी सिंगनाचा कान्द प्रमाण झाला" त्या द्रव्याचा स्वीकार न करता कमळजेचा

यदीयगन्धद्विपगण्डपालीनिष्यूतदानाम्बुतरङ्गिणीषु ।
सोम समुद्रप्लवपेशलोपि ममज्ज सैन्यै सह कुङ्कुणेश ॥ ५० ॥
सीमोल्लङ्घनमेव यस्य जगतां संहार इत्युच्यते
युद्धे वज्रधरेपि य. क्षितिभृत मैनाकमत्रायत ।
स्मार स्मारमपुण्य तु सदमद सदोद्दावानल
तेनाम्भोनिधिनापि कुङ्कुणपतिर्नारक्षि कुक्षिस्थित ॥ ५१ ॥

वरील श्लोकात महादेवराजानें गुजराथ, लाट, कोंकण व कर्नाटक या प्रांताच्या राजास जेरीस आणून त्याना आपले माडलिक बनविलें असें वर्णन केलें आहे देवगिरीच्या राजाला ( महादेवास ) झंझा-वाताची उपमा देऊन त्यानें तैलंगदेशाच्या राजास कापसाप्रमाणें उडवून दिलें व गुजराथच्या गर्विष्ठ राजाची तुलना पर्वताबरोबर करून महादेवरायरूपी वज्रानें त्याचा चुराडा केला असें काव्यमय वर्णन वरील श्लोकात दिलें आहे. कर्नाटकाचें आधिपत्य त्यावेळीं होयसल वंशातील यादवाकडे असावें असें दिसतें त्यावेळचा कोंकणचा राजा शिलाहारवंशीय सोमेश्वर हा होता त्याजबरोबर महादेव यानें निकरानें युद्ध केलें त्यात सोमेश्वर पडला व कोंकण-प्रांत महादेवाच्या अमलाखालीं आला ऐतिहासिकप्रसंगाचें वर्णन करताना काव्यमय भाषा वापरण्याची प्राचीन ग्रंथकार प जणु काय लज्जतच लागून राहिली होती कोंकणच्या लढाईचें वर्णन करताना त्या प्रांताचा राजा सोमेश्वर हा समुद्रांत पोहण्याच्या कामात अत्यंत तरबेज होता, तथापि यादवराजाच्या हत्तीच्या गडस्थलातून स्त्रवणाऱ्या दानरूपी पाण्याच्या नद्यात तो बुडून मेला असें या युद्धाचें काव्य-मय वर्णन वरील श्लोकात दिलें आहे महादेवरायाचा भाऊ कृष्ण

देव यानें कोंकणावर स्वारी केली होती परंतु त्यास त्याकामीं यश आलें नव्हतें. परंतु महादेवरायानें आपल्याबरोबर हत्तींचें मोठें दळ घेऊन कोंकणावर पुन्हा एकदा स्वारी केली व त्यात सोमेश्वराचा पूर्ण पराजय करून कोंकणप्रांत आपल्या कबजात घेतला. कोंकणप्रांत समुद्रालगत असल्यामुळें सोमेश्वराच्या पदरीं आरमार असलें पाहिजे जमीनीवरील युद्धात पराभव झाल्यामुळें आपला बचाव करण्यासाठीं त्यानें आपल्या आरमाराचा आश्रय केला असल्यास आश्चर्य नाहीं. परंतु आरमारी युद्धातही सोमेश्वरास यश न येता तो आपल्या जहाजासह समुद्रात बुडून मेला असावा असें अनुमान काढण्यास जागा आहे. उत्तर कोंकणावर शिलाहारवंशाच्या एका शाखेचें बरीच वर्षे राज्य होतें तें देवगिरीच्या महादेवरायाच्या राजवटींत सोमेश्वरानें गमाविलें महादेवरायानें कोंकणप्रांत हस्तगत केल्यावर तेथील कारभार पहाण्यास आपला प्रतिनिधि नेमिला होता. पंढरपूर येथील शिलालेखाच्या ( परिशिष्ट न. ९.) पहिल्या रकान्यात महादेवराय व श्रीरामचंद्रदेवराव याचा उल्लेख केलेला असून त्यांच्या नावापूर्वी यादवनारायण प्रौढप्रताप, चक्रवर्ति अशी बिरूदे लाविलीं आहेत. महादेवरायाच्या कारकीर्दीत काश्यपगोत्री केशवनायक या नावाचा एक ब्राह्मण सुभेदार होता, त्यानें अप्तोर्याम नावाचा यज्ञ केला होता, असाबद्दल पंढरपूरच्या शिलालेखात उल्लेख केलेला आहे. कोंकण काबीज केल्यावर महादेवरायानें त्या प्रांताच्या सुभेदारीवर काण्वादिन शाखेचा काश्यपगोत्री केशवनायक (कृष्णदेव) याची नेमणूक केली होती. असें अन्जूरच्या शिलाशासनावरून व ओवळे येथील ताम्रपटावरून दिसतें. चतुर्वर्गचिंतामणि नावाचा प्रचंड ग्रंथ हेमाद्रीनें

महादेवरायाचेच राजवटींत लिहिला, असें त्या ग्रंथातील प्रत्येक अध्यायाच्या अखेरीस लिल्या कालोपीन ( समाप्तिसूचक वाक्य ) मध्यें दिलेल्या मजकुरावरून स्पष्ट दिसतें

महादेवरायाच्या वेळचे सुमारें १८ शिलालेख आहेत त्याची यादी परिशिष्टांत २ मध्यें दिली आहे बहुतेक शिलालेख कर्नाटकप्रांता-संबधा असून कानडा भाषेत लिहिले आहेत त्यांत ऐतिहासिक माहिती म्हणण्यासारखी नाहीं

महादेवरायानें उत्तरकोंकणचा अखेरचा शिलाहारवंशीय राजा सोमेश्वर याचा पूर्णपणे पराभव करून तो प्रांत हस्तगत केला असें "बखरीत" म्हटलें आहे, परंतु ह्या गोष्टीस स्वतंत्र पुरावा असल्याचें आढळून येत नाहीं कुलाबा जिल्ह्यांतील अलिबाग तालुक्यात माडवें व थळ या नावाची गांवें आहेत त्याचे दरम्यान एक शिवालय आहे त्यांत शके ११०२ (इ स ११८०) सालचें एक दानपत्र शिलेवर कोरलेलें आहे सदरील दानपत्रात कोंकणचा चक्रवर्तिराजा श्रीअपरादित्य यानें आपले आयुरारोग्याच्या वृद्धिसाठीं श्रीविघ्ननाथदेवाच्या पंचोपचाराचे पूजेकरिता पर्वणीचा योग साधून एक जमीन दान दिल्याचा मजकूर आहे यावरून निदान इ स ११८० पर्यंत शिलाहारवंशीय राजाचा उत्तर कोंकणावर अमल होता हें उघड दिसतें तसेंच मुंबईबेटातील परळ येथील गव्हर्नरच्या जुन्या बंगल्याजवळ शके ११०९ चा शिलालेख सापडला आहे, त्यातही उत्तर कोंकणचा तत्कालिन राजा महाराजाधिराजचक्रवर्ती अपरादित्य याचा उल्लेख आहे सदरील शिलालेखात उत्तर कोंकणातील 'षतशष्टि' उर्फ साष्टी प्रांताचा उल्लेख केला आहे या महादेवरायाचा भाऊ कृष्ण उर्फ कन्हेर यानें आपल्या

राजवटींत उत्तरकोंकण प्रांतावर स्वारी केली होती. परंतु त्यास त्या स्वारींत यश आलें नाहीं अशी हकीगत पुढें येऊन गेली आहे. उत्तरकोंकणाच्या शिलाहारराजांची संपूर्ण वंशावळ हल्लीं उपलब्ध आहे त्यावरून त्या वंशांतील शेवटचा राजा सोमेश्वर होता असें दिसतें. महादेवरायानें जमिनीवरील व आरमारी युद्धांत ज्या सोमेश्वराचा पराभव करून उत्तर कोंकण काबीज केलें तोच हा सोमेश्वर असावा यांत संदेह नाहीं. उत्तर कोंकणावर शिलाहार राजाचा अंमल शके ९३९ पासून शके ११०१ पर्यंत अप्रतिहत होता व त्या अवधींत इतर देशाच्या कोणत्याही राजानें उत्तरकोंकणांत आपला अंमल चालविला नाहीं असें अनुमान काढण्यास पुष्कळ जागा आहे. महादेवरायानें निरनिराळ्या देशावर अनेक मोहीमा केल्या त्याबद्दल ऐतिहासिक माहिती उपलब्ध नाही. शके ११९४ च्या पैठणच्या ताम्रपटावरून महादेवरायानें अनहिलपट्टणच्या विसलदेवाचा सपशेल पराभव केला होता असें दिसतें.

महादेवरायाचा महानुभावपंथाच्या वाङ्मयांत उल्लेख केलेला आहे. महादेवरायाचें राजवटींत आमचा चरित्रनायक हेमाद्री याम करणाधिपाच्या हुद्यावर नेमण्यांत आलें होतें, यावरून विद्वान व कर्तृत्ववान् पुरुषाच्या गुणांना गौरव करण्याकडे त्याचा कल होता यांत शंका नाहीं. हेमाद्रीनें सनातन हिंदुधर्माची सुसंघटना करण्यासाठीं 'चतुर्वर्ग चिंतामणि' नांवाचा प्रचंड धर्मग्रंथ रचिला त्यानें सर्व श्रेय महादेवरायाकडेच आहे. ही गोष्ट सदरील ग्रंथाच्या प्रत्येक अध्यायाचे अखेरीस हेमाद्रीनें लिहिलेल्या कोलोफोनवरून दिसतें. महादेवराय हा जसा सनातन हिंदुधर्माचा कट्टा अभिमानी होता तसाच मराठी भाषेच्या पुष्कर्ष

तो नेहमीं म्हणत असे. महानुभावपंथ उर्फ कृष्णपंथ नुकताच उदयो-न्मुख झाला होता व त्या पंथाचा संस्थापक श्रीचक्रधर स्वामी हा मराठी भाषेचा पुरस्कर्ता होता. त्याचे राजवटींत संस्कृत मराठी ग्रंथकारास चांगलें उत्तेजन मिळत होतें ही गोष्ट हेमाद्री व बोपदेव ह्यास ग्रंथरचनेच्या कामीं त्याजकडून जो आश्रय मिळाला त्यावरून उघड दिसते. कृष्णदेवाच्या पश्चात त्याचा अज्ञान मुलगा रामचंद्रदेव ह्यास गादी न मिळतां महादेवाला ती कशी प्राप्त झाली ह्याचें पूर्वी विवेचन केलें आहे. आमणाच्या वधामुळें देवगिरीच्या दरबारात दुही माजून मनांत बेदिली उत्पन्न झाली व या यादवीचा अनिष्ट परिणाम यादवघराण्यातील शेवटचा राजा रामदेवराव याजवर झाला. पेशवाईंत राघोबादादा ह्यानें आपला पुतण्या नारायणराव ह्याचा राज्यलोभानें वध केल्यामुळें जो मराठीराज्यावर अनिष्ट परिणाम झाला व तें जसें नष्ट झालें, तद्वत् रामदेवरावानें आपला चुलतभाऊ आमण ह्याचा अमानुषपणें वध केल्यामुळें यादवाच्या राज्याची घडी कायमची मोडली व देवगिरीचें राज्य इ. स. १३१८ च्या अखेरीस लयास गेलें !!

महादेवरायाच्या वेळेच्या काहीं शिलालेखात व ताम्रपटात त्याच्या वेळच्या मांडलिकाचा व मुख्य प्रधानाचा उल्लेख केलेला आढळतो. त्याची माहिती ऐतिहासिकदृष्ट्या महत्वाची आहे. शके ११८३, ११८४ आणि ११८७ मध्यें गट्टावेलाळ येथें गट्टराज घराण्यातील तिसरा गट्ट हा राज्य करीत होता. तसेंच देवगिरीच्या यादवराजाच्या राज्यापैकीं दक्षिणेकडील भागावर महाप्रधान देवराज ह्याची शके ११८६ मध्यें सुभेदार म्हणून नेमणूक करण्यात आली होती

व त्या भागावर तो अंमल करीत होता. महाप्रधान सर्वाधिकारी तौरगलेय देवरास ह्या नांवाचा महादेवरायाचा मुख्य प्रधान होता. तसेंच महाप्रधान सिंगय्या देवणनायक हा शके ११८६ मध्यें प्रधान होता. तसेंच हंगरट्टगे प्रांतावर गणपति देवरास ह्या नांवाच्या मांडलिकाचा शके ११८७ मध्यें अंमल होता. व शके ११९१ मध्यें महाप्रधान सर्वाधिकारी पिप्परस आणि शके ११९२ मध्यें महाप्रधान सर्वाधिकारी चित्तरस अशीं नांवें त्याच्या प्रधानमंडळांत निर्दिष्ट केलेलीं आढळतात. शिवाय हेमाद्रि हा त्याच्या मुख्य मंत्र्यांपैकीं एक होताच. हेमाद्रीनें एका विशिष्ट पद्धतीवर महादेवाच्या राजवटींत शेंकडों हिंदु देवालयें बांधिलीं अशी हकीकत पूर्वी येऊन गेली आहे. त्या कामीं हेमाद्रीस महादेवरायाचा संपूर्ण आश्रय असल्यावांचून त्याचे हातून अशी प्रचंड कामें होणें शक्य नव्हतें.

देवगिरीच्या राजांनीं आपला अम्मल दक्षिणेकडे कर्नाटक–तैलंगण वगैरे प्रांतावर मोठ्या धडाडीनें प्रस्थापित केला होता. कृष्णदेव ऊर्फ कन्हरदेव याचें मंत्रिमंडळांत मल्लीसेट्टी, चौंडीसेट्टी, कामय्या नाईक इत्यादि कानडी गृहस्थांचीं नांवें प्रामुख्यानें आढळतात. त्याचप्रमाणें महादेवरायाचे पदरीं असलेल्या मंत्रिमंडळांतील मुख्य प्रधानांचीं जीं नांवें वर दिलीं आहेत तीही कानडी आहेत. यावरून या दोनही यादवराजांचा ओढा कानडी लोकांकडे विशेष होता हें निःसंशय होय. कर्नाटक व त्याचे आसपासचे प्रदेश जिंकून घेण्याचे कामीं या दोनही राजांनीं त्या प्रांतांतील कर्तबगार लोकांना हातीं धरून आपला कारभार उरकून घेतला होता व त्यांना मोठमोठ्या हुद्यावर नेमून आपलेसें करून घेतलें होतें. यावरून या

दोनही राजाच्या अगदी मुत्सद्देगिरी दिसून येते खुद्द हेमाद्री हा महाराष्ट्रीय ब्राह्मण असून कर्नाटकप्रांतातील रहिवाशी होता, असें पूर्वी म्हटलें आहे आंध्र, चालुक्य, शिलाहार, राष्ट्रकूट यांचीं राज्यें दक्षिणेकडे कर्नाटक व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत भरभराटीस आल्यामुळें त्या प्रांतातील लोकांस आपली कर्तबगारी लोकांच्या निदर्शनास आणण्यास अवसर मिळाला होता महाराष्ट्रांत त्या काळीं उच्च वर्णाच्या लोकांची फारशी वस्ती नव्हती व तें राजकीय केंद्र नसल्यामुळें महाराष्ट्रियांच्याऐवजीं राजकारणांत कर्नाटकीयांचें वर्चस्व होतें ही गोष्ट नाकबूल करता येणार नाहीं. शिलाहारराजाची मुख्य शाखा कोल्हापूर, व कऱ्हाडच्या आसपास असल्यामुळें उत्तरकोंकणातील शिलाहाराचे दरबारांत तेलगी अथवा कर्नाटकीयांचें वर्चस्व असणें साहजिक होतें निरनिराळ्या शिलाशासनांत व दानपत्रांत जीं ब्राह्मणांचीं नांवें आढळतात, त्यांच्या नांवापुढें "अय्या" "अपय्या" अशीं बहुमानार्थी उपपदें जोडलेलीं आढळतात. उत्तरकोंकणातील ठाणेनजीकच्या ओंवळे व अजूर येथील दानपत्रांत ब्राह्मणांचीं जीं नांवें दिलेलीं आहेत त्यावरून वरील म्हणण्यास दुजोरा मिळतो. कर्नाटकप्रांताचा तत्कालीन राजकीय इतिहास त्या प्रांतातील लोकांस फार भूषणावह आहे अनुकूलपरिस्थितींत कर्नाटकीय लोक आपल्या अगदी कर्तबगारी व मर्दुमकी दाखविण्याचेकामीं महाराष्ट्रीयास अथवा इतरास हार जाणार नाहींत यांत संशय नाहीं दक्षिणेकडील कल्याणचे चालुक्यराजे व कोल्हापूरचे शिलाहार राजे यांचे दरबारांत व विजयानगरचे राज्यांत तेलगी लोकांबरोबर कानडी लोक जबाबदारीच्या जागेवर नेमले जात असत. विजयानगरचे राज्य भरभराटीस आणणेचे कामीं कर्नाटकप्रांता-

तील लोक अग्रेसर होते ही गोष्ट त्या राज्याच्या इतिहासावरून स्पष्ट दिसते.

## रामदेवराव ऊर्फ रामचंद्रदेव.

रामदेव ऊर्फ रामदेवराव हा देवगिरीच्या यादव राजघराण्यांपैकीं अखेरचा राजपुरुष होय. त्याच्या मृत्युबरोबर दक्षिणेंतील हिंदूंचें स्वतंत्र राज्य नष्ट झालें. शके १०२७ त महंमद गझनवीनें सोमनाथावर स्वारी करून तेथील देवालयाचा विध्वंस केल्यापासून हिंदुस्थानावर मुसलमानांचा कटाक्ष होता. रामदेवरावाची कारकीर्द सुरू होण्यापूर्वी सुमारें शें-सव्वाशें वर्षें मुसलमानांचा अंमल उत्तर-हिंदुस्थानांत भक्कम पायावर प्रस्थापित झाला होता. तथापि मुसलमानांचें दक्षिणेकडे अद्याप लक्ष वेधलें नव्हतें. रामदेवरावाच्यावेळीं दिल्ली येथें खिलजी घराण्याचा अंमल होता. दिल्लीच्या तख्तावर असलेल्या बादशहाचा पुतण्या अल्लाउद्दिन खिलजी हा करी येथें सुभेदारीचे हुद्यावर होता, तो फार धाडसी व साहसी वृत्तीचा पुरुष होता. त्यानें दख्खनवर स्वारी करून तो प्रांत दिल्लीच्या बादशहाच्या अंमलाखालीं आणण्याचा जणुकाय विडा उचलिला होता.

शके ११९२–१२३१
इ. स. १२७१–१३०९

'महादेवाच्या पश्चात् त्याचा मिथा वारस त्याचा मुलगा आमण हा होता. परंतु रामदेवरावानें आपल्या मार्गांतील कांटा काढून टाकून आपण गादी कशी मिळविली याबद्दलचा वृत्तांत पूर्वी दिला आहे. शके ११९३ च्या पैठण येथील ताम्रपटांत व नाशिके येथील जैनांच्या धर्मसंबंधींच्या शके ११९१ च्या दान-पत्रांत मात्र महदेव आमणाचा उल्लेख आहे. धर्मांच्या वंशावळीत

त्याच्या नांवाचा मागमूसही नाहीं. "व्रतखंड" हा ग्रंथ महादेवराजाच्या कारकीर्दित पुरा झाला असल्यामुळें त्यांत दिलेल्या राजप्रशस्तींतील हकीगत त्या राजापर्यंतचीच आहे. महानुभावपंथाचा उदय शके १२०० शेंच्या अखेरीस देवगिरीच्या आसपासच्या मुलुखांत झाला होता. तत्कालीन महानुभावीय ग्रंथांत रामदेवरावानें आमणाचा क्रूरपणें वध करून देवगिरीची गादी अन्यायानें बळकाविली असा उल्लेख केलेला आढळतो. महानुभावपंथाचा मुख्य धर्मग्रंथ "लीळाचरित" या नांवाचा आहे त्यांतील 'लीळा संख्या ७२५' यांत दिलेल्या मजकुरावरून या प्रसंगावर चांगला प्रकाश पडतो. तो मजकूर येणेंप्रमाणें:—

सविता नागनाथी वस्ती ॥ इंद्रभट राज्यांत शोधघणें प्रवेशू ॥
मग सर्वज्ञांस उदेयांचा । पूजावसरू जालेयां अनंतरें : ॥
तैसेंचि विळिचेया पाहारा । संवीतयांसी निगालें ॥
महादेव पाटक गांवा गेले । गोसावीः संचितेयाः वीजे केलें ॥
तेथ गावां पश्चिमे नैरुत्य । आथाहत वीस्तीर्ण पूर्वामुख
नागनाथाची जगतीः । मंडपा तीन दारवठे ।
पूर्वीला दारवटां जगती आंतु साजें । मंडपासि भवंतीआं पवळी॥
तेथचौकीः आसनः तंवं याइसींः इंद्रभट्टातें तेल आणु पाठविलेंः
मग सर्वज्ञें माघौतें याहीरि वीजें केलेंः
जगतीचेया दारवटाची । उत्तरीली सोंडीपवरीः याहिरि आसनः
तथा उभे असोति ॥ छ ॥

तंवं इंद्रभट्ट तेलु घेवौनि आलेः सर्वज्ञें भणीतिलें ' इंद्रे ३४ गावांतु वार्ता काइ भातु': 'जी कांहीं नाहीं जी' सर्वज्ञें भणीतलें ' वार्ता कैसी यां कांहीं नाहीं' राज्यांतरू जालेंः रामदेवो रावो राज्यीं

बैसला आमणदेयो खाली उतरीला देवगीरि पाल्टीली ॥ तथा हा नव्हे लोकु पल्तु असे ॥ हा होए जा वार्ता शोधा तुमचे ए गावी सोइरे असति आनवार्ता कैसी नाहीं ॥ कैसे काही नाहीं एसणें राज्यांतर जालें आमणदेयाचे डोळे काढीलें: रामदेवो राजी बैसला: ए नव्हे की धायारें जातें असेंति, भणौनि सर्वज्ञें तया खाटारें थीकरें दाखविलें सर्वज्ञे भणितलें 'एक वेळ शोधा पा जा' ॥ठा॥

हो का जी भणौनि इद्रभट मागुते गेले शोधिले पयौनि सर्वज्ञापुढे सांघीतलें 'साच जी हें काई हो अपूर्व' तेही भणितले हाति सेहाणी मारिला पाट्सेहाणी भेदिला नरसिंह देऊपळाला आमणदेआचे डोळे फाडिले: रामदेऊ राऊराजी बैसला: ऐसे शोधौनु आले सर्वज्ञा पुढारा सनिकरू सांघितलें तव लोकु घरा येथौनि पाहात असें मग गोसावी देउळा तु र्यांचें केलें ॥

लीलाचरित्रकार हा देवगिरीच्या रामदेवराव यादव याचा समकालिन असल्यामुळें वरील उतार्‍यात दिलेल्या मजकुरात सत्यांश असलाच पाहिजे

श्रीपरशुराम व्यासानें १३ व्या शकात श्रीनागदेवाचें चरित्र लिहिलें आहे त्यात रामदेवरायानें आत्महत्या केल्याचा स्पष्ट उल्लेख केला आहे तो येणेंप्रमाणें —

रामदेवरावो म्लेच्छवधनी राणिये विडंबना धवलें भविष्ये घप मुसानुवादु ॥ हिर्हीलिया मुस्लमानाची फउक लीला १७ वी आली तेणें रामदेवरावो परिला देवगिरिचे राणिया विटंबिल्या मेले भटोबासी निरोगया आइके ॥ भविष्य केले आन भणितलें रामदेवरावो म्लेच्छी परिला

परि सुटेल: तंव एकी भणितलें तो कांइसेनी सुटेल: तंव भटो-वासी भणितलेः नामीजंव पर्गतवर्तें तंव महाराष्ट्रीं जाधवराज्य वर्तले तेचि केविः ॥ यस्मिन्देशे वसेत्ज्ञानी योगीवाधामचेतसः ॥ तन्मंडलं पवित्रं च सर्वोपल्लववर्जितम्॥ ऐसा भटोबासी श्लोक भाणौनि भणितलेः ते मा धरिलेना परितेणें आत्महत्या आनसंतामहंतांचे या वोळटेया इतरांचेनि सांगातधर्में राज्यनीति विध्वंसोनिया प्रवर्तला म्हणौनिचि धरिला: हें जालें हातवणीः आझुई जेवण तें पुढें उरलेंचि असेः

महानुभावपंथाच्या वाङ्मयांत "भानुविलास" नांवाचा सर्वोत्कृष्ट ग्रंथ आहे. त्यांत शिशुपालवध या काव्याचा कर्ता भास्कर कविश्वर ऊर्फ भानुभट्ट बोरीकर याच्या ग्रंथांतील जो उतारा दिला आहे तो फार महत्त्वाचा आहे. त्यांत देवगिरीच्या यादवराजांचा कन्हर-देवापासून रामदेवरायापर्यंत त्रोटक वृत्तांत दिला असून रामदेवरावानें आपला पुतण्या आमण याचे डोळे काढून ठार केल्याचा उल्लेख आहे तो असाः—

सिंहणराये देवगिरी । तेयाचा कन्हर अवधारी
तेआंपाठीं राज्याधरी । महादेवराय बैसिला ॥
तयापाठीं आमदये । राजी बैसला गतान्वये
तेया न मनी रामरायें । ओळटेआं प्रवर्तिला ॥
हाति सेनिका घर्षीले । पाट सेनिका मर्दिले
आमदयाचे नेत्र काढिले । रामु राजी बैसिला ॥
रामाराया पासुनी । जमा आले पुत्र तीनी
घईल ठाकरु प्रतापाशी । युद्धपटु ॥
तयाधारा वल्लाळ भुपु । जेयांश्रा वाणी नेणिजे प्रतापु
जेयांची दिठी नसहाती रिपु । समरांगणी

तयाधारा यिंयदेवो । जेणे वैरियाचा फेडला ठावो ।
जेया नरुचे द्वावभावो । कामिर्कांचा ॥
शंकरु आपणा रायो भणवी । ते पह्माळ नरुचे जीवी ॥
असंसितु घातु पर प्रसवी । पाडन यचे ॥
जाणोनि दंदसंधु । दोघा केला विभागु ।
तेणें फिटला दुःखरोगु । यादवांचा ॥
भल्लाळ त्रिलिंगावरी । रक्षण ठेविलें सैंहाद्री ।
शंकरा राहविले देवगिरी । आपणाजवळी ॥
यिंया गुजरातेवरी । गडे केले देहाउरी
स्वर्गी धाये जीणिले अरी । भूमंडळीं ॥
ऐसा तो वल्लाळ भूपती । राणीव करीतायें पर्वती ।
तेणेंसी साधिली प्रीती । विनायक दीक्षितें ॥

वरील विस्तारपूर्वक दिलेल्या उतान्यावरून रामदेवरावाचे चरित्रावर चांगला प्रकाश पडतो. याच्या उलट श्री ज्ञानेश्वरमहाराजनें ज्ञानेश्वरीच्या अखेरीस रामदेवरावाबद्दल जी प्रशंसा केली आहे तीही येथें देणें जरूर आहे.

ऐसें युगीं परि कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं
श्री गोदावरीच्या कूळीं । दक्षिणलिंगीं ॥ १ ॥
त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोश क्षेत्र ।
जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥ २ ॥
तेथ यदुवंशविलास । जो सकळकलानिवास
न्यायातें पोषी क्षितीश । श्रीरामचंद्र ॥ ३ ॥
तेथ महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें ।
केलें ज्ञानदेवें गीतें । देशीकार लेणें ॥ ४ ॥

परि मुंटलः तंव एकी भणितलें तो कांइसेनी मुंटलः तवं भटोवासी भणितलें. नामीजय पर्गतवर्ते तंव महाराष्ट्रीं जाधवराज्य वर्तले तेचि केवि. ॥ यस्मिन्देशे वसेत्ज्ञानी योगीवाधामचेतसः ॥ तन्मंडल पवित्रं च सर्वोपल्ववर्जितम्॥ ऐसा भटोवासी श्लोक भाणोनि भणितलेः ते मा धरिलेना परितेंणें भ्रातृहत्या आनसंतामहंताचे या वोखटेया इतराचेनि सांगातधर्मे राज्यनीति विध्वंसोनिया प्रवर्तला म्हणौनिचि धरिला' हें जालें हातवणीः आझुई जेवण तें पुढें उरलेंचि असेः

महानुभावपंथाच्या वाङ्मयात "भानुविलास" नांवाचा सर्वोत्कृष्ट ग्रंथ आहे. त्यात शिशुपालवध या काव्याचा कर्ता भास्कर कविश्वर ऊर्फ भानुभट्ट बोरीकर याच्या ग्रथांतील जो उतारा दिला आहे तो फार महत्त्वाचा आहे. त्यात देवगिरीच्या यादवराजांचा कन्हरदेवापासून रामदेवरायापर्यंत त्रोटक वृत्तांत दिला असून रामदेवरायानें आपला पुतण्या आमण याचे डोळे काढून ठार केल्याचा उल्लेख आहे तो असा —

सिंहणरायें देवगिरी । तेयाचा कन्हर अवधारी
तेमांपाठीं राज्याधरी । महादेवराव बैसिला ॥
नयापाठी आमदये । राजा बैसला गतान्वये
नेया म मनीं रामरायें । धोपटेआं प्रवर्तिला ॥
हानि सेनिका पर्घाले । पाट मेनिका मर्दिले
आमदयाचे नेत्र काढिले । रामु राजा बैसिला ॥
रामाराया पाढुनी । जमा आले पुत्र तीनी
पर्डोल दाकरु प्रतापाशी । युद्धपट ॥
तयाधारत महाढ्य भुपु । जेयांत्र घाणो नेणिजे प्रतापु
जेयांची दिठी नसदाती रिपु । समरांगणी

तयाधारा सिंघदेवो । जेणे वैरियांचा फेडला ठावो ।
जेया नरुचे हावभावो । कामिकांचा ॥
शंकरु आपणा रावो भणवी । ते पह्माळ्य नरुवे जीवी ॥
असंसितु यातु पर प्रसवी । पाडन यचे ॥
जाणोनि दंदसंधु । दोघा केला विभागु ।
तेणें फिटला दुःखरोगु । यादवांचा ॥
भह्माळ्य सिलिंगावरी । रक्षण ठेविलें सैंहाद्री ।
शंकरा राहविले देवगिरी । आपणाजवळी ॥
सिंवा गुंजरातेवरी । गडे केले देशाउरी
स्वर्ग यायें जीणिले अरी । भूमंडळी ॥
ऐसा तो पह्माळ भूपती । राणीव करीतापे पर्वती ।
तेणेसी साधिली प्रीती । विनायक दीक्षिलें ॥

वरील विस्तारपूर्वक दिलेल्या उताऱ्यावरून रामदेवरावाचे चरित्रा-वर चांगला प्रकाश पडतो. याच्या उलट श्री ज्ञानेश्वरमहाराजानें ज्ञानेश्वरीच्या अखेरीस रामदेवरावाबद्दल जी प्रसंशा केली आहे तीही येथें देणें जरूर आहे.

ऐसें युगीं परि कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं
श्री गोदावरीच्या कूळीं । दक्षिणलिंगीं ॥ १ ॥
त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोश क्षेत्र ।
जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥ २ ॥
तेथ यदुवंशविलास । जो सकलकलानिवास
न्यायातें पोषी क्षितीश । श्रीरामचंद्र ॥ ३ ॥
तेथ महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें ।
केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें ॥ ४ ॥

शके ११९३ च्या पैठणच्या ताम्रपटांत देवगिरीच्या यादव राजांची जी वंशावळ ( परिशिष्ट नं. ९ ) मध्यें दिली आहे, तींत रामचंद्रानें महादेवाचा मुलगा आमण याजकडून राज्य बळकावून घेतलें असें मोघम म्हटलें आहे. त्यावरून व महानुभावीय ग्रंथांतलि दिलेल्या उताऱ्यावरुन रामदेवानें आमणाचा वध केला ही गोष्ट निःसंशय होय. कै. राजवाडे यांनीं रामचंद्रदेवराजावर एका ग्रंथाच्या आधारें ब्रह्महत्त्येचें पाप लादलें आहे. या गोष्टीस जरी कांहीं आधार नसला तरी भ्रातृहत्त्येच्या अघोर पातकापासून रामदेवरावाची सुटका होणें अशक्य आहे. रामदेवरावाचा चुलता महादेवराय यानें अन्यायानें गादी बळकाविली म्हणून त्याच्या मुलास देहांत प्रायश्चित्त देणें केव्हांही न्यायाचें होणार नाहीं.

रामदेवराव जर इतका दुष्ट व दुरात्मा होता तर त्यास श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं न्यायी कसें म्हटलें हा प्रश्न उद्भवतो. श्रीज्ञानेश्वरमहाराज हे कोणाचीही अवास्तव स्तुति करणाऱ्यांपैकीं नव्हते. तसेंच श्रीज्ञानेश्वरमहाराजासारख्या निरपेक्ष वृत्तीच्या संताला रामदेवरावाकडून कांहीं मिळवावयाचें नव्हते. कांहीं झालें तरी रामदेवरावानें आपला चुलतभाऊ आमण यास ठार मारल्याचा जो तत्कालीन वाङ्मयांत पुरावा सांपडतो त्याजकडे दुर्लक्ष करतां येत नाहीं. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे वसतिस्थान देवगिरीपासून फार लांब नव्हतें, तेव्हां रामदेवरावाच्या अघोर कर्माची वार्ता त्यांच्या कानावर गेली नसेल ही गोष्ट संभवत नाहीं! या मुद्याचा विचार करतांना, श्रीज्ञानेश्वर महाराजांचा जन्म आमणाचे वधानंतर झाला होता, ही गोष्ट विसरतां कामा नये! ज्ञानेश्वरीच्या अखेरीस देवगिरीचा यादवराजा रामदेवराय याच्याबद्दल

दिलेला मजकूर प्रक्षिप्त आहे असें काहीं विद्वानांचें मत आहे. वरील विवेचनावरून सदरील मत केवळ टाकाऊ आहे असें म्हणता येणार नाहीं. श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं रामदेवरावासंबधानें दिलेलें मत कदाचित् ग्राह्य आहे असें धरून चाललें तरी या वादग्रस्त मुद्याचा दुसऱ्या बाजूनें विचार करता येण्यासारखा आहे. कालिदासानें आपल्या कुमारसंभवात हिमालयाचें वर्णन करताना " एकोहि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दो किरणेष्विवाङ्क । असें म्हटलें आहे. या न्यायानें रामदेवरावाच्या एकंदर गुणराशींपुढें आमणाच्या वधाच्या गोष्टीचा श्रीज्ञानेश्वरमहाराजासारख्या धर्मराजास विसर पडणें शक्य आहे रामदेवराव हा संस्कृत व मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धिकरता फार झटत असे व त्याच्या दरबारात विद्वान लोकाचा फार गौरव होत असे यामुळें त्याची कीर्ति दूरवर पसरली होती शिवाय त्यानें कर्नाटकातील व उत्तरकोंकणातील ब्राह्मणास जमिनी व गावें दान दिल्यामुळें त्याची कारकीर्द लोकास प्रिय झाली असली पाहिजे. या व इतर कारणामुळें घरगुती भाडणाकडे तत्कालीन लोकानीं कानाडोळा केला असल्यास नकळे !!

रामदेवरावास शंकर नावाचा एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन अपत्यें होतीं असें सर रामकृष्णपंत भांडारकर यांच्या दक्षनच्या इतिहासात देवगिरीच्या यादवाची जी वंशावळ दिली आहे त्यावरून दिसते. परंतु प्रस्तुत भागाच्या अखेर दिलेल्या न. च्या वंशावळीत रामदेवराव यास भीम ( बिंब ) या नावाचा आणखी एक मुलगा होता असें म्हटलें आहे. अल्लाउद्दीन खिलजीनें आपल्या मुलाकरता करणवाघेल्याकडे त्याच्या कमलदेवी नावाच्या मुलीला मागणी

केली होती त्याबद्दलची फेरिस्तानें आपल्या पुस्तकांत जी हकीकत दिली आहे त्यावरूनही रामदेवरावाला भीम अथवा बिंब–या नांवाचा मुलगा होता ही गोष्ट दिसून येईल. ती हकीकत अशी:–अल्लाउद्दिनानें गुजराथचा राजा करणवाघेला याची सुंदर स्त्री दिवाळदेवी हिला बलात्कारानें आपल्या ताब्यांत घेऊन तिला बेगमच्या पदवीस चढविलें. दिवाळदेवीला करणवाघेल्यापासून कमलदेवी नांवाची एक सुंदर कन्या झाली होती. तिला दिल्लीस आणण्याबद्दल दिवाळदेवीनें अल्लाउद्दिनाचें मागें नेट लावला. त्यामुळें अल्लाउद्दीनानें तिला हस्तगत करण्यासाठीं आपल्या सरदारांबरोबर बरेंच सैन्य पाठविलें. ही वातमी करणवाघेल्यास समजताच तिच्या बचावाची तजवीज त्यानें आरंभिली. देवगिरीच्या रामदेवरावानें आपला युवराज शंकरदेव याजकरितां कमलदेवीची मागणी करणवाघेल्याकडे पूर्वी केली होती, परंतु आपण क्षत्रिय कुलांतील असून यादवाचें घराणें कमी दर्जाचें आहे, या सबबीवर कमलदेवीबद्दलची रामदेवरावानें केलेली मागणी त्यानें नाकारली होती. परंतु अल्लाउद्दिनानें आपल्या मुलासाठीं कमलदेवीची मागणी घातली हें करणवाघेल्यास समजताच त्याच्या अंगाचा तिळपापड झाला. रजपूत घराण्यांतील मुलगी मुसलमानाकडे देण्यापेक्षां ती कमी दर्जाच्या हिंदु युवराजास देणें बरें, असा पोक्त विचार करून करणवाघेल्यानें आपली मुलगी कमलदेवी, शंकरदेवास देण्याचें ठरविलें, व तिला शंकरदेवाचा भाऊ भीमदेव याजबरोबर देवगिरीस पाठवून दिलें. आपणास कोणी ओळखूं नये म्हणून कमलदेवीनें पुरुषवेष धारण केला होता. कमलदेवीस बरोबर घेऊन भीमदेव देवगिरी जवळ येत नाहीं तोंच अल्लाउद्दिनाकडील सैन्याच्या तुकडीनें त्यास

गांठलें व त्या उभयतांची चकमक उडाली त्यांत कमलदेवी मुसलमानाच्या तावडींत सांपडली व भीमदेवास आपला जीव बचावण्याकरितां पळ काढावा लागला !!

पेशव्यांकडून साष्टीप्रांत इंग्रजाकडे सालवाईच्या तहानंतर आल्यावर, त्या प्रांतांतील जमीनींची पहाणी करून त्यांतील बऱ्याच जमिनी लागवडीस आणण्यासाठीं कंपनी सरकारानें कांहीं शर्तीवर मुत्सद्दी लोकांस इनाम करून दिल्या. इ. स. १८०८ साली ईस्ट इंडिया कंपनीनें या प्रांताच्या जमीनमहसुलासंबंधानें रेग्युलेशन नं. १ चा कायदा प्रसिद्ध केला. त्यांत पोर्तुगीज अमलाखाली साष्टीप्रांत असल्यावेळीं तेथील जमीनमहसुलाच्या पद्धतीची हकीकत देतांना पुढें दिलेलें विधान केलें आहे.—

The fiscal policy under Raja Bimb was far superior to that of the Portuguese as will be found from records

" बिंबराजाचे राजानें राजवटींत साष्टीप्रांतांत त्यानें जमीनमहसुलाची जी पद्धत सुरू केली होती ती, तो मात पोर्तुगीज लोकांच्या अंमलाखालीं असल्यावेळच्या पद्धतिपेक्षा पुष्कळ पटीनें श्रेष्ठ होती, असें जुन्या दप्तरावरून दिसतें." यांत ज्या दप्तराचा ( Record ) उल्लेख केला आहे ते मिळविण्याबद्दल प्रस्तुत लेखकानें बराच प्रयत्न केला पण त्यास यश आलें नाहीं. संशोधकांनी या बाजूनेंत नेटानें प्रयत्न केल्यास हें दप्तर कदाचित् हातीं येण्याचा संभव आहे. अल्लाउद्दिनानें देवगिरीस शह देऊन रामदेवरायाचा पराभव केल्यानंतर देवगिरीचें यादवांचें साम्राज्य उध्वस्त झालें. शंकरदेवानें

अल्लाउद्दिनास हांकून लावण्याचा मोठ्या नेटानें प्रयत्न केला परंतु दैव प्रतिकूल असल्यामुळें व अल्लाउद्दिनाच्या गनिमी काव्यापुढें त्याचे सर्व प्रयत्न निष्फळ झाले. या धामधुमींत भीमदेवानें पैठणाहून कांहीं निवडक मंडळीसह उत्तर कोंकणचा रस्ता धरला. हा प्रांत महादेवरायानें शिलाहारवंशीय सोमेश्वरराजाकडून जिंकून घेतला होता, व त्यावर अमल करण्याकरितां आपले प्रतिनिधी नेमिले होते. शिवाय हा प्रांत सह्याद्रिपर्वताच्या पलीकडे समुद्रकिनाऱ्यालगत एका बाजूस असल्यामुळें सुरक्षितपणाच्या दृष्टीनें फार सोयीचा होता.

रामदेवरावास शंकरदेवाखेरीज भीम व बल्लाळ असे आणखी दोन मुलगे होते असा महानुभावीय ग्रंथांत उल्लेख सांपडतो. रामदेवरावानें आपल्या तीनही मुलांस निरनिराळ्या प्रांतावर देखरेख करण्याचे कामावर नेमिलें होते असें सदरील ग्रंथावरून समजतें. शंकरदेव हा युवराज असल्यामुळें त्यास रामदेवरावानें आपलेजवळ ठेवून घेतलें होतें. बल्लाळ याची नेमणूक त्रिलिंग प्रांतावर केली होती व भीमदेवास गुजराथच्या सुभेदारीचे काम दिलें होतें.

बल्लाळ याचा उल्लेख महानुभावीय ग्रंथाखेरीज दुसरे कोठेंही आढळून येत नाहीं. परिशिष्टांत दिलेल्या निरनिराळ्या शिलालेखांच्या आधारें या भागाच्या अखेरीस ज्या वंशावळी दिल्या आहेत त्यावरून व वर दिलेल्या हकीकतीवरून रामदेवराव यास भीम उर्फ बिंब या नांवाचा मुलगा होता व त्यानें अल्लाउद्दिनाच्या देवगिरीवरील स्वारीनंतर उत्तरकोंकण हें आपलें कायमचें राहण्याचें स्थान केलें ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते.

"देवगिरीचे रामदेवराव यादव यास जिन अथवा भीम या नावाचा मुलगा नव्हता व त्यानें उत्तर कोंकणात येऊन तेथील राज्यकारभार केव्हाही केला नाहीं" अशी विधानें काहीं पंडित-मन्य व बेजबाबदार लेखकांनीं कित्येक ग्रंथात केल्याचें आढळून येतें परंतु ती अगदीं निराधार असल्याचें वरील विवेचनावरून स्पष्ट दिसून येतें

हेमाद्रीनें वोपदेवाच्या "मुक्ताफल" ग्रंथावर कैवल्यदीपिका नावाची टीका लिहिलेली आहे. तिच्या उपसंहाराचा कोलोफोन (अध्याय समाप्तिसूचक वाक्य) आहे तो असा —

"इति श्रीमत्-प्रौढप्रतापचक्रवर्तिमहाराजाधिराजसोमयदुवंशोद्भव-रामराज-मन्त्रिवर्यहेमाद्रिविरचितामुक्ताफलटीका समाप्ता"

यावरून ही टीका लिहिली गेली तोपर्यंत तरी हेमाद्रि हा रामदेवरावाच्या राजवटीत मुख्य मंत्रिपदावर होता असें दिसते तसेंच "मुक्ताफल" ग्रंथाच्या अखेरीस ग्रंथोपसंहार म्हणून हेमाद्रि-संबंधीं श्रीवोपदेवानें एक प्रशंसापर लेख लिहिला आहे. त्यांत हेमाद्रि या शब्दाचा श्लेष साधुन देवगिरीच्या रामदेवरावराजाची दाशरथी रामाबरोबर तुलना केली आहे. याबद्दलचें विवेचन दुसऱ्या भागात विस्तृतपणें दिलें आहे

शके ११०५–०८ च्या पंढरपुर येथील शिलालेखात तेथील श्रीविठ्ठलमंदिर बांधण्यास ज्या दानशूर गृहस्थांनीं देणग्या दिल्या त्यांची शब्दलचक यादी आठ रकान्यात दिली आहे. त्यांतील पहिल्या रकान्यात हेमाडपंत व देवगिरीचे सम्राट श्रीरामचंद्र-देव यांचीं नावें नमूद केलीं आहेत यावरून रामदेवरावाच्या

कारकीर्दीच्या निदान आरंभीं तरी हेमाद्री हा त्याचा मंत्रि होता ही गोष्ट निर्विवाद होते.

रामदेवरावाच्या कारकीर्दींतील शिलालेखांची व ताम्रपटांची संख्या अवळजवळ तेवीस आहे. त्यांची यादी परिशिष्ट नं. २ मध्यें दिली आहे. त्यापैकीं महत्त्वाचे ताम्रपट व शिलालेख यांची त्रोटक माहिती पुढें देण्यांत येत आहे.

### दावणगेरे येथील शिलालेख.

हा शिलालेख कानडी भाषेंत आहे. या शिलालेखावरून रामदेवराव याचे कारकीर्दींत देवगिरी येथील यादव राजाचा अमल म्हैसूर प्रांतावर होता हें सिद्ध होतें.

शके ११९३
इ. स. १२७१

### पैठण येथील ताम्रपट.

सदरील ताम्रपटाचे तीन तुकडे असून ते फार भरीव आहेत. त्याचें वजन २३०० शें तोळे असून त्यांना जोडणाऱ्या वर्तुळाकार कडीचें वजन ४५० तोळे आहे. ताम्रपटाची भाषा संस्कृत असून तो देवनागरी लिपींत कोरलेला आहे. कडीवर यादवराजाची राजमुद्रा-गरूड-आहे. या ताम्रपटांतील देवगिरीचे यादवांचा वंशावळ या भागाच्या अखेरीस नं. ९ मध्यें दिली आहे. मल्लुगीचा थोर मिल्हराज याजपासून या ताम्रपटांतील ऐतिहासिक वंशावळीस आरंभ होतो. या सिंहराजानें कर्नाटकाच्या राजास जिंकिलें, पाड्यदेशाच्या राजास शिक्षा केली, व गुर्जर देशाच्या राजास हुसकाऊन लाविलें. पांचव्या विक्रमाचा मुलगा जैत्रपाल उर्फ जैतुगी यानें त्रिकलिंगदेशच्या राजास ठार

शके ११९३
इ. स. १२७१

मारलें, व चोल देशच्या पदच्युत केलेल्या गणपति नावाच्या राजास त्याची गादी पुन्हां मिळवून दिली. या जैतुगीचा मुलगा सिंघण ( कृष्ण उर्फ कन्हरदेवाचा बाप ) याच्या पराक्रमाचें विस्तृत वर्णन या ताम्रपटात केलें आहे तें असें:—

हर्म्मीराम ( एक मुसलमान सरदार ? ) १ सिंघणानें चांगलेंच पाणी पाजिलें ( त्याला आपल्या पराक्रमानें जीत केलें ) २ बल्लाळास ( एक हॊयसळ यादवराजा ) जिंकिलें. ३ आंध्रराजा ४ कक्कल व भंजागिरीचे राजे यास त्यानें पदच्युत केलें. कृष्णदेवानें गुर्जर राजाचा पराभव केला.

महादेवरायानें अन्हिलपट्टण येथील चालुक्यवंशांतील वाघेला शाखेच्या विशाळदेव नांवाच्या राजाचा पराभव केला. महादेवाचा मुलगा आमण याजपासून रामदेवरावानें राज्य हिरावून घेतलें. या ताम्रपटांत रामदेवरावानें पैठण नजीकच्या वाडाथान गावचा, २७ ब्राह्मणांना शके ११०३ प्रजापति संवत्सर माघ शु॥ १२ बुधवारी अग्रहार केला. या गावाबरोबर आणखीही दोन गांवें दान करण्यात आलीं. त्यांची नावें (१) पाटारापिपळगाव व (२) वैद्यवोगरगाव.

ज्या ब्राह्मणांस सदरील गाव दान देण्यात आले होते त्यांची गोत्रें येणेंप्रमाणें—१ वसिष्ठ २ मुद्गल ३ विष्णुवृद्ध ४ भारद्वाज ५ कौंडिण्य ६ विश्वामित्र ७ हारित ८ गर्ग ९ गार्ग्य १० जामदग्न्य ११ वत्स १२ कनिष्क १३ वाध्रियम १४ आत्रेय १५ गौतम १६ काश्यप १७ देवरात.

या ताम्रपटांत गोदावरी नदीच्या काठावरील, पैठण नजीकच्या कांहीं गांवांचीं नावें दिलीं आहेत तीं येणें प्रमाणें —१ पाटारगांव

२ नेउर ३ देवगाव ४ रारीगाव ५ अलुगाव ६ वागथान ७ जाणतेगाव ८ पार्णाल ९ घडसल. यांतील बरीच गावें अद्याप विद्यमान आहेत

दान दिलेल्या गावासंबंधीं काहीं शर्ती दानपत्रात नमूद केल्या आहेत त्या सामाजिकदृष्ट्या फार महत्त्वाच्या आहेत म्हणून त्या येथें देतों---१ जुगार खेळण्याची मनाई, २ विश्वयोपितास गावात राहाण्याची मनाई, ३ शस्त्रें वापरण्याची मनाई, ४ सदरील गावात राजाचे नोकर येऊन राहिल्यास त्यास कराची माफी यावरून दान दिलेल्या गावात पवित्र वातावरण राखण्याबद्दल दान देणारे तत्कालिन राजे किती दक्ष असत यानद्दलची कल्पना करता येते

पैठणचा ताम्रपट म्हणजे देवगिरीच्या यादवराजाच्या आयुष्यक्रमातील घडलेल्या गोष्टींची सर्वसाधारण सूचि होय या ताम्रपटात देवगिरीच्या यादवराजाची त्रोटक माहिती देण्यात काहीं विशिष्ट हेतु असावा असें दिसतें निरनिराळ्या राजांनीं केलेल्या पराक्रमाची सूत्ररूपानें माहिती दिली असल्यामुळें दरएक बाबतीसंबधानें संपूर्ण माहिती मिळविण्याबद्दलची अपेक्षा करणाऱ्याची निराशा होते

## ठाणें नजीकच्या ओवळें गांवचा ताम्रपट

हा ताम्रपट संस्कृत भाषेंत असून गद्य-पद्यात्मक आहे लिपी देवनागरी आहे ओवळें येथील धडगें उकरीत असता एका मुसलमानास

शके ११०४
इस १२८२

हा ताम्रपट सापडला त्यात दिलेल्या वंशावळीची सुरवात यादवराजाच्या पाचव्या भिल्लमापासून होते ती या भागाच्या अखेरीस न. ० मध्यें दिली आहे होयसळ यादवाच्या राजाबरोबर लढताना पराभूत झाल्यामुळें कर्नाटकातील काही भाग ज्या भिल्लमास गमावून

असावें लागलें, व देवगिरी येथें स्वतंत्र राज्याची स्थापना करणें भाग पडलें तोच हा भिल्लम होय. प्रस्तुत ताम्रपटामध्यें रामदेवराव यादवाची भरपूर स्तुति केली आहे त्याच्या नावापुढें बिरुदें दिलीं आहेत तीं येणेंप्रमाणें " एकांगवीर " " यादव नारायण " " द्वारावतीपुरवराधीश " " प्रौढप्रतापचक्रवर्ति " " यदुकुलकमलिकाविलास " वगैरे. याशिवाय त्याच्या पराक्रमाचें काव्यमयभाषेंत वर्णन केलें आहे तें येणेंप्रमाणें १ " गुर्जरकुंजरदानकंठीरव " ( गुजराथ देश हाच कोणी मदोन्मत्त हत्ती त्याचा फडशा उडविणारा सिंह ) यावरून रामदेवरायाचे राजवटींत गुजराथेवर यादवांची आणखी एखादी मोहीम झाली असावी असें दिसतें " तैलिंगतुङ्गतरून्मूलनमत्तदन्तावल " ( तेलंगण देशचा राजा हाच कोणी उंच वृक्ष त्यास उपटून टाकणारा हत्ती ) यावरून रामदेवरायानें तेलंगण प्रांत जिंकून तो आपले अमलाखालीं आणला असावा असें मानण्यास जागा आहे. ३ " मालवप्रदीपशमनमलयानिल " ( मालवदेशचा राजा हाच कोणी एक दिवा, त्यास मालविणारा वारा) यावरून मालवदेशानें राज्य रामदेवरायाचें राजवटींत संपुष्टांत आलें होतें असें मानण्यास जागा आहे. बहुतेक शिलालेखानें व ताम्रपट हे प्रशस्ति उर्फ पोवाड्याचे स्वरूपाचे असल्यामुळें त्यांतील ऐतिहासिक सत्य निवडून काढणें फार कठीण आहे इतर पुराव्याच्या अभावीं त्यावर ऐतिहासिक दृष्ट्या भिस्त ठेवणें जोखमाचें आहे

रामदेवरायाचे राजवटींत हेमाद्रि हा मुख्य मंत्रि असून तो सर्व राज्याचा आधारस्तंभ होता व त्याचकडे हस्तिदलाचें आधिपत्य होतें त्यानें यादवांचे राज्यांतील " झाडी " नावाच्या वरमोर

रानटी टोळीचा कायमचा बीमोड केला व तो गुणराशीचा केवळ पर्वतच होता अशा आशयाचें त्याजबद्दलचें वर्णन प्रस्तुत ताम्रपटांत दिलें आहे. त्यावरून हेमाद्रीच्या चरित्रावर चांगला प्रकाश पडतो.

महादेवरायानें उत्तरकोंकणाधिपति शिलाहारवंशीय सोमेश्वराचा पराभव करून तो प्रांत आपले कबजांत घेतल्यावर त्यावर आपले प्रतिनिधि नेमण्यास सुरवात केली. रामदेवरावाचे कारकीर्दींत उत्तर-कोंकणावर अच्युत नायक नांवाचा एक पराक्रमी ब्राह्मण सुभेदारीचें काम पाहात होता. त्यानें ठाणे नजीकचा ओंवळे गांव शके ११९४ अंगिरानाम संवत्सर, आश्विन शु॥ ५ रविवार या दिवशीं ३२ ब्राह्मणास दान दिला त्या गांवाच्या चतुःसीमा येणें प्रमाणें–पूर्वेस कामेश्वर देवाचा गाव ( हल्लींचें कावेसर गांव ) दक्षिणेस सीतलेश्वर पश्चिमेस कोपेश्वराचा गांव उत्तरेस मांभवज नदी ( हल्लींची उल्हास नदी जी वसईच्या खाडीस मिळते ती); शिवाय हा गांव दान देतानां त्यांतील तृण, जळ, काष्ट, पाषाण, निधि निक्षेप वगैरे यांचा समावेश करण्यांत आला आहे. हल्लींचे जात इनामी गांवात अशा शर्ति नेहमी पाहाण्यांत येतात. त्यावरून यागांवातील जमिनीची पूर्ण मालकी दान घेणारास प्राप्त होते. या ताम्रपटांत ज्या अच्युत नाय-

१ हें ओंवळें गाव ठाणें शहरापासून पांच मैलावर अद्याप आहे आगगाडी होण्यापूर्वी घाटावरील माल भिवंडी मार्गानें यागांवातून ठाणें शहरांत येत असे.

काचा उल्लेख केला आहे, त्याची सविस्तर माहिती दिली आहे ती येणें-प्रमाणें—तो सरवरिया ( उत्तर हिंदुस्थानांतील कनोज प्रांतांतील ) जातीचा ब्राह्मण होता. त्याच्या आजाचें नांव जल्हण व बापाचें नांव मुधुगी असें होतें, तो सर्व शास्त्रांत प्रवीण असून युद्धकलेंत फार निष्णात होता. तो हयात असतांना सूर्य अथवा चंद्र यांस उगवण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. तो केवळ चिंतामणिच होता, असें त्याचें काव्यमय वर्णन प्रस्तुत ताम्रपटांत केलें आहे. त्याचें घराणें उत्तरकोंकणच्या राजाचें मांडलिकांपैकीं होतें. म्हणजे त्यांची गणना तत्कालिन छोटे संस्थानिकांत होत होती. अच्युत नायकाच्या पराक्रमामुळें पश्चिमेकडील राजे त्याला थरकांप भीत असत.

अस्सल ताम्रपट नजरेखालून न गेल्यामुळें अच्युतनायकाच्या जाती संबंधानें बऱ्याच बेजबाबदार लेखकांनीं निराधार विधानें केलीं आहेत. कित्येकांनीं तो सारस्वत ब्राह्मण होता असें विधान केलें आहे, तर कांहींनीं तो देशस्थ यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचा ब्राह्मण होता असें आपलें ठाम मत दिलें आहे. प्रस्तुत ताम्रपटांत अच्युत नायक हा उत्तरहिंदुस्थानांतील सरवरिया जातीचा ब्राह्मण होता असें स्पष्ट म्हटलें आहे. त्यामुळें त्याच्या जातीसंबंधानें ओढाताण करण्याचें कारण नाहीं. शिवाय जल्हण व मुधुगी हीं नांवें महाराष्ट्रीय नसून कान्यकुब्ज ( कनोजे ) ब्राह्मणाच्या नांवाशीं जुळतीं आहेत. या ताम्रपटांत ज्या ३२ ब्राह्मणांस ओवळें गांव दान दिला त्यांपैकीं कांहीं ब्राह्मणांचीं नांवें वाचता येण्यासारखीं असल्यामुळें ती पुढें देण्यांत येत आहेत.

१. विष्णु भानु दीक्षित ( गार्ग्यगोत्री १ दि )

२. विष्णु प्रभु ( जामदग्न्य, वत्सगोत्र १ हि )
३. बापु नायक राघव नायक ( अत्रिगोत्र १ हि )
४. वासुदेव भट्ट नारसिंह पंडित ( जामदग्न्य–वत्स १ हि )
५. खेतमाचार्य कृष्णाचार्य ( वसिष्ठगोत्र १ हि )
६. नागदे ( व ) भट्ट माधवभट्ट ( जामदग्न्य–वत्स १ हि )
७. औथतृ सोमनाथ घैसास ( गौमतगोत्र १ हि )
८. नागदेवभट्ट पुरुषोत्तमभट्ट ( भारद्वाज १ हि )
९. रामेश्वरभट्ट सोमदेवभट्ट ( भारद्वाज १ हि )
१०. कान्हुपाध्याय दामोदर–उपाध्याय ( चंद्रात्रेयगोत्र १ )
११. त्रिविक्रम घैसास वासुदेव घैसास ( काश्यपगोत्र १ )

यांतील बहुतेक उपनांवें ऋग्वेदी देशस्थ व यजुर्वेदी माध्यंदिन शाखेच्या ब्राह्मणांच्या उपनांवाशीं जुळतात. प्रभु हें उपनांव ब्राह्मणांतहि असल्याचें आढळून येतें. गोत्रापुढें '१ हि' अशीं अक्षरें आहेत त्याचा अर्थ समजण्यास मार्ग नाहीं.

## अञ्जूर ( ठाणें नजीकचें ) येथील शिलालेख.

प्रस्तुत शिलालेख रामदेवराव याचे राजवटीतील आहे. यांत देवगिरीच्या यादवराजांची दिलेली वंशावळ ओंवळे गांवच्या ताम्रपटांतील वंशावळीशीं जुळते. आरंभी श्रीगणेशाची प्रार्थना केल्यानंतर, परमेश्वरानें वराहावतार घेऊन क्रीडा केली असें वर्णन केलें आहे. देवगिरीच्या

शके १२१२.
इ. स. १२९०.

यादवराजघराण्याची गादी स्थापणारा पांचवा भिल्लम याचा उल्लेख पहिल्यानें करून नंतर त्याचा मुलगा जैत्रपाल, नातु सिंघण; पणतु कृष्ण; कृष्णाचा भाऊ महादेव व कृष्णदेवाचा मुलगा रामचंद्र

अशी क्रमवार वंशावळ दिली आहे. त्यांत आमणाच्या नांवाचा उल्लेख केलेला नाहीं रामदेवराव याची निरदें पुढें लिहिल्याप्रमाणें दिलीं आहेत: १ द्वारावतीपुरवराधिश्वर २ यादव कुलकमलकलिकाविकासभास्कर ३ रायनारायण ४ महाराजाधिराजप्रौढप्रताप ५ चक्रवर्ति इ. इ.

रामदेवरायाच्या राजवटींत उत्तर कोंकणप्रांताच्या कोशाधिपतींचे ( खजिनदाराचे ) काम चांगदेवाकडे होतें, व महामात्याचे जागेवर एकदेव पंडित हा होता. रामदेवरायानें कोंकणप्रांताचा सर्व अधिकार श्रीकृष्णदेवाकडे सोंपविला होता. रामदेवरायाचें आयुरारोग्य व ऐश्वर्य याची वृद्धि व्हावी म्हणून कोंकणच्या श्रीकृष्णदेवानें अञ्जूर गाव ( ग्वाजण वराटी पलिसुधा ) निरनिराळ्या शाखेच्या व गोत्राच्या ४० ब्राह्मणास शके १२१२ विरोधिसंवत्सर वैशाख शुद्ध १५ या दिवशीं दान दिला. अञ्जूर गांवच्या चतुःसीमा येणें-प्रमाणें–पूर्व, पश्चिम व दक्षिण या तीनही बाजूस नदी, उत्तरेस चोळी-ग्राम हल्लींचें चोळेगाव, दानपत्रांत तृण, जल, तरु-काष्ट, पाषाण, निधि-निक्षेप सुद्धा असे शब्द आहेत प्रस्तुत ताम्रपटांत उत्तर कोंकणावर रामदेवरायानें नेमिलेला प्रतिनिधी (Viceroy) श्रीकृष्णदेव ऊर्फ केशिदेव यांची थोडी माहिती दिली आहे. ती ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाची आहे. सिंघण राजानें कारकीर्दीत पद्मनाभ या नावाचा भारद्वाज गोत्री ब्राह्मण होता. त्यानें आपल्या सदाचरणानें सिंघण राजाची चांगली मर्जी संपादन केली होती. त्याचे पोटीं चामदेव (ब्रह्मदेव) या नावाचा मुलगा निपजला. तो फार अमात्य असे दिसतें. त्यास श्रीकृष्ण नावाचा मुलगा झाला. वरील चार्लीन ब्राह्मणांपैकीं महालभट्टाचें गोत्र काश्यप असून तो अग्निहोत्री होता. त्यास दामोदर या नावाचा मुलगा होता.

२. विष्णु प्रभु ( जामदग्न्य, वत्सगोत्र १ हि )
३. बापु नायक राघव नायक ( अत्रिगोत्र १ हि )
४. वासुदेव भट्ट नारसिंह पंडित ( जामदग्न्य-वत्स १ हि )
५. खेतमाचार्य कृष्णाचार्य ( वसिष्ठगोत्र १ हि )
६. नागदे ( व ) भट्ट माधवभट्ट ( जामदग्न्य—वत्स १ हि )
७. औथवृ सोमनाथ घैसास ( गौमतगोत्र १ हि )
८. नागदेवभट्ट पुरुषोत्तमभट्ट ( भारद्वाज १ हि )
९. रामेश्वरभट्ट सोमदेवभट्ट ( भारद्वाज १ हि )
१०. कान्हुपाध्याय दामोदर—उपाध्याय ( चंद्रात्रेयगोत्र १ )
११. त्रिविक्रम घैसास वासुदेव घैसास ( काश्यपगोत्र १ )

यांतील बहुतेक उपनांवें ऋग्वेदी देशस्थ व यजुर्वेदी माध्यंदिन शाखेच्या ब्राह्मणांच्या उपनांवाशीं जुळतात. प्रभु हें उपनांव ब्राह्मणांतहि असल्याचें आढळून येतें. गोत्रापुढें '१ हि' अशीं अक्षरें आहेत त्याचा अर्थ समजण्यास मार्ग नाहीं.

## अण्जूर ( ठाणें नजीकचें ) येथील शिलालेख.

प्रस्तुत शिलालेख रामदेवराव याचे राजवटींतील आहे. यांत देवगिरीच्या यादवराजांची दिलेली वंशावळ ओंवळे गांवच्या ताम्रपटांतील वंशावळीशीं जुळते. आरंभी श्रीगणेशाची प्रार्थना केल्यानंतर, परमेश्वरानें वराहावतार घेऊन क्रीडा केली असें वर्णन केलें आहे. देवगिरीच्या यादवराजघराण्याची गादी स्थापणारा पांचवा भिल्लम याचा उल्लेख पहिल्यानें करून नंतर त्याचा मुलगा जैत्रपाल, नातु सिंघण; पणतु कृष्ण; कृष्णाचा भाऊ महादेव व कृष्णदेवाचा मुलगा रामचंद्र

शके १२१२.
इ. स. १२९०.

अशी क्रमवार वंशावळ दिली आहे. त्यांत आमणाच्या नांवाचा उल्लेख केलेला नाहीं.रामदेवराव याची बिरुदें पुढें लिहिल्याप्रमाणें दिली आहेत: १ द्वारावतीपुरवराधिश्वर २ यादव कुलकमलकलिकाविकासभास्कर ३ रायनारायण ४ महाराजाधिराजप्रौढप्रताप ५ चक्रवर्ति इ. इ.

रामदेवरायाच्या राजवटींत उत्तर कोंकणप्रांताच्या कोशाधिपतीचे ( खजिनदाराचे ) काम चांगदेवाकडे होतें, व महामात्याचे जागेवर एकदेव पंडित हा होता. रामदेवरावानें कोंकणप्रांताचा सर्व अधिकार श्रीकृष्णदेवाकडे सोंपविला होता. रामदेवरायानें आयुरारोग्य व ऐश्वर्य यांची वृद्धि व्हावी म्हणून कोंकणच्या श्रीकृष्णदेवानें अञ्जूर गांव ( खाजण वराडी पल्लिसुधा ) निरनिराळ्या शाखेच्या व गोत्राच्या ४० ब्राह्मणांस शके १२१२ विरोधिसंवत्सर वैशाख शुद्ध १५ या दिवशी द न दिला. अञ्जूर गांवच्या चतुःसीमा येणेंप्रमाणें—पूर्व, पश्चिम व दक्षिण या तीनही बाजूस नदी, उत्तरेस चोळीग्राम हल्लींचे चोळेगांव; दानपत्रांत तृण, जल, तरु-काष्ट, पाषाण, निधिनिक्षेप सुद्धां असे शब्द आहेत प्रस्तुत ताम्रपटांत उत्तर कोंकणावर रामदेवरायानें नेमिलेला प्रतिनिधी (Viceroy) श्रीकृष्णदेव ऊर्फ केशिदेव याची थोडी माहिती दिली आहे. ती ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाची आहे. सिंघण राजाचे कारकीर्दींत पद्मनाभ या नांवाचा भारद्वाज गोत्री ब्राह्मण होता. त्यानें आपल्या सदाचरणानें सिंघण राजाची चांगली मर्जी संपादन केली होती. त्याचे पोटीं ब्रामदेव (ब्रह्मदेव) या नांवाचा मुलगा निपजला. तो कवि असावा असें दिसतें. त्यास श्रीकृष्ण नांवाचा मुलगा झाला. वरील चाळीस ब्राह्मणांपैकीं महाल्हभट्टाचें गोत्र काश्यप असून तो अग्निहोत्री होता. त्यास दामोदर या नांवाचा मुलगा होता.

२. विष्णु प्रभु ( जामदग्न्य, वत्सगोत्र १ हि )
३. बापु नायक राघव नायक ( अत्रिगोत्र १ हि )
४. वासुदेव भट्ट नारसिंह पंडित ( जामदग्न्य–वत्स १ हि )
५. खेतमाचार्य कृष्णाचार्य ( वसिष्ठगोत्र १ हि )
६. नागदे ( व ) भट्ट माधवभट्ट ( जामदग्न्य–वत्स १ हि )
७. औथतृ सोमनाथ घैसास ( गौमतगोत्र १ हि )
८. नागदेवभट्ट पुरुषोत्तमभट्ट ( भारद्वाज १ हि )
९. रामेश्वरभट्ट सोमदेवभट्ट ( भारद्वाज १ हि )
१०. कान्हुपाध्याय दामोदर–उपाध्याय ( चंद्रात्रेयगोत्र १ )
११. त्रिविक्रम घैसास वासुदेव घैसास ( काश्यपगोत्र १ )

यांतील बहुतेक उपनावें ऋग्वेदी देशस्थ व यजुर्वेदी माध्यंदिन शाखेच्या ब्राह्मणाच्या उपनांवाशीं जुळतात. प्रभु हें उपनांव ब्राह्मणांतहि असल्याचें आढळून येतें. गोत्रापुढें '१ हि' अशीं अक्षरें आहेत त्याचा अर्थ समजण्यास मार्ग नाहीं.

### अण्जूर ( ठाणें नजीकचे ) येथील शिलालेख.

शके १२१२
इ. स. १२९०.

प्रस्तुत शिलालेख रामदेवराव याचे राजवटींतील आहे. यांत देवगिरीच्या यादवराजांची दिलेली वंशावळ औंवळे गांवच्या ताम्रपटांतील वंशावळीशीं जुळते. आरंभीं श्रीगणेशाची प्रार्थना केल्यानंतर, परमेश्वरानें वराहावतार घेऊन क्रीडा केली असें वर्णन केलें आहे. देवगिरीच्या यादवराजघराण्याची गादी स्थापणारा पांचवा भिल्लम याचा उल्लेख पहिल्यानें करून नंतर त्याचा मुलगा जैत्रपाल, नातु सिंघण; पणतु कृष्ण; कृष्णाचा भाऊ महादेव व कृष्णदेवाचा मुलगा रामचंद्र

हे बंदर या पट्षष्टी बेटात आहे. बुद्धधर्मीयांची कृष्णगिरी ऊर्फ कान्हेरी येथील लेणी ह्याच बेटात आहेत शिवाय घाटावरून परदेशी माल पाठविण्यास व तेथून घाटावर आणण्यास श्रीस्थानक ऊर्फ ठाणे हें बंदर त्यावेळीं फार सोईचे होतें लोहमार्ग सुरू होईपर्यंत ठाणें शहराचे यानाबतीत महत्व कायम होतें सर्वबाजूनीं हा प्रांत पाण्यानें वेढला असल्यामुळें लष्करदृष्ट्याही त्यास फार महत्व होते या बेटाच्या उत्तरेकडील भागात अरबी समुद्रा नजिक मारोड नावाचा गाव आहे तेथील सरदेशमुखी व सरदेशपांडेपणाचें वतन गोविंद मिटकरी या नावाच्या गोवर्धन ब्राह्मणाकडे होतें शिवाय साष्टी व उत्तरकोंकणातील त्र्याच गावची जोशी उपाध्येपणाची वृत्ति त्याजकडे पूर्वापार चालत होती बिंबदेव उत्तरकोंकणात आल्यानंतर सदरील गोविंद मिटकरी कालवश झाला तो निपुत्रिक होता बिंबदेवास आपलेनंतर आलेल्या ब्राह्मणाच्या योगक्षेमाची तजवीज करावयाची होतीच त्यानें त्या गोष्टीचा फायदा घेऊन गोविंद मिटकऱ्याचें सरदेशमुखी व सरदेशपांडेपणाचें वतन व वृत्ति त्याची विधवा नागुणाबाई हिजला बरीच रकम देऊन तिजकडून विकत घेतली बिंबदेवानें सदरील वतन व वृत्ति पुरुषोत्तम नायक कावळे यास शके १२२१ वृष संवत्सरी वैशाख व॥ ३० रोजी सूर्यग्रहणाचे पर्वणीचा योग साधून दान दिली व तें दानपत्र शिलावर कोरून जागोजाग त्या रोवण्याची आज्ञा केली कोंकणचा सुभेदार कृष्णदेव व पुरुषोत्तमनायक कावळे हे उभयता पैठणकडील सगोत्रीय ब्राह्मण असल्यामुळें सदरील वतनें बिंबदेवाकडून संपादन करण्याचे कामीं कृष्णदेवाकडून कावळे यास बरीच मदत झाली असली पाहिजे

उत्तर कोंकणप्रांत शिलाहारांचें अमलाखालीं असतांना त्या प्रांतांत गोवर्धन ब्राह्मणांखेरीज इतर महाराष्ट्रीय ब्राह्मणांची वस्ति नव्हती असें मानण्यास जागा आहे नाशिक व त्याच्या आसपासच्या प्रदेशास गोवर्धन अशी संज्ञा होती. नाशिक नजीक त्रिरश्मि नावाचा डोंगर आहे त्याच्या गुहेंतील शिलालेखांत शालिवाहनवंशीय गोतमीपुत्र शातकर्णी यानें विष्णुपालित नावाच्या आपल्या प्रधानास दिलेला हुकूम कोरला आहे, त्यांत या प्रांतास गोवर्धन या संज्ञेनें दोनवेळां संबोधिलें आहे यावरून नाशिक व त्या शहराच्या आसपासचा भाग गोवर्धन प्रांतांत मोडत होता याबद्दल आणखीही पुरावा सांपडतो गोवर्धन ब्राह्मणांशिवाय उत्तरकोंकणांत तेलगी उर्फ द्रविड ब्राह्मणांची वस्ती होती शिलाहार राजांचे दरबारांत तेलगी उर्फ द्रविड ब्राह्मणांचें बरेंच वर्चस्व होतें, ही गोष्ट त्यांचे शिलालेख व ताम्रपट यावरून सिद्ध होते ¹ त्यांच्या प्रधानांची, अधिकाऱ्यांची व त्यांनी केलेल्या दानाचा स्वीकार करणाऱ्यांपैकीं बहुतेक जणांची नांवें तेलगी अगर कानडी आहेत शिलाहारवंशीय राजे मूळचे दक्षिणेकडील असल्यामुळें त्यांचा ओढा तेलगी आणि कानडी लोकांकडे असणें साहजिक होतें शिलाहारांचें उत्तरकोंकणांतून उच्चाटण झाल्यावर यादव राजांनीं उत्तरकोंकणांतील राज्यकारभार पाहण्यासाठीं जे लोक नेमिले होते ते देवगिरि व पैठणच्या बाजूचे होते ठाणें येथील ताम्रपटांत व अंजूरच्या शिलालेखांत प्रधानमंडळाची जी नांवें दिलीं आहेत त्यांत बहुतेक महाराष्ट्रीय आहेत गोविंद मिठकऱ्याचे पश्चात् त्याचें वतन शिलाहार राजाच्या वेळच्या पुरातन ब्राह्मणवर्गापैकीं कोणास न देतां बिंबदेवानें तें आपल्याबरोबर आलेल्या

ब्राह्मणासच दिलें यात फारसें आश्चर्य नाहीं. एखाद्या राजानें नवीन प्रांत जिंकल्यावर त्यातील वृत्तींची व इनामाची विल्हेवाट कशी लाविली जात असे ह्याबद्दल पूर्वी हकिकत दिली आहे. या गावच्या वृत्ति पुरुषोत्तम कावळ्याच्या वंशाकडे व त्याचे शाखेच्या ब्राह्मणाकडे अद्याप चालत आहेत. शिवाय साष्टी बेटातील मालाडचे हल्लीचे खोत ( मयत अहमदभाई हबीबभाईचे वारस ) याजकडून मालाडच्या सरदेशमुखी व सरदेशपांडेपणाच्या हक्काबद्दल वार्षिक वेतन त्याचे वंशजाम अद्यापपर्यंत मिळत आहे, सदरील हक्क न्यायकोर्टात प्रस्थापित करण्यात आले असून त्या हुकुमाची अमलबजावणी होत असल्याची प्रत्यक्ष माहिती प्रस्तुत लेखकास आहे.

अञ्जूर हा गाव ठाणें व कल्याण या दोन रेल्वे स्टेशनच्या दरम्यान असलेल्या दिवगावापासून नजिक आहे. इ. स. १७३९ साली वसई प्रांत पोर्तुगीज सरकाराकडून जिंकून घेण्याचे कामीं, अञ्जूरचे गणानाईक, बुवानाईक वगैरे सोमवंशी क्षत्रिय ज्ञातीचे काहीं वीरवृत्तीचे गृहस्थांनी पेशव्यास पराकाष्टेची मदत केली. या क्षत्रियवीरांनीं कळकळीनें पेशव्यास मदत केली नसती तर वसईप्रांत फिरंग्याकडून हस्तगत करण्याचे कामीं कालगति लागून मराठ्याच्या सैन्याची फार खराबी झाली असती. वसई व साष्टी प्रांत पोर्तुगीजांच्या अमलाखालीं असतांना त्यातील हिंदु रयतेवर जबरीनें बाटवून खिस्ती करण्याचा प्रयत्न तेथील अधिकाऱ्यांनी नेटानें चालविला होता. धर्मच्छलामुळें बहुतेक सुखवस्तु हिंदु लोक आपलीं घरेंदारें जमीनजुमला वगैरे जागच्याजागी टाकून देऊन इंग्रजाच्या अमलाखालीं असलेल्या नजीकच्या मुंबई बेटांत व इतर ठिकाणीं पळून गेले.

पोर्तुगिज सरकारनें त्यांची वतनें जप्त केलीं. उपरिनिर्दिष्ट केलेले पुरुषोत्तमपंत नायक कावळे ह्यास सिंघदेव यादवराजाकडून मालाड येथील सरदेसाई व सरदेशपांडेपणाचें प्राप्त झालेले वतन, त्याचे वंशज अंताजी रघुनाथ व रामचंद्र रघुनाथ कावळे ह्या दोघा बंधुकडे इ. स. १७२० चे सुमारास चालत होतें, तेंही जप्त करण्यांत आलें. शिवाय साष्टी व वसई या प्रांतातील जोशी उपाध्येपणाची वृत्ति उपरिनिर्दिष्ट कावळे बंधु ह्याचेकडेस चालत होती. त्यामुळें सदरील प्रांतातील हिंदुलोकांवर त्यांचें फार वजन होतें. सबब अंताजी रघुनाथ कावळे ह्यासी धर्म रक्षणासाठीं हिंदुलोकांचे पुढारीपण पतकरणें भाग पडलें. पोर्तुगीजाची सत्ता झुगारून देऊन त्याऐवजी मराठ्यांची सत्ता स्थापन करण्याचा त्यानें जारीनें प्रयत्न सुरू केला. प्रथम याकामीं त्यानें मुंबईतील इंग्रजसरकाराकडे दाद मागितली, परंतु इंग्रज सरकार व पोर्तुगीज सरकार यांची दोस्ती असल्यामुळें अंताजी रघुनाथ कावळे याची या कामीं निराशा झाली. नंतर अंताजी रघुनाथ कावळे यानीं सातारचे श्रीछत्रपति शाहूमहाराज याचेकडे दाद मागितली. श्रीशाहुमहाराजांनीं पेशव्यांस पत्र लिहून जरूर ती मदत अंताजी रघुनाथ यांस देण्याविषयी त्यास आज्ञा केली. इ. स. १७२९ पासून इ. स. १७४१ चे दरम्यान श्रीमंत बाजीराव बल्लाळ पेशवे, चिमणाजीआप्पा आणि नानासाहेब पेशवे ह्यांचा, अंताजी रघुनाथ कावळे व त्याचे बंधु रामचंद्रपंत ह्यांच्याबरोबर जो याबाबतीत पत्रव्यवहार झाला तो ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्वाचा आहे. त्यांतील कांहीं निवडक पत्रें ह्या पुस्तकाच्या परिशिष्टात दिलीं आहेत. वसईप्रांतावर स्वारी करून तो पोर्तुगीज सरकारापासून हस्तगत करून घेण्याविषयीं अंताजी रघुनाथ कावळे व त्याचे

निवलग मित्र व क्षत्रिय यजमान गजानाईक वगैरे ह्यांनीं पेशव्याच्या मागे सारखा नेट लावला होता

पेशव्यानीं या बाबतीत स्वतंत्र चौकशी करून वसईवर स्वारी केली, व तेथील किल्यास वेढा दिला पोर्तुगिजांनी मोठ्या चिकाटीनें व धैर्यानें किल्याचे रक्षण केलें मराठ्याकडील बरेच लोक ठार झाले अखेरीस वसईचा किल्ला पेशव्याचे हस्तगत झाला वसई व साष्टी प्रांत मराठ्यास मिळवून देण्याचे कामीं अताजी रघुनाथ कावळे व त्याचे क्षत्रिय यजमान गजानाईक, सुवानाईक वगैरे यानीं महत्त्वाची कामगिरी बजाविली, याबद्दलची कबुली श्रीमंत बाजीराव बल्लाळ पेशवे व चिमणाजी आप्पा यानीं अताजी रघुनाथ यास पाठविलेल्या पत्रात दिली आहे. पेशव्यानीं अताजी रघुनाथ कावळे यास दिलेल्या कौलातील मजकूर ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वाचा आहे

इष्ट कार्य साध्य झाल्यावर "तुमचे उर्जित करू" असें पेशव्यानीं अताजी रघुनाथ कावळे व त्याचे मित्र गजानाईक यास वेळोवेळीं आश्वासन दिलें होतें त्याप्रमाणें वसईची मोहिम फत्ते झाल्यावर गजानाईक यास अण्जूर गाव इनाम दिला व तो त्याचे वंशजाकडे अद्याप चालत आहे वसईच्या मोहिमेवर प्रकाश पाडणारे जुने कागदपत्र त्याचे वंशजांपैकी आमचे मित्र श्रीयुत दिवाकरभाई नाईक याचेकडे आहेत असें समजतें हे कागदपत्र उजेडात आल्यास वसईच्या मोहिमेसंबंधानें अद्यापपर्यंत अज्ञात असलेले एक महत्त्वाचें दालन खुलें होईल असा भरवसा आहे पोर्तुगीज सरकारनें अताजी रघुनाथ कावळे याचें जप्त केलेलें वतन पेशव्यानीं त्यास परत दिलें.

देवगिरीचा यादव राजपुत्र बिंबदेव यानें आपल्याबरोबर उत्तरकोंकणांत देवगिरी व पैठण येथील ब्राह्मण व क्षत्रिय वर्गांपैकीं जी निवडक मंडळी आणली होती त्यांच्या वंशजांनीं ४००-५० वर्षानंतर एका परकी राष्ट्राचा विध्वंस करून मराठ्याचें राज्य वाढविण्याचे कामीं मदत केली ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

अण्जूरचे गंवानाईक, बुवानाईक वगैरे सोमवंशी क्षत्रियलोकांच्या क्षात्रतेजानें वसई व साष्टीप्रांतांत हिंदुधर्माचें रक्षण झालें ही गोष्ट या नाईक घराण्यास अत्यंत भूषणावह आहे. अंताजी रघुनाथ कावळे यानीं, याप्रांतातील लोकांचे पिढीजाद पुरोहित व धर्मगुरु या नात्यानें हिंदुधर्म रक्षणाचे कामीं जे प्रयत्न केले ते त्याचे पेशास साजतील असेच होते ह्याबद्दल दुमत होणें शक्य नाहीं.

अण्जूरच्या शिलालेखावरून उत्तरकोंकणच्या सुभेदारीचें काम श्रीकृष्णदेवाकडे होतें असें दिसतें. वसईप्रांत मराठ्यांनीं मोठ्या शौर्यानें लढून हस्तगत केला व तेथील पोर्तुगिजांची सत्ता नष्ट केली याबद्दलचा संपूर्ण इतिहास आजपर्यंत उपलब्ध नाहीं. वसईच्या मोहिमेवर आजपर्यंत प्रसिद्धी झालेल्या पुस्तकांत पेशवे व अंताजी रघुनाथ कावळे याचे दरम्यान झालेल्या महत्त्वाच्या पत्रव्यवहाराचा कोणी उल्लेख केला नाहीं ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट होय.

## पंढरपूरचा "चौऱ्यायशीचा" शिलालेख.

शके ११९५ ते ११९८ ( इ. स. १२७३ ते १२७६ )

पंढरपूर येथील श्री विठ्ठलाचे नव्या मंदिराचे देवडीवर हा शिलालेख बसलेला अजून होता, तो चौऱ्यायशीचा दगड म्हणून प्रसिद्ध

आहे ह्या दगडावर पाठ घाशिली असता चौऱ्यायशीलक्ष योनींतून म्हणजे जन्ममरणाच्या रहाटोगाडापासून माणसाची सुटका होते अशी भाविकाची समजूत आहे या शिलालेखाचें विस्तृत वर्णन पहिल्या भागात दिलें असून त्यातील देणगीदाराची नावें आठ रकान्यात दिलीं आहेत. ( परिशिष्ट न ९ ) प्रो विजापूरकर यानीं आपल्या ग्रथमालेंत या शिलालेखाचें विस्तारपूर्वक वर्णन केलें आहे या शिलालेखात देणगी देणाऱ्याची यादी दिली आहे, त्यात देवगिरीच्या यादवराजापैकीं महादेवराय व श्रीरामचद्रराव याची नावें असून शिवाय त्याच्या राजवटींतील नामांकित पुरुष, हेमाद्रि (आमचा चरित्र नायक) कोंकणचा सुभेदार कृष्णदेव, पेठणचे पुरुषोत्तम नायक चागदेव वगैरेंची नावें आहेत आठ रकान्यात दिलेल्या एकदर देणगी देणाऱ्याच्या नावावरून तत्कालीन महाराष्ट्रीय थोर लोकाचा परिचय अनायासें होतो

हा शिलालेख कोरण्याचें काम शके ११९५ त सुरू झालें व तें शके ११९८ मध्यें समाप्त झालें

पढरपूरच्या श्रीविठ्ठलासनथानें महाराष्ट्रीयाचा व कर्नाटक प्रातातील रहिवाशाचा पूज्यभाव शके ११९५ च्या पूर्वीपासून असला पाहिजे श्रीविठ्ठलाचे मदिराचा जीर्णोद्धार करण्यासाठी उत्तरकोंकण देवगिरी वगैरे दूरदूरच्या प्रांताहून देणग्या देण्यात आल्या यावरून पढरपूरक्षेत्र फार प्राचीनकालापासून अभिमान असलें पाहिजे यात शका नाहीं भागवतधर्माचा उदय होण्यापूर्वी पढरीच्या श्रीविठ्ठलरायाबद्दल लोकाच्या मनात पूज्यभाव होता असें या शिलालेखावरून दिसतें

श्रीज्ञानेश्वरमहाराज हे भागवतधर्माचे पुरस्कर्ते असून त्यांच्या ज्ञानेश्वरी ग्रंथात श्रीविठ्ठलाचा नामनिर्देशही नसावा याचें आश्चर्य वाटतें ! !

हेमाद्रि व श्री. ज्ञानेश्वरमहाराज समकालीन होते असे असतां रामदेवरावाचे दरबारांत महाराजांचा बहुमान झाल्याचे आढळून येत नाहीं. श्री. ज्ञानेश्वरमहाराजांच्या मौंजविधनासंबंधानें तत्कालीन ब्रह्मवृंदांत वितंडवाद माजला होता त्यामुळें अगर त्यांच्या निरपेक्ष व साध्या वृत्ती मुळें त्यांचे हयातींत त्यांच्या अलौकिक गुणांचे चीज झाले नाहीं ही गोष्ट निःसंशय होय ! ज्ञानेश्वरीसारखा तत्त्वज्ञानपूर्ण व अधिकारी ग्रंथ हेमाद्रीच्या अगर रामदेवरावाच्या दरबारांतील विद्वानांच्या वाचण्यांत आला असता तर त्याचें चीज झाल्यावांचून खचित राहते ना ! !

या शिलालेखांतील आठ रकानें, " गद्या " नामक पंधरा रुपये किंमतीचें सोन्याचें नाणें, देणगीरूपानें देणाऱ्यांच्या नांवानी भरलेले आहेत. त्यांपैकी कांहीं नांवें ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचीं आहेत. त्यांपैकीं कांहीं पुढें दिलीं आहेत. देणगी देणाऱ्यांचे यादींत, पुरुषांप्रमाणें स्त्रियांचीही नावें आढळतात. महाराष्ट्रीय, कानडी व तेलंगी या लोकांनीं श्रीविठ्ठलमंदिराच्या जीर्णोद्धारांचें पवित्र काम पार पाडण्यासाठीं सढळ हातांनीं मदत केली यावरून महाराष्ट्र, कर्नाटक व तैलंगण या प्रांतातील लोकांचे मनांत श्रीविठ्ठलाबद्दल अत्यंत पूज्यभाव होता यांत शंका नाहीं. प्रत्येक रकान्यांत कोणाच्या मार्फत पैसे वसूल झाले त्याचा नामनिर्देश केला आहे, यावरून देणग्यांची रक्कम वसूल करण्यासाठीं प्रचारक नेमले असावेत असें दिसतें.

श्रीचक्रवर्तिरामचंद्रराव; सोडयीकार हेमाटपंडित, कौटोन हेमाडीपंडित, कोहोर हेमाद्रिपंडित; गणपति नायक; पुरुषोत्तम पंडित; कोंकणचा महादेव, वागरस कराणिक; श्रीपतिदे णायके. श्रीपतीदणाक ( नाईक ), गंगाधर नायक, मांघोली येथील यावासेणवे (फौजेचा नायक–फौजदार ), पुरुषोत्तम नायक, केशव पंडित, विजापूर येथील गोरुवाह, मांईवाई, दामोदर भट, कोकणा केसवदेव; श्रीचक्रवर्ति रामदेवराव; वामरसचा नावेए ( जोइसि नाम अय्या जोशी ), विठनायक, विनायक व देऊवाई हे त्रय, आंवळ्याचा जातिदेव, आंबे येथिल कृष्णदेव, हाडगल येथील मलोदेव, सागांवीयेथील केशवसुत माधवदेव, पैठणचा चांगदेव, सिध (शिद्) नायक, सालीव येथील यादो सेणवे, आवडे येथील रामपंडीत, पुराणिक हयवाह अय्या, वाजसनेयसुत गुरुदेव, वाडदेव व चंगदेवसुत ही त्रयी, जाईदेव सेठवल, दें पेह ( तेलंगी ) नामक हलीक ( शेतकरी ), सांय येथील बोपिसेठ, म्हैसगी येथील जगदेवराणा, अर्जुनभट व रामश्वेरभट, कैतोर येथील विठ्ठलदास, कोकणा महादेव, रुपदेवसुत तारदेव, रामणदेव; गिरिपंडित, पदुबाई करणिक, वैराग येथील टांठीनायक, विमापूर येथील घर्लदेव पंडीत, चोउचंग येथील भणगें जिंवदेव दळवै ( दळवी ), भिंगिआर ( भिंगार ) येथील हरिदेवसेंडा सेट्ठे ( सेंडे आडनांवाचे श्रेष्ठी), मेहकर नांगणा, वणगेडचा महादेव पंडित, मारवाडी वादेवण्णा, उभेमार्गी (उभागर ?) येथील तिंगवदेव लाडहरिदेव, कान्हो राईआपा, श्रीधरदासी, यादो गणमेन इ. इ.

ह्या शिलालेखांच्या चौथ्या रकान्यांतील १४३ संख्येपुढें निर्दिष्ट केलेला पुरुषोत्तम नायक हा देवगिरीच्या तत्कालीन दरबारांतील मोठा अधिकारी असावा असें दिसतें. विंबदेवानें उत्तरकोंकणप्रांताची राज्यसूत्रें शके १११७–१८ च्या (इ. स. १२०६) च्या सुमारास आपल्या हातीं घेतलीं, त्यावेळीं देवगिरी व पैठण येथील जी निवटक मंडळी आपले बरोबर नेली त्यांत पुरुषोत्तम नायक (कावळे) ह्याचे नांव प्रामुख्यानें आढळतें. शके १२२१ सालीं (इ. स. १२९९) ज्या पुरुषोत्तम नायक ( कावळे ) यांस विंबदेवानें माल्हाटप्रांताचें सरदेसाई व सरदेशपांडेपणाचें वतन दिलें तोच हा असावा असा तर्क करण्यास जागा आहे.

श्रीपंढरपूरच्या देवळाचे जिर्णोद्धाराचे कामीं रामदेवराव जाधव व आमचा चरित्रनायक हेमाद्रि यानीं सक्रिय सहानुभूती दाखवून भागवतधर्मावरील आपले उत्कट प्रेम व्यक्त केलें, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

## उनकेश्वर येथील यादव कालीन मराठी शिलालेख.

उनकेश्वर उर्फ उनक्देव हे स्थळ निजामसरकारच्या हद्दींत असिफाबाद जिल्ह्यांतील किनवट तहमिलींत आहे. तें यवतमाळ जिल्ह्याच्या सीमेवर पाइनगंगा नदीपासून चार पांच मैलांवर आहे. तेथें उनकेश्वर नावाचें एक मंदिर आहे. त्या मंदिरांत दोन शिलालेख असून तिसरा मंदिराजवळच्या दीपमालेवर आहे. या शिलालेखांत उनकेश्वरा नजीकच्या नऊ गावांची नावें दिलीं असून तीं अद्याप विद्यमान आहेत तीं येणें प्रमाणें:—बोथिये; सांगविये; लिंगी; कुर्वेली; पिंपळसेंदा; करंदी; परवदे; चीमतु; गुढ.

या तीन शिलालेखांपैकी एक लेख ऐतिहासिक दृष्ट्या महत्वाचा आहे. शिलालेखाच्या प्रथम ओळीमध्यें शके '१२११' असा मजकूर आहे. प्रस्तुत शिलालेख मराठी मध्यें लिहिलेला आहे. यादवकालीन बहुतेक शिलालेख व ताम्रपट संस्कृत अगर कानडींत आहेत. मराठी भाषेत सबंध लिहिलेला शिलालेख हा एवढाच आहे. पाटण येथील शके ११२८ च्या शिलालेखाचा अखेरचा थोडा भाग मात्र मराठीत लिहिलेला आहे. यालेखात देवगिरीचा प्रतापचक्रवर्ति श्रीरामचंद्रदेव व त्याचा मुख्याधिकारी व्यंकदेव, हेमाद्रिपंडीत व सोमदेवपंडित यांची नावें आढळतात. शिलालेखाच्या चौथ्या व पांचव्या ओळींत, त्रेतायुगीं श्रीरामचंद्र वनवासात असतां शरभंगऋषीच्या दर्शनासाठीं त्याचे आश्रमास गेले होते त्यावेळीं सदरील ऋषीच्या उपयोगासाठीं त्यानें उष्णोदक निर्माण केलें असा मजकूर आहे. उनकेश्वर येथील देव हरिहर ( उनकेश्वर महादेवाचे लिंग आणि कोदंडधारी श्रीराम ) या दोन देवांच्या पूजेअर्चेसाठीं निरनिराळ्या गावच्या जमिनी लावून दिल्याचा यात उल्लेख आहे. हा शिलालेख अपूर्ण आहे. सदरील शिलालेख भा. इ. स मंडळाच्या त्रै. ९. अ. १ मध्यें प्रसिद्ध झाला आहे. शिलालेख परिशिष्टात दिला आहे.

या खेरीज रामदेवरायाच्या वेळचे म्हैसूर प्रांतात सांपडलेले बरेच शिलालेख कानडी भाषेत आहेत पैकीं बालगाव येथील शके १२०४ चा जयस्तंभ व मोराब येथील शके १२०७ चा जयस्तंभ हे महत्वाचे आहेत. कर्नाटक प्रांतावर रामदेवरायाचा पूर्ण अंमल बसला होता, ही गोष्ट त्या शिलालेखावरून निःसंशय सार्थ होते.

सोलापूर जिल्ह्यांतील वेलापूर येथील शके १२२२ व शके १२२७ चे शिलालेख उपलब्ध आहेत त्यांत रामदेवराव यांस प्रौढप्रतापचक्रवर्ति अशीं विरुदें लाविलीं आहेत.

अल्लाउद्दीन खिल्जीनें शके १२१६ ( इ. स. १२९४ ) मध्यें रामदेवरावाचा पराभव करून त्यास दिल्लीच्या बादशहाचे मांडलिक बनविल्यानंतरचे शिलालेख व ताम्रपट उपलब्ध नाहींत.

रामदेवराव हा दक्षिणच्या स्वतंत्र हिंदुराज्यांतील शेवटचा राजा होय. त्याची कारकीर्द सुरू होण्यापूर्वीं मुसलमानाचा अंमल उत्तर-हिंदुस्थानांत दिल्ली येथें पूर्णपणें स्थापित होऊन सुमारें एक शतक लोटलें होतें. इ. स. आठव्या शतकाच्या आरंभीं मुसलमानांनीं सिंधच्या बाजूनें हिंदुस्थानास शह देण्याचा प्रयत्न केला. प्रथमतः त्यांस यावें तसें यश आलें नाहीं, तरी वारंवार स्वाऱ्या करून सिंधप्रांतातील लोकांस त्यांनीं जर्जर केलें. इ. स. ९९८ पासून महम्मद गझनवी हा उत्तरेकडून हिंदुस्थानाकडे डोकाऊं लागला. त्यानें हिंदुस्थानावर एकंदर १७ स्वाऱ्या केल्या. त्यानें तत्कालीन हिंदु राजा जयपाळ ह्याचा पराभव करून त्याजपासून पेशावर प्रांत इ. स. १००१ कात हिसकावून घेतला. इ. स. १००५।६ मध्यें त्यानें मुलतान काबीज केले. इ. स. १००८ मध्यें पुन्हा स्वारी करून त्यानें जयपाळाचा मुलगा अनंतपाळ ह्याबरोबर युद्ध केलें. त्या युद्धांत अनंतपाळाच्या पराक्रमामुळें आरंभीं त्यास यश आलें, परंतु ऐन यशप्राप्तीच्या वेळीं त्याचा स्वतःचा हत्ती उधळल्यामुळें त्याच्या सैन्यांत भयंकर गडबड उडाली. त्यामुळें विजयश्रीनें महम्मद गझनवीच्या गळ्यांत माळ घातली. महम्मद गझनवीनें लूट करून

अतोनात संपत्ति हिरावून नेली. इ. स. १०१८ मध्यें त्यानें हिंदुस्थानावर पुन्हां स्वारी केली. व कनोज व मथुरा ही शहरें लुटली. त्यावेळीं मथुरेची कीर्ति तिच्या अलोट संपत्तिमुळें व सौंदर्यामुळें दूरवर पसरली होती. शिवाय श्रीकृष्णभगवताचें तें मूलस्थान असल्यामुळे धार्मिक दृष्ट्या त्या शहरास एक प्रकारचें महत्व प्राप्त झालें होतें. अशा पवित्र व प्रसिद्ध शहराचा मुसलमानांनीं विध्वंस केल्यामुळें उत्तरहिंदुस्थानातील राजेलोकात फार खळबळ उडाली. त्यानीं एकजुटीनें महम्मद गझनवीशीं लढून त्याची खोड जिरविण्याचें ठरविलें. महमद गझनवीस ही बातमी कळताच त्यानें पुन्हा हिंदुस्थानावर स्वारी केली. आपल्या विरुद्ध संघटित प्रयत्न करणाऱ्या हिंदुराजाचा प्रमुख कालंजरचा राजा नंदराय याजबरोबर त्यानें निकराचा सामना केला. हिंदुराजाचें संयुक्त सैन्य मोठें असून त्यात ५८० हत्ती होते. परंतु महमदगझनवीच्या धडाडीमुळें हिंदुसैन्याचा त्याचे सैन्यापुढे टिकाव लागला नाहीं अखेर हिंदुराजास महमद गझनवीबरोबर तह करणें भाग पडलें.

इस्लामीधर्माचा संस्थापक महम्मद पैगंबर याचा मूर्तिपूजेवर मोठा कटाक्ष असल्यामुळें त्यानें कुराणात मूर्तिपूजकास काफीर या संज्ञेनें संबोधिलें आहे. महमद पैगंबराच्या मृत्यूनंतर त्याच्या उत्साही अनुयायानीं मूर्तिपूजकावर वाकडी नजर फेंकली. मूर्तीचा विध्वंस करून मूर्तिपूजकाना समशेरीच्या जोरावर महम्मदी धर्माची दीक्षा घेण्यास भाग पाडणें ही कुराणाची शिकवण आहे अशा उपदेश मदरील धर्माचे गुरु आपल्या अनुयास वेळीं अवेळीं करीत. त्यामुळें महंमदी धर्माचा प्रचार करणें हें आपलें इतिकर्तव्य आहे असें

दरएक मुसलमानास वाटूं लागलें. ह्या धर्मवेडामुळें अरबस्तान व मध्य एशिया वगैरे देशांतील लोकांनीं लक्ष हिंदुस्थानाकडे साहजिक वेधलें. ईश्वरप्राप्तीबरोबरच अकल्पित ऐहिक लाभाची जोड मिळते अशी खात्री पटल्यावर मुसलमान राजास हिंदुस्थानावर स्वारी केल्यावाचून चैन पडेनासें झालें. या धर्मवेडाचा फायदा घेऊन काही धाडसी मुसलमानानीं हिंदुस्थानांत आपली राजकीय सत्ता स्थापन करण्याची हाव धरिली व त्या कामीं त्यास यश आलें. हिंदुराजामध्यें, जूट व शिस्त बिलकुल नसल्यामुळें हिंदुस्थानावर स्वारी केली असतां त्याजकडून सुसघटित प्रतिकार होणें अशक्य होय. अशी स्वारी करणाऱ्या मुसलमानाची खात्री होती. हिंदुस्थानावर केलेल्या स्वाऱ्यांत मुसलमानांना सारखें यश मिळत जाऊन त्यांत अतोनात लूट मिळाल्यामुळें, भरतभूमि ही एक कामधेनुच आहे अशी त्यांची समजूत झाली यांत कांहीं नवल नाहीं. ह्या समजुतीच्या जोरावर इ. स. १०२४ मध्यें महमद गझनवीनें सोमनाथावर स्वारी केली. सोमनाथ हें स्थान हिंदुलोक फार पवित्र मानीत असत. राजस्थान, गुजराथ, व सौराष्ट्र ह्या देशांतील राजाकडून तेथील देवस्थानास बहुमोल देणग्या वारंवार मिळत असत, त्यामुळें तेथ अलोट संपत्ति होती. अशी महमद गझनवीस माहिती मिळाली होती. सोमनाथावर आपण स्वारी करीत आहों ह्याचा मागमूस महमद गझनवीनें कोणासही लागू न देता त्याजवर एकदम छापा घातला. त्यावेळीं गुजराथच्या व सौराष्ट्राच्या राजानीं महमद गझनवीस बरीच संपत्ति देण्याचें कबूल करून हिंदूस परमपूज्य असलेल्या या देवस्थानास कोणत्याही प्रकारचा

उपद्रव करूं नये अशी विनंति केली. परंतु द्रव्यार्जनापेक्षा भावी इतिहासांत मूर्तिभंजक म्हणून आपली कीर्ति अजरामर राहिली पाहिजे अशी आपली महत्त्वाकांक्षा असल्याबद्दल त्यानें सदरील राजांना सडेतोड उत्तर दिलें. हिंदूंच्या धार्मिक भावनांकडे बिलकूल लक्ष न देतां सोमनाथाच्या मूर्तीचा विध्वंस करून व तेथील संपत्ति लुटून त्यानें आपली राक्षसी महत्त्वाकांक्षा पुरी केली! हिंदूंच्या धार्मिक भावनांना दुखवून, हिंदुराजांना आपला वचक बसावा व त्यांनीं आपणास शरण यावें असा महमद गझनवीचा अंतस्थ हेतु असावा असें दिसतें.

महमद गझनवीनंतर घोरी घराण्यांतील पुरुषांनीं हिंदुस्थानावर स्वारी करून देशद्रोही हिंदुराजाच्या मदतीनें दिल्लीस मुसलमानी पातशाहीची स्थापना केली. महमदघोरीनें इ. स. ११७५ पासून इ. स. १२०६ पर्यंत दिल्ली येथें राज्य केलें. त्यानंतर बल्बन घराण्यानें राज्य केलें व त्यानंतर खिल्जी घराण्यांतील पुरुष जलालुद्दिन यानें इ. स. १२९० मध्यें दिल्लीची पातशाही पटकाविली. ह्या दोन अडीचशें वर्षांच्या अवधींत, उत्तरहिंदुस्थानांतील हिंदु राजांच्या मुसलमानांबरोबर पुष्कळ लढाया झाल्या. परंतु संघटण व युद्धकलेंतील शिस्त ह्याचा अभाव, आणि परस्परांतील मत्सर यामुळें त्यास त्यांच्यापुढें हार खावी लागली. संघटण व शिस्त यांच्या अभावीं नुसत्या शौर्यानें कार्यभाग होत नाहीं ही गोष्ट वरील इतिहासापासून उत्तम प्रकारें निदर्शनास येते.

उत्तरहिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांबरोबर झगडून त्यास कम-कुवत केल्यावर मन्शील प्रांतांत आपली सत्ता स्थिरस्थावर कर

ण्याम मुसलमान राजास नराच काळ लागला त्यामुळें त्यास दक्षिण हिंदुस्थानाकडे लक्ष देण्यास फुरसत मिळाली नाहीं. परंतु ही स्थिति फार दिवस टिकणे शक्य नव्हतें जलालुद्दिन ऊर्फ फिरुशहा खिलजी यानें आपला पुतण्या अल्लाउद्दिन खिल्जी यास माणिकपूर ( प्रयागनजीक ) येथील सुभेदारीच्या जागेवर नेमलें होतें तो माहसी असून महत्वाकांक्षी होता दक्खन प्रांत सुसपन्न व सुपीक असून तो सहज जिंकता येण्यासारखा आहे अशा बातम्या त्याच्या कानावर आल्या होत्या. दक्षिणेवर स्वारी करण्याचें त्यानें ठरवून त्याकामीं आपल्या चुलत्याची मंजुरी मिळविली. त्यानें आपल्याबरोबर आठ हजार निवडक सैन्य घेऊन देवगिरीवर अचानक छापा घालण्याचा घाट घातला देवगिरीचा यादव राजा रामदेवराव याजपाशीं सैन्याची तयारी नसून तो गाफिल आहे अशी खबर अल्लाउद्दिनानें आपल्या गुप्त हेराकडून काढली होती व कोणत्याही प्रकारची आगाऊ सुचना न देता त्यानें आपलें सैन्य एलिचपुरच्या बाजूनें नेऊन देवगिरीच्या आसपास आणून भिडविलें ह्या आकस्मिक परचक्राची बातमी कळताच रामदेवरावाची तारांबळ उडाली थोड्या अवकाशात शक्य तितकें सैन्य जमवून देवगिरीपासून चार मैलावर त्यानें शत्रूच्या सैन्यास तोंड दिलें अल्लाउद्दिनाच्या सैन्यानें रामदेवरावाचा पराभव केला रामदेवरावाच्या सैन्याची पिछेहाट होऊन त्यास देवगिरीच्या किल्ल्याचा आश्रय धरणें भाग पडलें. ह्या विकट स्थितीचा फायदा घेऊन अल्लाउद्दिनानें रामदेवरावाचें सुंदर व संपत्तिमान राजधानीचें शहर देवगिरी हें लुटून फस्त केलें. अल्लाउद्दिन हा जसा साहसी त्याप्रमाणें धूर्तही होता आपल्या बरोबर आणलेलें

सैन्य हें अघाटीचें असून मागाहून दिल्लीच्या बादशहाचें प्रचंड सैन्य येत आहे अशी त्यानें हूल उठविली; त्यामुळें देवगिरीच्या आसपासचे हिंदु राजे फसले व रामदेवरावाच्या मदतीस जाण्यास कचरले. ह्यावेळीं उत्तरहिंदुस्थानांतील स्वतंत्र हिंदुराजांनीं अल्लाउद्दिनाविरुद्ध जर संघटित प्रयत्न केला असता तर त्यास कदाचित् माघार घ्यावी लागली असती! वास्तविक पाहिलें असता देवगिरीचा किल्ला मजबूत व अजिंक्य असल्यामुळें त्याच्या आश्रयानें रामदेवरावास कोणत्याही बलाढ्य शत्रूस, दुसरीकडून मदत येईपर्यंत नामोहरम करता आलें असतें. पण त्याही बाबतींत रामदेवरावाची तयारी नव्हती असें दिसतें. रामदेवरावानें आपला मुलगा शंकरदेव ह्याच्या व इतर राजाच्या मदतीची वाट न पाहता उतावीळपणानें अल्लाउद्दिनाशीं तहाचें बोलणें लाविलें.

देवगिरी शहर लुटून जी संपत्ति मिळविली आहे तिच्या भारो-भार आणखी रक्कम देण्यास आपण तयार आहों ती घेऊन आमचे लोकांस बंधमुक्त करावें व आमच्या प्रांतातून निघून जावें अशा तहाच्या अटी रामदेवरावानें अल्लाउद्दिनास कळविल्या. त्या त्यानें कबूल केल्या, व रक्कम हातीं पडताच सर्व कैद्यास बंधमुक्त करून दिल्लीस परत जाण्याचें आश्वासन दिलें.

दरम्यान शंकरदेव मोठ्या सैन्यासह अल्लाउद्दिनाबरोबर दोन हात करण्याच्या तयारीनें देवगिरीच्या आसपास येऊन धडकला. आपण अल्लाउद्दिनाबरोबर तह केला असून त्याच्याबरोबर लढाई करण्याचें कारण उरलें नाहीं असा रामदेवरावानें शंकरदेवास निरोप पाठविला; परंतु या गोष्टीकडे त्यानें दुर्लक्ष केलें. उलट लुटींत मिळविलेली रक्कम

परत देऊन देवगिरी शहर तानटतोब सोडून जाण्याबद्दल शंकरदे-वाने अल्लाउद्दिनास निर्वाणीचा खलिता पाठविला. अल्लाउद्दिन हा युद्धकलेत फार निपुण होता. त्याने शंकरदेवाच्या सैन्याचा, देवगिरीच्या किल्ल्यात रामदेवरावाचे सैन्य होते त्याच्याशी मिलाफ होऊ न देण्याविषयी खबरदारी घेतली व किल्ल्याभोवती आपले एक हजार निवडक सैन्य ठेविले. अल्लाउद्दिनाने शंकरदेवाच्या सैन्यावर निकराचा हल्ला केला. उभयतांचे तुमुल युद्ध झाले, त्यात शंकरदेवाने मोठ्या पराक्रमाने अल्लाउद्दिनाचा धुव्वा उडविला. इतक्यात देवगिरीच्या किल्ल्याभोवताली अल्लाउद्दिनाने ठेविलेले सैन्य त्यांच्या मदतीस आले. त्या सैन्याच्या दौडीमुळे जो धुरळा उडाला, त्यावरून दिल्लीच्या बादशहाचे मागे असलेले खास सैन्य अल्लाउद्दिनाच्या मदतीला येत आहे अशी शंकरदेवाकडील लोकांची समजूत झाली. ह्या गैरसमजुतीमुळे शंकरदेवाच्या सैन्यामध्ये धुमाकूळ उडून त्याचे सैन्य सैरावैरा पळू लागले. अल्लाउद्दिनाने शंकरदेवाच्या सैन्याचा पाठलाग करण्याचे सोडून देऊन देवगिरीच्या किल्ल्यास पुन्हा वेढा दिला. अल्लाउद्दिनाच्या या धोरणामुळे रामदेवराव पेचात पडला. शिवाय आणखी एक अकल्पित गोष्ट घडून आल्यामुळे रामदेवरावाची फार निराशा झाली! देवगिरीचा किल्ला अजिंक्य असल्यामुळे त्यात धान्यसामुग्री विपुल असती तर त्या किल्ल्यात राहून रामदेवरावाच्या सैन्याने बराच काळ टिकाव धरला असता. परंतु किल्ल्यात साठवून ठेविलेल्या धान्याच्या पोत्यात, धान्याऐवजी मीठ भरलेले आढळून आले. आपल्याच गोटात अशा तऱ्हेची फंद-फितुरी असल्याचे राम-देवरावास आढळून येताच, यापुढे आपली धडगत नाही

जर्शी त्याची खातरी झाली व त्याने अल्लाउद्दिनाबरोबर पुन्हा एकवार तहाचें बोलणें लाविलें. अल्लाउद्दिनानें तें मान्य केलें. तहाच्या शर्ती फार असह्य होत्या. त्या येणेंप्रमाणें :—सहाशें मण मोत्यें, दोनशें मण जड जवाहीर, तितकेंच सोनें व दोनशें मण उंची कापड वगैरे रामदेवरावानें अल्लाउद्दिनास दिल्यावर त्यानें देवगिरीप्रांत सोडून परत जावें व मदरील रक्कम पदरी पडेपर्यंत शंकरास प्रांत अल्लाउद्दिनानें आपल्या ताब्यांत ठेवावा. यांतील अतिशयोक्तीचा भाग सोडून दिला तरी पहिल्या तहांतील शर्तीपेक्षा दुसऱ्या खेपेच्या तहांतील शर्ती अतोनात कडक होत्या यांत शंका नाहीं. वरील तहाच्या अटी रामदेवरावानें पुऱ्या केल्यावर अल्लाउद्दिनानें देवगिरी शहर मोठ्या इतमामानें सोडिलें.

अल्लाउद्दिनानें परत गेल्यावर आपली दक्षिणेवरील स्वारी यशस्वी झाली व त्यांत भरपूर लूट मिळविली अशा अर्थाची हकीगत आपला चुलता जलालुद्दिन याप्त दिल्ली येथें कळविली, व बादशहानें थोड्या लवाजम्यासह आपणास करी [ त्याचें सुभेदारीचें ठिकाण ] येथें भेटावें अशी त्यास विनंति केली, त्याप्रमाणें बादशहानें अल्लाउद्दिनाची भेट करी येथें घेतली. बादशहाचें मनांत काहीं किंतु नसल्यामुळें अल्लाउद्दिन आपणास दगा देईल असें त्याच्या स्वप्नींही नव्हतें. परंतु पूर्व संकेताप्रमाणें इ. स. १२०५ मध्यें अल्लाउद्दिनानें आपल्या चुलत्याचा दगलबाजीनें वध करून दिल्लीचें तक्त बळकाविलें.

पुढें कांहीं वर्षें देवगिरीचे रामदेवराव यादव यास अल्लाउद्दिनाकडून कांहीं त्रास पोंचला नाहीं. परंतु कबूल केलेल्या खंडणीची

रवम रामदेवरायापासून नजराणा येत नाहीं असें दिसताच अल्लाउद्दिनानें आपला सरदार मल्लिककापूर ह्याच्या हाताखालीं एक लाख सैन्य देऊन देवगिरीवर पाठविलें, मार्गांत माळव्याचा सुभेदार ऐन-उल्-मुल्क मुलतानी आणि गुजराथचा सुभेदार अल्फखान ह्या उभय ताची सैन्यें त्यास येऊन मिळालीं गुजराथचा राजा करणवाघेला ह्याजबरोबर दिल्लीच्या बादशहानें लढाई करून गुजराथ प्रांत काबीज केला होता त्या गडबडींत त्याची राणी कमलदेवी अल्लाउद्दिनाच्या हस्तगत झाली होती व त्यानें तिला आपली मुख्य बेगम [पट्टराणी] केली होती कमलदेवीला देवलदेवी नांवाची सुस्वरूप मुलगी होती. ती जवळ नसल्यामुळे कमलदेवीस करमेनासें झालें. देवलदेवीस कसेंही करून आपले जवळ आणण्याविषयीं कमलदेवीनें अल्लाउद्दिनाच्या मागें तगादा लाविला होता गुजराथ प्रांत पूर्णपणें काबीज करण्याचा अल्लाउद्दिनाचा फार दिवसांचा हेतु होता. गुजराथच्या राजाची कुरापत काढण्यास त्यास अनायासें संधि मिळाली देवलदेवीला हस्तगत करून दिल्लीस आणण्याबद्दल अल्लाउद्दिनानें मल्लिककापूर ह्यास सक्त हुकूम दिला होता करणवाघेला यास ही बातमी कळताच तो देवलदेवीच्या बचावाकरिता गुजराथ व देवगिरीच्या राज्याच्या सरहद्दीवर असलेल्या बागलाण प्रांतीं गेला. मल्लिककापूरनें देवलदेवीस आपल्या स्वाधीन करण्याबद्दल करणवाघेला यास निरोप पाठविला. परंतु त्यानें ती गोष्ट साफ नाकारली दरम्यान रामदेवरावानें आपला युवराज शंकरदेव यास देवलदेवी देणें बद्दल करणवाघेल्याकडे मागणी घातली होती ती निरुपायास्तव मान्य करणें त्यास भाग पडलें व त्याप्रमाणें त्यानें तिला शंकरदेवाचा भाऊ भिल्लदेव उर्फ भीमदेव

याच्या स्वाधीन केली. विंधदेव तिला घेऊन जात असतां मार्गांत ती मुसलमानांच्या हातीं अचानक कशी सांपडली ही हकीकत पूर्वी येऊन गेली आहे. अल्लाउद्दिनानें देवलदेवीचें लग्न आपला मुलगा खिज्रखान याजबरोबर लावून दिलें.

मलिककाफूरानें देवगिरीकडे आपला मोर्चा फिरविला. त्याचे सैन्यास तोंड देण्याचें आपले अंगी सामर्थ्य नाहीं ह्याची रामदेवरावास पूर्ण जाणीव होती. म्हणून त्यानें शंकरदेवास देवगिरीच्या किल्ल्यांत ठेऊन मलिककाफूरास मोठा नजराणा करून त्याजबरोबर तहाचें बोलणें लाविलें. मलिककाफूर ह्यानें मोहिमेच्या एकंदर खर्चाचें टांचण रामदेवरावाकडे पाठविलें व त्यास आपल्याबरोबर दिल्ली येथें येण्याविषयीं पाचारण केलें. दिल्लीच्या बादशहानें रामदेवरावाचा दरबारांत बहुमान करून त्यास इतमामनें वागविलें आणि त्याजवर बहुमानाच्या पदव्यांचा वर्षाव केला. इतकेंच नव्हे तर देवगिरीचें राज्य त्याला परत देऊन गुजराथेंतील कांहीं प्रांत त्याचे राज्यास जोडण्याचा हुकूम केला शिवाय गुजराथेंतील नवसारी प्रांत त्यास जातइनाम करून दिला. या सर्व गोष्टीबद्दल दिल्लीच्या बादशहाचे आपण ताबेदार असल्यानें त्याजकडून बादशहानें कबूल करून घेतलें.

रामदेवरावानें मरेपर्यंत खंडणी देण्याचे कामीं कुचराई केली नाहीं. उलट इ. स. १३०९ मध्यें मलिककाफूर आणि ख्वाजाहाजी हे देवगिरीच्या मार्गानें वारंगळच्या राजास जिंकण्याकरितां जात असतां त्यांनी रामदेवरावानें चांगली बडदास्त ठेविली.

इ. स. १३१० मध्यें अल्लाउद्दीन खिलजीनें दर निर्दिष्ट केलेल्या दोन सरदारांबरोबर मोठी फौज देऊन द्वारसमुद्र येथील होयसलास

निकण्याकरितां दक्षिणेंत पाठविलें. देवगिरीजवळ त्याचा मुक्काम पडला असतां रामदेवरावाच्या मृत्यूची त्यास बातमी समजली त्याचा मुलगा शंकरदेव याची मुसलमानाविषयीं दिलसफाई नव्हती असें त्यास पूर्ण ठाऊक होतें शंकरदेव हा आपणास केव्हांही अनुकूल होणार नाहीं अशी या दोन मुसलमान सरदारांची खात्री असल्यामुळें दोरासमुद्र येथील होयसल यादवराजास त्याजकडून कोणत्याही प्रकारची मदत मिळूं नये म्हणून त्यांनीं आपलें बरेंच सैन्य पैठण येथें ठेविलें होतें, दोरासमुद्राचा तत्कालीन राजा तिसरा बल्लाळ याचा पराभव करून त्याचें राज्य त्यांनीं घेतलें दिल्लीस परत जातांना शंकरदेवाचे वाटेस उभयता सरदार गेले नाहींत. इ. स. १३१२ मध्यें शंकरदेवानें दिल्लीच्या पादशहास खंडणी देण्याचें नाकारल्यावरून मल्लिककाफरास चौथ्यांदा दक्षिणेवर स्वारी करणें भाग पडलें. त्यानें शंकरदेवास पकडून त्याचा अमानुषपणें वध करविला, व महाराष्ट्र आणि कर्नाटक हे दोन्ही प्रांत बेचिराख केले कोंकणच्या समुद्रकिनाऱ्यावरील चौलपासून दाभोळपर्यंत सर्व बंदरें त्यानें आपले ताब्यांत घेतलीं आणि आपण स्वतः देवगिरी येथें जाऊन राहिला.

थोडक्याच दिवसांत दिल्लीदरबारांत अल्लाउद्दीनाविरुद्ध गुप्त कारस्थान चालू असल्याबद्दलची खबर मल्लिककाफरास समजली, त्यामुळें त्यास दिल्लीस जाणें भाग पडलें. त्याचे गैरहजेरीचा फायदा घेऊन रामदेवरावाचा जावई हरपाळदेव यानें मुसलमानाविरुद्ध दक्षिणेंत चळवळ सुरू केली, व त्यांना दक्षिणेंतून कायमचे हाकून देण्याचा सघटित प्रयत्न केला व त्या कामीं त्यास यश येऊन देवगिरीचें

राज्य त्यानें परत मिळविलें दिल्लीच्या कारस्थानात मल्लिककाफराचें अग होतें, व त्यानेच अल्लाउद्दिनास विषप्रयोग करून ता. १० डिसेंबर १३१६ रोजीं ठार मारिलें असें म्हणतात थोड्याच वेळात मल्लिककाफरचा खून झाला, व अल्लाउद्दिनाचा तिसरा मुलगा मुबारक हा दिल्लीच्या गादीवर बसला

इ. स १३१८ त हरपाळदेवास शिक्षा करण्यासाठीं मुबारक हा आपल्याबरोबर मोठें सैन्य घेऊन दक्षिणेवर मोहीम करण्यासाठी निघाला मुबारकाचें सैन्य देवगिरीवर येत आहे असें समजताच हरपाळदेव व त्याचे साथीदार पळाले मुबारक यानें हरपाळदेवाचा पाठलाग करण्याकरिता आपलें सैन्य पाठविलें व त्याम पकडून त्याच्या अंगाची सालडी काढून त्याचा मृरपणानें वध केला, आणि त्याचें शिर देवगिरी शहराच्या मुख्य महाद्वारावर टकवत ठेविलें याप्रमाणें देवगिरीच्या यादवघराण्याचा शेवट झाला व दक्षिणेतील हिंदुपादशाही नष्ट झाली !!

देवगिरीच्या गादीवर आल्यावर, रामदेवराव जाधवानें मोठ्या पराक्रमानें कर्नाटक व म्हैसूर प्रांत जिंकून तेथें आपला अमल बसविला, व तेथील राज्यकारभार व्यवस्थित रीतीनें चालविण्यासाठीं आपले विश्वासातील अमलदार नेमिले वगैरे हकीगत पूर्वी येऊन गेली आहे शिवाय तत्कालीन शिलाशासनें व ताम्रपट यावरून गुजराथ, माळवा वगैरे प्रांताच्या राजांना त्याचा मोठा दरारा होता असें दिसून येत ही गोष्ट जर खरी असेल, तर अल्लाउद्दिनाचें आठ हजार निवडक सैन्य देवगिरीच्या दरवाजानजिक धडकेपर्यंत, रामदेवराव जाधव अगर त्याला मुलगा शंकरदेव, व इतर अमलदार

झाले या परचक्राची दाद कशी लागली नाहीं याचें आश्चर्य वाटतें!! इतकेंच नव्हे तर, अल्लाउद्दिनानें देवगिरीवर अकस्मात् छापा घालून रामदेवराव जाधवास अल्पावधीत नामोहरम करून त्याचे राजधानीचें शहर निर्विघ्न लुटावें ही गोष्ट त्यास अत्यंत लांछनास्पद होय!! अल्लाउद्दिनानें केलेल्या आकस्मिक हल्ल्यानें गर्भगळित होऊन, रामदेवराव जाधवानें आपला युवराज शंकरदेव, अगर आपलें प्रधानमंडळ यांच्या सल्ल्यावाचून त्याच्याशीं एकदम तह करावा व त्यास लुटलेली सर्व संपत्ति नेण्यास त्यास संमति द्यावी ही गोष्ट तर सर्वांत निरुत्तरणीय होय! आयत्यावेळीं शंकरदेवानें फौज जमवून अल्लाउद्दिनाचें सैन्यास परतविण्याचा प्रयत्न केला, परंतु तो यशस्वी झाला नाहीं. देवगिरीच्या 'अजिंक्य' दुर्गांत निवटक रोशानिशी राहून रामदेवराव जाधवानें आपला बचाव करण्याचा प्रयत्न केला. परंतु जेव्हा धान्याच्या पोत्यात धान्याऐवजी मीठ साठविलेलें आढळून आलें तेव्हा गोटात फंद-फितुरी असल्याबद्दल त्याची खात्री झाली, व त्यास दातीं तृण धरून अत्यंत अपमानकारक तह अल्लाउद्दिनाबरोबर करणें भाग पडलें. अल्लाउद्दिनानें या परिस्थितीचा फायदा घेऊन दुसऱ्या वेळच्या तहाच्या अटी प्रथम केलेल्या तहाच्या अटींपेक्षा जास्त जरब केल्या!! या उद्वेगजनक हकीकतीवरून, रामदेवराव जाधवाच्या राज्यकारभारावर चांगला प्रकाश पडतो!!

गृहकलह, मन्त्रिमंडळात अनुभवी व कर्तबगार माणसाचा अभाव, प्रजेंत भयंकर असंतोष, सैन्यात बेशिस्तपणा व फंदफितुरी, राज्यकर्त्यांची विषयासक्तता व [illegible] इत्यादि अनेक कारणा

मुळें दुसऱ्या बाजीरावाच्या अमदानींत मराठ्यांची सत्ता ल्यास गेली ! रामदेवराव जाधवाचे राजवटींत यादवांचे साम्राज्य लुप्त होण्यास ह्याच गोष्टी कारणीभूत झाल्या ! हेमाद्रिसारख्या राजनिष्ठ, राज्यकार्यधुरंधर, युद्धकुशल व राजघराण्याचा अभिमान बाळगणाऱ्या मंत्र्याचे दरबारात वजन कमी झाल्यामुळें, त्यानें आपलें अंग राजकारणातून काढून घेतलें ! वर्णाश्रमधर्मविरोधी व मूर्तिपूजेवर वक्रदृष्टि ठेवणाऱ्या महानुभावपंथीयांचें राजदरबारांत वर्चस्व वाढल्यामुळें सनातन हिंदुधर्माभिमान्यांचे मनांत रामदेवरावाबद्दल असलेला पूज्यभाव नाहींसा झाला होता, व सनातन हिंदुधर्माचे कट्टे अनुयायी, रामदेवरावास धर्मभ्रष्ट म्हणून समजू लागले होते.

या व इतर अनेक कारणामुळें त्याचे राज्याची घडी विघडली होती. कर्नाटक, म्हैसूर, कोल्हापूर वगैरे दूर दूरचे प्रांतावरील त्याचा अमल शिथिल झाला होता. असें दिसतें. राज्यांत बेदाधुंदी माजल्यामुळें प्रजेकडून कराची वसूली होण्याचें बंद झालें. तिजोरीत पैसा शिल्लक नसल्यामुळें राज्यात खडे सैन्य ठेवण्याची अगर परचक्र आल्यास त्याला ताड देण्याची राजसत्तेस ताकद उरली नव्हती. अल्लाउद्दीनच्या स्वारीच्या वेळीं दौलताबादच्या किल्ल्यात आयत्यावेळीं यानगी भरलेल्या आढळून आल्यामुळें बापुगोमल्यास जो वाईट अनुभव आला तोच अनुभव देवगिरीच्या दुर्भेद्य दुर्गांत रामदेवराव जाधवास आला.

रामदेवरावाच्या पूर्वजांनी मोठ्या पराक्रमानें भरभराटीस आणलें व साम्राज्य पदवीस पोहोंचविलेलें देवगिरीचें राज्य त्यांनीं आपल्या मुर्खपणामुळें अल्पावधीत गमाविलें ! इतिहासाची पुनरावृत्ति होते

असें म्हणतात. श्रीशिवाजी महाराजांनी महत्प्रयासानें स्थापन केलेल्या मराठ्यांच्या राज्याची सूत्रें कर्तृत्वहीन लोकांच्या हातीं गेल्यानंतर त्याची काय अवस्था झाली, याची वाचकांस आठवण करून देण्याची जरूर नाहीं.

अल्लाउद्दिनानें देवगिरीवर एकाएकी छापा दिल्यामुळें रामदेवराव जाधवास आपलें सैन्य वेळेवर रणांगणावर नेऊन त्याच्याशीं दोन हात करण्यास संधि मिळाली नाहीं असें कदाचित म्हणतां येईल. परंतु अल्लाउद्दिनाबरोबर तह केल्यानंतर रामदेवराव इ. स. १३०९ मध्यें कालवश होईपर्यंत जो काळ लोटला त्या मुदतींत त्यास कर्नाटक, म्हैसूर, कोल्हापूर, कोंकण वगैरे आपल्या अमलाखालच्या प्रांतांतून सैन्य जमवून दिल्लीच्या बादशहाशीं दोन हात करून आपली गेलेली अब्रू पुन्हा मिळविण्यास कोणती हरकत होती? वास्तविक पाहिलें असता वर नमूद केलेल्या प्रांतावर देवगिरीच्या यादवाचा नामधारी अंमल राहिला होता व रामदेवरावाविषयीं प्रजेच्या मनांत बिल्कुल आदर वसत नव्हता! रामदेवराव जाधवाकडून खंडणी वक्तशीर न आल्यामुळें अल्लाउद्दिनानें त्याजवर आपला सरदार मल्कि काफूर यास पाठविलें होतें. त्यावेळींही रामदेवानें बादशहाचा हुकुम निमूटपणें मानला मरतेवेळीं दिल्लीस जाऊन बादशहाचे आपण ताबेदार असल्याबद्दलची त्यानें कबुली दिली आणि दक्षिणेंत त्यावेळीं अस्तित्वात असलेल्या हिंदुराज्यांचा नायनाट करण्याचें कामीं दिल्लीच्या बादशहास मदत करण्याचा त्यानें करारमदार केला. रामदेवराव जाधवास आपल्या कमकुवतपणाची पूर्ण जाणीव असर [illegible] दिल्लीच्या परधर्मीयराजाची त्यानें ताबेदारी

पत्करिली व स्वार्थाकरिता राष्ट्रद्रोह करण्यास तो प्रवृत्त झाला! याच्या उलट प्रकार साडेतीनशें वर्षांनंतर महाराष्ट्राच्या इतिहासांत श्रीशिवाजीमहाराजांचे वेळीं घडून आला; त्याची वाचकांस साहजिक आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं.

औरंगजेब बादशहानें जयसिंगास श्रीशिवाजीमहाराजांकडे पाठवून मोंगल बादशहाचे आपण दक्षिणचे सुभेदार आहों अशी त्यांजकडून कबुली मिळविण्यासाठीं हरएक प्रयत्न केले. परंतु मोंगलांचें मांडलिकत्व पत्करण्यास आपण केव्हांही तयार होणार नाहीं, असें महाराजांनीं औरंगजेबास सडेतोड व बाणेदार उत्तर देऊन आपल्या अंगीं असलेल्या ओजस्वितेची व जाज्वल्य स्वाभिमानाची दिल्लीश्वरास ओळख करून दिली!

स्वतःचें उज्ज्वल वर्तन, राष्ट्राचा पाठिंबा, हिंदुधर्माचा यवनांकडून होत असलेल्या छळामुळें हिंदुसमाजांत उत्पन्न झालेली संघटनशक्ति, धाडशी व कर्तृत्ववान लोकांचें साहाय्य, इत्यादि सर्व गोष्टी श्रीशिवाजीमहाराजांना त्यावेळीं अनुकूल होत्या हें विसरतांकामा नये.

महानुभावपंथीय एका ग्रंथांत हेमाद्रीनें तुर्कांस बोलावून रामदेवरावाचें राज्य बुडविलें असा त्यांजवर बाष्कळ आरोप केला आहे. त्याचें निराकरण करण्याची फारशी जरूरी नाहीं. ओंवळें येथील ताम्रपटांत हेमाद्रि हा देवगिरीच्या राज्याचा आधारस्तंभ असल्याबद्दल व तो सद्गुणांचा केवळ पर्वत होता असें खुद्द रामदेवरावानें म्हटलें आहे. हेमाद्रि हा महान् विष्णुभक्त असून भागवतधर्माचा कट्टा अभिमानी होता, ही गोष्ट मुक्ताफल ग्रंथावरून दिसून येते. शिवाय महादेवराय जाधवाच्या सबंध कारकीर्दींत व रामदेवरायाच्या आरंभींच्या अमदानींत

ज्यांनें देवगिरीच्या यादवांच्या राज्याची इभ्रत वाढविली, असा थोर, विचारी, सद्गुणसंपन्न, हिंदुधर्माचा कट्टा अभिमानी पुरुष, आपण स्वतः पाणी घालून वाढविलेल्या हिंदुपादशाहीरूपी वृक्ष परधर्मीयांकडून तोडून टाकण्याचें महत्पाप व नीच कर्म करण्यास प्रवृत्त होईल अशी शंका घेण्यास विचारी माणसाचें मन केव्हांही धजणार नाहीं.'

यादवांच्या राज्याच्या ऱ्हासाची कारणें देतांना इतिहासाचार्य राजवाडे यांनी सर्व दोषाचें खापर हेमाद्रीच्या डोक्यावर फोडलें आहे. " यादवांच्या अमदानींत म्हणजे इ. स. १३ शतकाच्या उत्तरार्धात मराठ्यांचे सर्व लक्ष परमार्थाच्या नांवाखर ऐहिक उपभोग घेण्याकडे लागलें होतें. १३ व्या शतकातील अत्यंत मोठा असा मानिलेला ग्रंथ म्हटला म्हणजे हेमाद्रीचा चतुर्वर्गचिंतामणि हा होय. या ग्रंथाच्या व्रतखंड नामक भागांत दर दिवसाला व दर तिथीला दहा दहा पांच पांच व्रतें सांगितलीं आहेत व त्या त्या व्रताला कोणत्या देवाची कोणतें पक्वान्न करून किती ब्राह्मण घालून प्रीति संपादन करावी ह्याचा श्रुति, स्मृति, व पुराणें यांतील उतारे देऊन गंभीरपणें निर्णय केला आहे. लोकांची व्रतें करण्याकडे, ब्राह्मणभोजनें घालण्याकडे, पक्वान्नें खाण्याकडे व तद्द्वारा मोक्ष मिळतो अशा मताकडे अतोनात प्रवृत्ति असल्यावाचून हेमाद्रीनें हीं व्रतें केवळ पांडित्य दाखविण्याकरिता किंवा करमणूक करण्याकरिता सांगितलीं असतील हें संभवत नाहीं. पक्वान्न आणि व्रत ह्यांची फारकत व्रतखंडांत एकही ठिकाणीं केलेली नाहीं. एवढी दोन हजार व्रतें ज्या ग्रंथांत सांगितलीं आहेत असा पृथ्वीवरील दुसऱ्या कोणत्याही भाषेत

कोणत्याही काळीं एकही ग्रंथ अद्यापपर्यंत निर्माण झाला नाहीं. अनेकदृष्टि किंवा सुखेच्छदृष्टि लोकांच्या हातीं मुबलक पैसा असल्यावर त्याच्याकडे बुभुक्षु, मेहनती, साहसी व निर्धन अशा लोकांचें लक्ष्य जावें ह्यात आश्चर्य नाहीं. सिंघणादि वीरांच्या विनयानें लोक अत्यंत धनसंपन्न होऊन गेले, उद्यापनें करण्याच्या मिषानें सुखैस्वपरायण व विलासमग्न झाले, व हीच मराठ्यांच्या नाशाची तेराव्या शतकांत कारणें होती परमार्थाच्या नांवाखालीं हीं जी सुखकपरायणवृत्ति नांदत होती तिचा फायदा घेऊन मुसलमानांनीं मराठ्यांचा पराभव केला. ”

रामदेवराव जाधव यांच्या अमदानींत धार्मिक व सामाजिक बाबतींत ज्या अकरियत घडामोडी झाल्या त्याचा सूक्ष्म रीतिनें अभ्यास करणारांना राजवाडे ह्यांची सदरील विचारसरणी पटण्यासारखी नाहीं. कालपरत्वें हिंदुधर्मास आलेली ग्लानि नाहींशी करून लोकांमध्यें धर्मजागृति व्हावी या हेतूनें, हेमाद्रीनें चतुर्वर्गचिंतामणि नांवाचा ग्रंथ रचिला. व्रतखंडापैकीच दानखंड, मोक्षखंड, तीर्थखंड व परिशेषखंड असे चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथाचे आणखी भाग आहेत हिंदुधर्मास प्राप्त झालेले मालिन्य नाहींसें होऊन सनातन धर्माविषयीं एकंदर हिंदुसमाजात आस्था उत्पन्न व्हावी या उदात्त हेतूनें हेमाद्रीनें लिहिलेल्या ग्रंथाबद्दल राजवाडे ह्यांच्यासारख्या सनातन हिंदुधर्माबद्दल अभिमान बाळगणाऱ्या विद्वान् गृहस्थानें अशा प्रकारचे अनुदार उद्गार काढावे हे आमच्या देशाचें दुर्दैव होय'



## यादवराजघराण्याची संपूर्ण वंशावळ. नं. १

हेमाद्रीच्या व्रतखंडात दिलेल्या राजप्रशस्तींत, यदुकुलवंशीय राजांची पौराणिक काळापासून ऐतिहासिक काळांतील देवगिरीच्या यादवराजघराण्यापैकीं महादेवराजापर्यंत जी त्रोटक हकिगत दिली आहे, त्यावरून तयार केलेली वंशावळ –

### पौराणिक.

| १ | २ | ३ | ४ | ५ |
|---|---|---|---|---|
| इन्दु | सुयज्ञ | वृष्णि | पुरुहोत्र | अनिरुद्ध |
| बुध | उशना | निवृत्ति | आयु | यश |
| पुरूरवा | स्थितेयु | व्योमान्छ | सात्वत | वज्र |
| आयु | मरुत्त | जीमूत | अन्धक | प्रतिबाहु |
| नहुष | शिबन | भीमरथ | भजमान | चन्द्रपाल |
| ययाति | कम्बलबर्हि | नवरथ | विदूरथ | सुबाहु |
| यदु | रुक्मक | दशरथ | स्वयंभोज | |
| क्रोष्टा | पराजित | शकुनि | हृदिक | |
| [illegible] | ज्यामघ | करंभि | शूर | |
| रुशंकु | विदर्भ | देवरात | वसुदेव | |
| चित्ररथ | क्रथ | देवक्षेत्र | मुरारी | |
| शशबिंदु | कुंति | मधु | प्रद्युम्न | |
| | | पुरुवस | | |

## ऐतिहासिक

( पूर्वकालीन ऊर्फ सेऊण यादवांची )

| १. | २ |
|---|---|
| दृढप्रहार | वेसुगी |
| सेऊणचंद्र (पहिला) | अर्जुन |
| धाडियस | भिल्लम ( ३ ) |
| भिल्लम ( पहिला ) | वाडुगि |
| राजुगि | वेसुगि |
| वाडुगि | भिल्लम ( ४ ) |
| धाडियस | सेऊण ( २ ) |
| भिल्लम ( २ ) | परम्मदेव (एरम्मदेव) |

( उत्तरकालीन अथवा देवगिरीच्या यादवांची )

| १ | २ |
|---|---|
| सिंहराज | जैत्रपाळ |
| मल्लुगि | सिंघण ( सिंहण ) |
| अमरगांगेय | कृष्ण |
| गोविंदराज | महादेव |
| अमरमल्लुगि | |
| कालीय बल्लाळ | |
| भिल्लम ( ५ ) | |

चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथ महादेव राजाचे राजवटीत पुरा झाल्यामुळे त्याचे पश्चात् गादीवर बसलेल्या राजांची नांवें त्यांत असणें शक्य नाही.

## वंशावळ नं २

वसईच्या ताम्रपटात नाशिक जिल्ह्यातील चिंचोली गाव दान देताना पूर्वकालीन यादवराजाची दिलेली वंशावळ शके ९९१ (इ. स. १०६९)

१
दृढप्रहार
|
सेऊणचंद्र
|
धाडियप्पा
|
भिल्लम ( धारल )
|
श्रीराज
|
वाद्दिग
|
भिल्लम=लस्थियव्वा
|
तेसुग (वेसुग) उर्फ वासुगी=लाट देशचा चालुक्य राजा बारप्पा (गोगीचा मुलगा ) याची मुलगी नायलदेवी
|
भिल्लम (आहवमल्ल )
|
सेउणचंद्र ( दुसरा )

वंशावळ नं ३.

संगमनेर येथील ताम्रपटात यादव राजकुळाची दिलेली वंशावळ —शके ९२२ (इ. स. १०००).

| पौराणिक | ऐतिहासिक |
|---|---|
| शंभु | सेऊणचंद्र |
| ब्रह्मा | दृढप्रहार |
| मरीचि | भिल्लम (पहिला) |
| अत्रि | राजा (श्रीराज) (राजगी) |
| इंदु | वद्दिग (वड्डिग) |
| पुरुरवा | भिल्लम (दुसरा) |
| आयुष | |
| नहुष | |
| ययाति | |

---

वंशावळ नं० ४

सेऊणदेश (पूर्वकालीन) यादववंशीय इरम्मदेव (परम्मदेव) याचे वेळच्या आश्वि येथील ताम्रपटात दिलेली वंशावळ शके ०२० (इ. स. १०९८)

दृढप्रहार
|
सेऊणचंद्र (पहिला)
|

धाडियप्पा
|
भिल्लम ( पहिला )
|
श्रीराज
|
वादिग
|
भिल्लम ( श्रीकर ) ( दुसरा ) = झंझराजाची कन्या लस्थियव्वा
|
श्रीवसुक
|
भिल्लम ( तिसरा )
|
सेऊण ( २ )
|
इरम्मदेव

---

वंशावळ नं. ७

कलसबुद्रुक येथील ताम्रपटात पूर्वकालीन यादवराजाची दिलेली वंशावळ शके १०२५ ( इ. स. ११०३ )

१
सेऊणचंद्र ( यादवनारायण )
|
धाडियप्पा
|
भिल्लम (पहिला)
|
राजा ( श्रीराज )
|
वादिग
|

भिल्लम ( दुसरा )=लक्ष्मी ( राष्ट्रकूट वंशातील कन्या )
|
वासुगी ऊर्फ वेसुग
|
भिल्लम ( तिसरा )

---

### वंशावळ नं. ६

अंजनेरीचे शिलालेखातील दानपत्रात पूर्वकालिन यादवराजाची दिलेली वंशावळ –शके १०६३ ( इ स ११४१ )

१
दृढप्रहार ( शके ७४० )
|
सेऊणचंद्र
|
धाडियाप्पा
|
भिल्लम ( १ ) — श्रीराज
|
राजिग=( झंझराजाची मुलगी लस्थियव्वा )
|
तेसुक=( चालुक्य राजवंशातील मुलीबरोबर विवाह )
|
भिल्लम ( २ )=चालुक्य जयसिंह राजा याच्या मुलीबरोबर विवाह

सेऊणचंद्र ( २ ) [ शके ९९१ ]
..............................
..............................
सेऊणचंद्र ( ३ ) [ १०६३ ]

---

## वंशावळ नं. ७

हरळाहळ्ळीच्या रनिग्राम येथील ताम्रपटांत दिलेली वंशावळ:– (जिल्हा:–धारवाड तालुका:–करजगी) हरळाहळ्ळी येथील उद्चम्मा देवीच्या देवळाचे मागील आवारांत सांपडलेल्या ताम्रपटांवरून:– शके ११५९–६० ( इ. स. १२३७–३८ )



### वंशावळ नं. ८

जैनाच्या वस्तीस दान दिलेल्या ताम्रपटावरूनः—शके ११९१ (इ. स. १२६९)



वंशावळ नं. ९

पैठण येथील ताम्रपटावरूनः— शके ११९३ (इ.स.१२७१)




वंशावळ नं. १०

ठाणें नजीक असलेल्या औंवळें गांवचे ताम्रपटांत दिलेल्या दानपत्रावरून —( शके ११९४ ) उत्तरकालिन देवगिरी येथील राजांची वंशावळ —( शतपष्टि=साष्टी ).






### वंशावळ नं. ११

हरिहर येथील ताम्रपटांतील दानपत्रावरून --शके ११९९.
( इ. स. १२७७ )



वंशावळ नं १२

सर रा. गो. भांडारकर यांच्या दख्खनच्या इतिहासांत दिलेली यादवाची वंशावळ --

पूर्वकालीन यादव

| १ | २ |
| --- | --- |
| दृढप्रहार | अर्जुन |
| सेउणचंद्र | भिल्लम [ ३ ] |
| धाडियप्पा [ १ ] | वाड्डुगि [ २ ] |
| भिल्लम | वेसुगी [ २ ] |
| राजगी उर्फ श्रीराज | भिल्लम [ ४ ] |
| वाड्डुगि उर्फ वड्डिग | सेउणचंद्र [ २ ] [ इ. स १०६९ ] |
| धाडियप्पा [ २ ] | परम्मदेव |
| भिल्लम [ २ ] | सिंहराज |
| वेसुगी [ १ ] | मल्लुगि |

मल्लुगि –

| | | |
| --- | --- | --- |
| अमरगांगेय | अमरमल्लगि | भिल्लम [ ५ ] यवन [ इ स ११९१ ] |
| गोविंदराज | बल्लाळ | |

### वंशावळ नं १३

उत्तरकालीन अथवा देवगिरी येथील यादवराजांची वंशावळ.

१
मल्लुगि
|
भिल्लम (५) (इ स. ११८७-९१)
|
जैत्रपाल उर्फ जैतुगी (१) (११९१-१२१० इ स)
|
सिंघण (१२१०-१२४७)
|
जैत्रपाल उर्फ जैतुगी (२)
|
कृष्ण (इ. स १२४७-६०) — महादेव
|
रामचंद्र उर्फ रामदेव
(इ. स. १२७१-१३०९)
|
शंकर——कन्या = हरपाळ
(इ. १३०९-१३१२)

## भाग ४ था.

### रामदेवराव यादवाच्या ( जाधवाच्या ) राजवटींत मराठी वाङ्मयाचा उत्कर्ष

समस्तविबुधमान श्रीनिकेत वदान्य
समरविधुरमिह श्रीनिवासाङ्घ्रिपस्नह ।
जयति विनयसिन्धु र्वामनेश सुबन्धु
प्रणतसकलभूप कृष्णवंशैकदीप ॥

– श्रीबोपदेवकृत मुक्ताफल

श्रीबोपदेवानें आपल्या मुक्ताफल ग्रंथात देवगिरीश्वर यदुकुल-वंशीय रामदेवराव जाधव याच्या गुणांचें वर्णन वरील श्लोकात लिहिल्याप्रमाणें केलें आहे तो सर्व विद्वानात श्रेष्ठ ( कविकेसरी ) असून अखिल गुणिजनाचा चहाता होता असें विद्वान्मान्य व कवि-श्रेष्ठ श्रीबोपदेवानें रामदेवरावासंबधानें काढलेले प्रशसोद्गार निव्वळ औपचारिक असतील असें वाटत नाहीं. हेमाद्रीनें मुक्ताफल ग्रंथावर 'कैवल्यदीपिका' नावाची टीका लिहिली आहे, तींतहि सदरील प्रशस्तीस पर्यायानें पुष्टी दिली आहे. महादेवराजाचे राजवटींत राजाश्रयामुळें हेमाद्रीस 'चतुर्वर्गचिंतामणि' सारखा विस्तृत धर्मग्रंथ पुरा करता आला हेमाद्रीनें संस्कृतात ग्रंथरचना करण्याचा आपला व्यासंग रामदेवरावाच्या राजवटींतही सारखा चालू ठेविला होता. यामुळें विद्वान लोकासंबधानें त्याची सहानुभूति असणें साहजिक होतें शिवाय देवगिरीच्या दरबारात हेमाद्रि मुख्य मन्त्रिपदावर असल्यामुळें त्याजकडून, महादेवराय व रामदेवराव यास विद्वान् ग्रंथकारास व कवीस राजाश्रय देण्याचें कामीं वेळोवेळीं सल्ला मिळत

असली पाहिजे देवगिरीच्या दरबारात संस्कृत व मराठी ग्रंथकाराचा जो गौरव होत असे त्याचे बरेंचसे श्रेय हेमाद्रीस देणें जरूर आहे. महानुभावपंथाच्या वाङ्मयात या विधानास दुजोरा मिळतो ही गोष्ट त्यातील पुढें दिलेल्या उताऱ्यावरून दिसून येईल

रामदेवरावाचे पूर्वी भरतखंडात विद्वान लोकांना आश्रय देणारे राजे बरेच होऊन गेले समुद्रगुप्त, विक्रमादित्य, श्रीहर्ष, धारचे मुंजदेव (इ स ९७३ ते ९९७) व भोजदेव (इ स १०१० १०५५) वगैरे राजानीं आपापल्या राजवटींत विद्वानास उदार आश्रय देऊन आर्यसंस्कृतींचें व संस्कृत विद्येचे संवर्धन केलें म्हणून त्याचीं नावें भारतीय इतिहासात चिरस्मरणीय झाली आहेत श्री-हर्षाप्रमाणें काहीं राजे स्वत ग्रंथकार होते ही गोष्ट खरी परंतु विद्वान लोकाकडून ग्रंथ लिहून व ते आपल्या नावावर प्रसिद्ध करून ग्रंथकार या नात्यानें आपली कीर्ति अजरामर राहावी अशी महत्वाकांक्षा बाळगणारे राजे प्राचीन काळात कमी होते असे नाही. खुद्द रामदेवराव जाधव यास अशाप्रकारची महत्त्वाकांक्षा होती अशाविषयीं महानुभाव पंथाच्या वाङमयात उल्लेख आढळतो रामदेवराव जाधवाच्या राजवटींत नरेन्द्र नावाचा प्रतिभासंपन्न कवि होता त्यानें आपल्या ग्रंथात या बाबतींत स्वत चा अनुभव लिहून ठेवला आहे, त्यातील उतारा पुढे दिला आहे

रामदेवरावाच्या दरबारात संस्कृत पंडित व कवि याना पूर्वापार चालिरीतीप्रमाणें राजाश्रय मिळत असे यात विशेष काही नाही परंतु त्याचे राजवटींत संस्कृत पंडित व कवि याच्याशी स्पर्धा करणारे नवीन भावंड उदयास आलें होतें हेमाद्री हा मराठी भाषेचा पक्षा

अभिमानी असून तिच्या उत्कर्षासाठीं सारख्या झटत असे हेमाद्रीनें रघुवंशावर 'दर्पण' नांवाची टीका लिहिली आहे, असें कांहीं विद्वानांचें मत आहे त्यांत संस्कृत पारिभाषिक शब्दांचे मराठी प्रतिशब्द ( Synonyms ) त्यानें जागोजाग दिले आहेत, जसे झवरोह= झाडाच्या पारब्या, वगैरे शिवाय त्यानें राजदरबारांत मराठी भाषेचा शिरकाव करवून, दरबारचा पत्रव्यवहार योड्या अवधींत मोठ्या प्रमाणावर करता यावा म्हणून 'मोडी' लिपी प्रचारांत आणिली यावरून मराठी भाषेची अभिवृद्धि सर्व बाजूंनीं झपाट्यानें व्हावी अशाबद्दल हेमाद्रीची सारखी खटपट चालू होती ही गोष्ट निःसशय होय

रामदेवराव जाधवाच्या कालापर्यंत भारतीय पंडित व कवि यांचा कल संस्कृत भाषेत ग्रंथरचना करण्याकडे असे संस्कृतावेरीज इतर भाषेंत ग्रंथ लिहिण्याकडे कोणाचीही प्रवृत्ति नसे याचीं कारणें काय असतील ती असोत ! संस्कृत भाषा ही देवाची भाषा, तींत श्रुति, स्मृति, पुराणें वगैरे धर्मग्रंथ लिहिलेले असल्यामुळें, तिला सर्व बाजूंनी विशेष प्रकारचें महत्त्व प्राप्त झालें होतें संस्कृतांत जो ग्रंथ लिहील त्याचीच विद्वानांत गणना होत असे संस्कृत भाषा ही व्यवहारांतील बोलण्याची भाषा नव्हती, तरी त्या भाषेवर प्रभुत्व मिळवून एखादा विद्वन्मान्य ग्रंथ लिहावा अशी दरएक पंडितास महत्त्वाकांक्षा असे.

युरोपखंडांत इ. स १५।१६ शतकापर्यंत ल्याटिन भाषेंत ग्रंथ रचना करण्याकडे विद्वानांची प्रवृत्ति होती खुद्द ( बायबल ) ( ख्रिस्तधर्माचें पुस्तक ) ल्याटिन अगर ग्रीक भाषेत लिहिलेलें

अमलल्यामुळें त्यांतील रहस्य समजून घेण्यास बहुसंख्याक समाजास धर्मगुरूंच्या तोंडाकडे पहावें लागे ही शोचनीय स्थिति नाहींशी करून, दरएक देशांतील लोकांच्या नेहमीच्या बोलण्यांत असलेल्या भाषेंत बायबलाचें रूपांतर करून घेण्यासाठीं लथर सारख्या समाजसुधारकास बरींच वर्षे यूरोपांत झगडावें लागलें. इंग्लंडांतील विद्वान् गृहस्थ लॉर्ड बेकन ह्यास ( Advancement of Learning ) हा ग्रंथ इंग्रजी भाषेंत लिहिण्यापूर्वी लॅटिन भाषेंत त्याच अर्थाचा ( Novum Organum ) ग्रंथ लिहिणें भाग पडलें नाहींतर त्याची युरोपखंडांतील विद्वानांत गणना झाली नसती.

संस्कृतभाषा अवगत असणाऱ्या लोकांची संख्या अत्यंत अल्प असल्यामुळें तिच्यामध्यें असलेलें ज्ञानभांडार मूठभर विद्वान लोकांच्या हातीं असे यामुळें बहुजनसमाजास कित्येक शतकें अज्ञानांत राहावें लागलें लोकांच्या बोलण्याच्या भाषेंत ग्रंथरचना होत नसल्यामुळें, त्यास, आपली धार्मिक व नैतिक उन्नति करून घेण्याचीं साधनें उपलब्ध नव्हतीं.

ही शोचनीय स्थिति खिस्तशकापूर्वी सुमारें चौथ्या शतकांत गौतम बुद्ध याच्या ध्यानांत आल्यामुळें त्यानें आपले सर्व धर्मग्रंथ पालि व मागधी भाषेंत लिहिण्याचा उपक्रम केला. संस्कृतांत बौद्धधर्माचा कोणताही ग्रंथ लिहिला जाऊ नये अशी त्यानें आपल्या शिष्यांना व प्रचारकांना आज्ञा केली होती दरएक देशांत अगर प्रांतांत लोकांच्या नेहमीच्या बोलण्याच्या भाषेंत बुद्धधर्माच्या तत्त्वांचा ग्रंथरूपानें अगर व्याख्यान द्वारें प्रसार करावा अशी त्यानीं आपल्या शिष्यांना व प्रचारकांना स्पष्ट आज्ञा होती त्यामुळें बुद्धधर्मीन

प्रसार बहुजन-समाजांत फार झपाट्यानें झाला. गौतम बुद्धानें जीं मतें प्रतिपादन केलीं तीं सनातन वैदिक धर्मग्रंथांत मुळींच नव्हतीं असें नाहीं. परंतु त्यानें आपल्या धर्माचीं तत्त्वें बहुजनसमाजास लोकांच्या नेहमींच्या बोलण्याच्या भाषेंत समजून देण्याचा सुसंघटित प्रयत्न केल्यामुळें सदरील धर्माचा प्रसार करण्याचे कामीं त्यास चांगलें यश आलें.

शके ११८० ते ११८५ च्या दरम्यान देवगिरीच्या आसपास एक अकल्पित योग घडून आला. त्यामुळें मराठी भाषेच्या उत्कर्षाची मुहूर्तमेढ रोविली गेली. श्रीचक्रधर नांवाच्या महाराष्ट्रीय ब्राह्मणानें कृष्णदेव व महादेव यांच्या राजवटींत महानुभावपंथाची स्थापना केली. सदरील सांप्रदायाचा त्रोटक इतिहास या पुस्तकाच्या ७ व्या भागात दिला आहे.

श्रीचक्रधरानें महानुभाव पंथाचे धर्मग्रंथ मराठींत लिहिण्याचा स्तुत्य उपक्रम केला. त्याच्या पट्टशिष्यानीं व अनुयायांनीं त्याच्या आज्ञेनुसार सदरील पथाचें सर्व ग्रंथ मराठींत रचिले. महानुभाव पथाचें मुख्य उपास्यदैवत श्रीकृष्ण असल्यामुळें, व देवगिरीचे यादवराजे आपल्या पूर्वजाचा संबंध यदुवंशीय श्रीकृष्णाशीं जोडण्यात अभिमान बाळगणारे असल्यामुळें, तत्कालीन यादवराजा रामदेवराव याचा ओढा साहजिकच त्या पंथाकडे असावा यांत कांहीं आश्चर्य मानण्याचें कारण नव्हतें. राजदरबारात महानुभावपंथाचे ग्रंथकार व कवि ह्याचे श्रीकृष्णाच्या लीलेसंबंधीं भक्तिरसानें ओथंबलेले अनेक ग्रंथ रामदेवरावाच्या दृष्टिपुढें येऊ लागले. देवगिरीच्या दरबारांत मराठी भाषेचा सर्व बाजूंनीं उत्कर्ष व्हावा हे हेमाद्रीचे ध्येय

असल्यामुळें सदरील सांप्रदायाचे ग्रथास स्वत चे पूर्वग्रह बाजूस ठेऊन त्यानें राजाश्रय देण्याचें कामीं मन पूर्वक सहाय्य करून आपलें मराठी भाषेवरील अकृत्रिम प्रेम व्यक्त केलें

याच सुमारास ( म्हणजे शके ११९७ चे सुमारास ) रामदेवराजाच्या राजवटींत पैठण येथें श्रीज्ञानेश्वरमहाराजाचा अवतार झाला. २१ वर्षांच्या अल्पायुर्मर्यादेत संस्कृत व मराठी भाषावर त्यानीं मिळविलेले प्रभुत्व व षड्दर्शनशास्त्राच्या अभ्यासात संपादिलेले नैपुण्य त्याच्या अलौकिक बुद्धिमत्तेची साक्ष पटवितात त्याचे कालात विद्वान् लोकांची प्रवृत्ति संस्कृतात ग्रंथ लिहिण्याकडे होती, असें असता श्रीमद्भगवद्गीतेसारख्या गहन व तत्वज्ञानपूर्ण ग्रथावर मराठींत टीका लिहिण्याचे त्यानीं धाडस केलें ही फार महत्त्वाची गोष्ट होय संस्कृत भाषेत ग्रंथ लिहिण्याची पूर्वापार वहिवाट सोडून आपण मराठींत टीका लिहिण्याचा उपक्रम का केला याची महाराजानीं ज्ञानेश्वरीच्या सहाव्या, दहाव्या व तेराव्या अध्यायात कारणें दिलीं आहेत तीं फार मननीय आहेत. मराठी भाषा ही, जोम व गोडी यासंबधींत संस्कृत भाषेच्या बरोबरीची किंबहुना कांकणभर अधिक आहे असें श्रीज्ञानेश्वरमहाराजानीं प्रतिपादन केलें आहे श्रीमद्भगवद्गीतेसारख्या अलौकिक धार्मिक ग्रथातील अमूल्य तत्वें प्राकृत जनास समजून सम जावीं व त्यायोगें भागवतधर्माचा प्रसार बहुजन समाजात व्हावा हा श्रीज्ञानेश्वर महाराजाचा अतस्थ हेतु असावा असे दिसतें त्याच्या पश्चात् सुमारें चारशें वर्षे महाराष्ट्रात अनेक संतानीं त्याचा कित्ता गिरवून त्याचा हेतु सफल केला व भागवतधर्माची तत्त्वें महाराष्ट्रात रुजवून ठेवली, ही गोष्ट वाचकास नव्यानें सांगण्याची जरूरी नाहीं.

श्रीज्ञानेश्वरमहाराज हे महाराष्ट्रातील भागवतधर्माचे आद्यप्रवर्तक होत असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. श्रीमद्भगवद्गीते-सारख्या ग्रंथावर मराठींत विवरण करितांना संस्कृत शद्बास, व सांख्य, योग व इतर गहनशास्त्रांतील पारिभाषिक शद्बास मराठींत प्रतिशद्ब अगर अन्वर्थक शद्ब मिळतील किंवा नाहीं अशी शंका श्रीज्ञानेश्वर-महाराजांच्या मनास निरुळ शिवली नाहीं. कोणतीही गोष्ट नव्यानें प्रचारांत आणितांना त्या कामीं येणाऱ्या भावी अडचणींचा प्रतिकार करून उद्दिष्ट कार्य पार पाडण्याचें नैतिक धैर्य फार थोड्या लोकांच्या अंगीं असतें. या बाबतींत लोकमान्य टिळकांनीं एका संमेलनप्रसंगीं काढलेले उद्गार फार महत्त्वाचे आहेत. " मराठी भाषेंत शद्बसंग्रह कमी असल्यामुळें कांहीं विषयावर लेख लिहितांना शद्बाचा तुटवडा भासतो अशी कांहीं विद्वान्गृहस्थ कुरकूर करितात ती व्यर्थ आहे. आपल्या देशबांधवास एकादी महत्त्वाची गोष्ट सवनावून द्यावी असें ज्या लेखकास अंतःकरणपूर्वक वाटत असेल, आपले अज्ञ देशबांधव सुज्ञ होऊन त्यांची सर्वांगीण उन्नति व्हावी ह्या हेतूनें अत्यंत आस्था-पूर्वक ज्याला एखादा संदेश त्यांस सांगावयाचा असेल, त्याला शब्दाचा तुटवडा कधींही भासणार नाहीं. संस्कृतांतलें गूढ ज्ञान आपल्या महाराष्ट्र बांधवांस सुलभ करून द्यावें या उद्देशानें ज्ञानेश्वर-महाराजांनीं जेव्हां ज्ञानेश्वरी लिहिण्यास आरंभ केला तेव्हां सहाशें वर्षांपूर्वीं सुद्धां त्यांना शद्बाचा तुटवडा भासला नाहीं. "

ज्ञानेश्वरींत मराठी भाषा व महाराष्ट्रदेश ह्या विषयीं प्रेमाचे व अभिमानाचे उद्गार श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं काढले आहेत ते देणें प्रमाण —

माझा मऱ्हाटाचि बोल कौतुकें । परि अमृतातेंही पैजा जिंके ।
ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ ६–१४ ॥
जिये कोंवळिकेचे निपाडे । दिसती नादींचे रंग थोडे
वेधें परिमळाचे बीक मोडे । जयाचेनि ॥ १५ ॥
ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणाचि होती जिभा ।
बोलें इंद्रिया लागे कळंभा । एकमेका ॥ १६ ॥
सहजे शब्दु तरी विषो श्रवणाचा । परि रसना म्हणे रसु हा आमुचा ।
घ्राणासि भावो जाय परिमळाचा । हा तोचि होईल ॥ १७ ॥
नवल बोलतीये रेखेची वाहणी । देखता डोळा पुरो लागे धणी ।
ते म्हणती उघडली खाणी । रूपाचीहे ॥ १८ ॥
जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मनाचि धांवे बाहिरें
बोलु भुजाही आविष्करे । आलिंगावया ॥ १९ ॥
ऐसीं इंद्रियें आपुलालिया भावीं । झोंबती परि तो सरिसेपणेंचि सुखावी ।
जैसा एकला जगचेववी । सहस्रकरु ॥ २० ॥
तैसें शब्दाचें व्यापकपण । देखिजे असाधारण ।
पाहातया भवज्ञा फावती गुण । चिंतामणीचे ॥ २१ ॥

ज्ञानेश्वरी अध्याय ६ वा श्लोक ६ २१

देशियेचेनि नागरपण । शांत शृंगारातें जिणें ।
तरि वोविया होती लेणें । साहित्यासी ॥ ४२ ॥
मूळ ग्रंथींचिया संस्कृता । वरि मऱ्हाटी नीट पाहता ।
अभिप्राय मानलिया चित्ता । कवण भूमी हे न चोजवे ॥ ४३ ॥
जैसें आंगाचेनि सुंदरपणें । लेणिया आंगचि होय लेणें ।
तेथ अळंकारिले कवण कवणें । हे निर्वचेना ॥ ४४ ॥
तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या
सुखासनीं शोभती आइणी । चोखट आइका ॥ ४५ ॥

ज्ञानेश्वरी अध्याय १० वा.

तरिं संस्कृताचीं गहनें । तोडोनि मऱ्हाटी शब्दसोपानें ।
रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें ॥ ९ ॥
म्हणोनि भलतेणें येथ सद्भावें नाहावें ।
प्रयाग माधव विश्वरूप पहावें ।
आणि संसारासि द्यावें । तिळोदक ॥ १० ॥

ज्ञानेश्वरी अध्याय ११ वा.

तो कृष्णार्जुनसंवाद । नागरीं बोलीं विशद ।
सांगेन दाऊ प्रबंध । वोवियेचा ॥ ११५६ ॥
गुणपाशि शांतिकथा । आणिजेल थार थारस्था ।
जे शृंगाराच्या माथां । पाय ठेवी ! ॥ ११५७ ॥
दाऊं देऱ्हाळ देशी नवी । जे साहित्यातें जोजावी ।
अमृतातें घुर्की ठेवी । माडणपणें ॥ ११५८ ॥
बोल वेऱ्हाळविती गुणें । चंद्रासि घे उमाणें ।
रसरंगा भुलवणें । नाद लोपी ॥ ११५९ ॥

ज्ञानेश्वरी अ० १३ वा.

संस्कृताचें दुर्लंघ्य असें तट तोडून माझ्या श्रीगुरुनीं मराठी शब्दांचा सोपा दादर ( जिना ) तयार केला आहे म्हणून याठिकाणीं वाटेल त्यानें भक्तिपूर्वक स्नान करावें व विश्वरूपप्रयागमाधवाचें दर्शन घेऊन संसारावर तिलोदक द्यावें अशा अर्थाच्या ११ व्या अध्यायांतील ओव्या आहेत. तसेंच संस्कृत व मराठी भाषा ह्या समान योग्यतेमुळें एका भावार्थाच्या सुखासनावर बसल्या आहेत असें १० व्या अध्यायांत म्हटलें आहे. मराठी भाषेची योग्यता फार मोटी आहे ही गोष्ट जगाच्या निदर्शनास श्रीज्ञानेश्वर महाराजांनी पूर्णपणें आणून दिली.

रामदेवरावाचे दरबारांत श्रीज्ञानेश्वर महाराज व त्यांचा समकालीन संत नामदेव या उभयतांचा गौरव झाला किंवा नाही याबद्दल कोठें उल्लेख आढळत नाहीं. तसेंच हेमाद्रि व श्रीज्ञानेश्वर महाराज यांची गांठ पडली होती किंवा नाहीं, याबद्दल ऐतिहासिक माहिती उपलब्ध नाहीं. निवृत्तिदेव, ज्ञानेश्वर, सोपानदेव व त्यांची बहीण मुक्ताबाई ही सन्याशाचीं मुलें म्हणून पैठण येथील ब्रह्मवृंदाकडून त्यांचा फार छळ झाला. निवृत्ति, ज्ञानेश्वर व सोपानदेव यांस व्रतबंध करण्याचा अधिकार नाही असें ब्रह्मवृंदानीं ठरविलें होतें. या प्रतिकूल परिस्थितीमुळें त्यांच्या अमूल्य ग्रंथाचें चीज त्यांच्या हयातींत झालें नसावें, ही गोष्ट विचारात घेण्यासारखी आहे.

पैठणच्या ब्राम्हणानीं श्रीज्ञानेश्वरमहाराजास शुद्धिपत्र दिलें होतें त्याची एक नक्कल भिंगारकरबुवांनीं छापिली आहे, या शुद्धिपत्राच्या ऐतिहासिक खरेपणाबद्दल विद्वान लेकांत मतभेद आहे. हें शुद्धिपत्र बोपदेवानें संस्कृतपद्यांत लिहिलें होते असें त्यांतील २५ व्या श्लोकांत म्हटलें आहे. बोपदेव व हेमाद्रि हे समकालीन असल्यामुळें हेमाद्रिची व श्रीज्ञानेश्वरमहाराजाची गांठ पडली असावी असा तर्क करण्यास जागा आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज हे पूर्णपणें निवृत्तिमार्गांतील असून स्वतःस विद्वान् म्हणवून घेण्याची त्यास महत्वाकांक्षा नव्हती, यामुळें राजदरबारांत आपल्या ग्रंथाचा गौरव करून घेण्यासाठीं जाण्याची त्यास बिलकूल गरज नव्हती. तत्वज्ञानाच्या अतुल्य पायरीवरचे मराठींत रचलेले ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हे ग्रंथ हेमाद्रीच्या वाचण्यांत आले असते तर महाराजाचा त्याजकडून फार गौरव झाला असतां, यांत शंका नाहीं.

श्रीज्ञानेश्वरमहाराजापूर्वी मुकुंदराय हे शके ११०८ चे सुमाराम हयात होते व सिंघणाचा मुलगा जैत्रपाळ उर्फ जैतुगी ह्याचे ते गुरू होते असें म्हणतात मुकुंदराज ह्यानीं विवेकसिंधु नावाचा ग्रंथ लिहिला असून त्यास मराठी भाषेंतील आद्यकवि असें म्हणतात त्यानें ' विवेक सिंधु, ' ' परमामृत ' ' पवनविजय ' ' मूलस्तंभ ' ' मंत्रिकरण, ' वगैरे ग्रंथ रचिले विवेकसिंधु हा ग्रंथ शके १११० मध्ये मुकुंदराजकविनें शार्ङ्गधर नावाच्या राजाच्या कारकीर्दीत जैत्रपाल नावाच्या एका धनिक गृहस्थाच्या विनंतिवरून रचला असे या ग्रंथाच्या उत्तरार्धांत अठराव्या अध्यायाच्या शेवटीं मुकुंदरायानें म्हटलें आहे शिवाय नृसिंहाचा बल्लाळ याचा मुलगा जयत्पाळ याचे आज्ञेने सदरील ग्रंथ लिहिला असें मुकुंदराज या ग्रंथाच्या अखेरीस म्हणतो. देवगिरीच्या यादवाच्या वंशावळींत नृसिंह व बल्लाळ अशी नावें आढळत नाहींत ही त्रयी म्हैसूर येथील होयसळयादव वंशातील राजपुरुषापैकीं असावी असें दिसतें मुकुंदराजानें दिलेल्या आपल्या परंपरेवरून व त्याच्या हकीकतीवरून तो शिवभक्त असून श्रीज्ञानेश्वराप्रमाणें नाथसांप्रदायी असावा असें दिसतें मुकुंदराजाच्या कालासंबधानें, विद्वान् लोकांत अद्याप एकमत नाहीं

महानुभावपंथाचा संस्थापक श्रीचक्रधर ह्यानें शके ११८५ च्या कार्तिक महिन्यात सिंदखेडीत गुरु असताना सन्यासदीक्षा घेतली, व शिष्यसांप्रदाय वाढवून आपल्या पंथाच्या विशिष्ट मताचा प्रसार करण्यास तो गावोगाव हिंडू लागला बुद्धधर्माप्रमाणें त्यानें ुंघ स्थापन केले व त्यात प्रवेश करण्यापूर्वी भिक्षुसंबधानें फार कडक निर्बंध घातले श्रीचक्रधरानें आपल्या धर्ममताचा

उपदेश आपले शिष्यवर्गास मराठी भाषेंत केला. त्यामुळें या पंथांतील बहुतेक सर्व ग्रंथांची रचना मराठी भाषेंतच झाली असें पूर्वी म्हटलें आहे. श्रीचक्रधराचा नागदेवाचार्य या नांवाचा एक पट्टशिष्य होता. यास ह्या पंथाचे आद्य आचार्य म्हणतात. श्रीचक्रधरानंतर त्यानें ह्या पंथाचा प्रसार केला. त्याचा पुत्र महेश्वरपंडित यानें शके १२२४ त ' ऋद्धिपुर वर्णन ' नांवाचा ग्रंथ लिहिला. तसेंच यक्षदेव उर्फ मुरारीमल्ल यानें गीतेवर' सुंदर टीका लिहिली. शके ११८७ मध्यें पारमांडल्य-आम्नाय-दीक्षित, पंडित हिरण्यगर्भ उर्फ हयग्रीव यानें **' गद्यराज '** या नांवाचा ग्रंथ रचिला. सुप्रसिद्ध ज्योतिषी **भास्कराचार्य** याने वंशा-तील आपण असल्याबद्दल भानुभट्टानें आपल्या ' भानुविजय ' ग्रंथाच्या अकराव्या अध्यायामध्यें स्वतःच्या वंशाची हकीकत दिली आहे ती येणेंप्रमाणें.—

सिंहाद्रीचिये पाठारीं । त्रिविक्रमाचें जन्मपुर ।
पुसिन गावीं वागारखेडीं । कमें उभार ॥ १ ॥
'त्रिविक्रमु विद्यापती । भास्कराचार्य वेदमूर्ति ।
तयाचा गोविंदु अर्थी । नित्य डायेंसी ॥ २ ॥
प्रभाकराचा मनोरथु । तेयाचा महेश्वर पुनीतु ।
तेयाचा कवीश्वर पंडितु । वेदांनियता ॥ ३ ॥
कवीश्वराचार्यांपासुनी । कमलापीठीं पुत्र दोनी ।
ज्येष्ठ जोगी पद्मस्थानीं । गुरु तो यादवांचा ॥ ४ ॥
जागोचे रामनाथु । राजेंद्राचा पुत्र भानु ।
तेयां चांगदेवें आरंभितु । मायातर्में ॥ ५ ॥

धारा सर्वेश्वराचा कुमर । कमळेपोटीं लक्ष्मीधर ।
तयाचा पौत्र अनंतेश्वर । तो आधार चांगदेवो ॥ ६ ॥
चांगदेवो देसाईरा । अध्यापकु जाला अवधारी ।
अनंतें घातली कागारवेरी । सिंघणाकारण शाळा ॥ ७ ॥
अनंता यादवें आव्हार्णीना । राहाविलें तीर्थी पैठणा ।
अध्यापकु उत्तम स्वीकारोनी । राये वृत्ती वर्तनी ॥ ८ ॥
क्रमेंचि अनंतापासोनी । उमाबाजठरीं पुत्र दोनी ।
तत्प्रभें दयन्तु मनी । अति सुखायिलें ॥ ९ ॥
जेष्ठ नावें दिवाकर । धारा भानु सर्वेश्वर ।
उभयां आला माचोकार । वाचस्पतीसा ॥ १० ॥
मग दिवाकराचा ब्राह्मणी । जुंदैवें झाला गर्भिणी ।
एक कन्या पुत्र दोनी । वरा ओरीं ॥ ११ ॥
तीर्थी कर रानी श्रीपुरीं । व्याहिली कन्या दिवाकरीं ।
मन नी हानरिनी जाली कुमरी । नोकेंडोनि शालें ॥ १२ ॥
तेचि भुजाळी नागाविका । त्यागा पानली भानुजवल्लिका ।
जेणें बोधिलें रघूनायका । नांदेडकरानें ॥ १३ ॥
(भानुविजय अ. १३)

वरील उताऱ्यावरून पाटण येथील शके ११२८ च्या शिला-लेखातील मजकुरास दुजोरा मिळतो. शिवाय या वंशातील उमांबा व नागाविका नांवाच्या दोन विदुषी स्त्रियांनीं महानुभावपंथ स्वीकारून बरीच ग्रंथरचना केली असें दिसतें. देवगिरीचे यादवराजाकडून भास्कराचार्याचे कुटुंबांतील विद्वान् वंशजास क्रमक्रमा राजाश्रय मिळाला याचें चटकदार वर्णन यात दिलें आहे.

श्रीचक्रधराचे पट्टशिष्य श्रीनागदेवाचार्य याम. केशवराजसुरी उर्फ केशव पंडित यानीं ' उद्धरण ' ' स्मरण ' इत्यादि प्रकरणें

संस्कृत भाषेत रचू कीं काय असा प्रश्न विचारिला असता आचार्यांनी म्हटलें " नकोगा केशवदेया येणें माझिये स्वामीचा सामान्यु परिवारु नागवलकी परमेश्वरें तरी जीवाचेया सकोचिता आन अनेक व्यसना अयोग्यता जाणोनी आन काठिण्यता चुकवोनी सकळांसी अल्पायासें ब्रह्मविद्याचिये ठायें रिघसता येवोनि परमेश्वर त्यासुखमा वानु हो आता म्हणोनिची महाराष्ट्रीयें निरोपिलें कीं गा परत्रीं सर्वज्ञ ( चक्रधरस्वामींला ) काई देववाणि निरोपून लाहे कीं गा भणौनि केशवा संस्कृत सूत्रबद्ध प्रकरण न करी तू की "

( कथा ४७ )

याच उदात्त हेतूनें श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी लोकसंग्रहार्थ भगवद्गीतेतील रहस्य मराठींत जनतेपुढे ठेविलें व तोच रिवाज एकनाथ श्रीधर कवींनी पुढें चालविला

रामदेवराव जाधवाच्या राजवटींत नरेंद्रपंडित अयाचित या नावाचा एक प्रासादिक श्रेष्ठ दर्जाचा कवि होऊन गेला त्यानें रुक्मिणी स्वयंवर या नावाचा एक उत्तम ग्रंथ लिहून तो रामदेवरायाचे दरबारांत वाचून दाखविला. रामदेवरायास तो ग्रंथ इतका पसंत पडला कीं त्याचे कर्तृत्वाचा मान कवीनें आपणास (रामदेवरावास) द्यावा व ग्रंथाच्या शेवटीं आपलें नांव घालावें अशी त्यानें नरेंद्रापाशीं आपली इच्छा प्रदर्शित केली व ती पूर्ण करण्यास आल्यास ग्रंथांतल्या प्रत्येक ओवीबद्दल त्यानें नरेंद्रास मोहरा म्हणून सुवर्णद्रव्य देण्याचें आश्वासन दिलें त्यावर नरेंद्रानें जें बाणेदार उत्तर दिलें तें मननीय आहे. नवीन ग्रंथकार पैशाच्या मोहाला बळी पडून आपलें स्वत्व गमाविण्यास तयार असतात हें आहे या उदाहरणा-

वरून निदर्शनास येतें नरेंद्रानें राजास उत्तर दिलें कीं "आपले इच्छेस मान दिल्यास इतर कवि मला हासतील व नांवें ठेवितील आणि आमच्या कविकुलास बोल लागेल" हें नरेंद्राचें सडेतोड उत्तर ऐकून राजास संताप आला व त्यानें नरेंद्राच्या हातून तो ग्रंथ हिसकावून घेतला नरेंद्रानें राजास म्हटलें "महाराज या ग्रंथात अजून कांहीं शोध घालावयाचे आहेत तर आज हा ग्रंथ मजला परत द्यावा म्हणजे तो घरीं नेऊन एकवार तपासीन आणि उद्ईक पुन्हा आणून देईन "

राजानें नरेंद्राचें हें म्हणणें ऐकून हेमाद्रिकडे मार्मिक मुद्रेनें पाहिलें. तेव्हां हेमाद्रि म्हणाला " आम्ही ब्राह्मण लोक, आम्हास आपलाच राजाश्रय, तरी ग्रंथ आपण मागावा व आम्हीं तो आपणास देऊं नये, तर मग तो कोणास द्यावा ' ' असें राजास हेमाडपतानें उद्देशून म्हटलें व अर्थपूर्ण दृष्टीनें नरेंद्राकडे पाहून त्यास विचारलें, "हे कविश्रेष्ठा ! तुम्हास राजाचें म्हणणें मान्य आहे काय ?" हेमाद्रीच्या मनांतील आशय ओळखून नरेंद्रानें उत्तर दिलें कीं "आम्ही राजाचेच आहोंत, मग ग्रंथ देण्यास दोष कशाचा ? आमचे बंधु शारयकवि व नरसिंह कवि यांनीं केलेले रामायण आणि नलोपाख्यान हे दोनही ग्रंथ आपणास नाहीं का दिले ? तसेंच हें रुक्मिणीहरणही का देऊं नये ? यांत थोरलें राजवर्णन केलें आहे ते का उगाच केलें आहे ? ' असें म्हणून नरेंद्रानें कांहीं भाग तेथल्यातेथें वाचून दाखविले, तें ऐकून राजास ... १ होऊन त्यानें तो ग्रंथ कवीस परत दिला त्याप्रमाणें नरेंद्रानें ती वेळ मारून नेली तथापि रामदेवरावाचे वर्तनाबद्दल त्याचे मनांत

कायमची अर्धी राहिली, ही हकीगत लीळाचरित्रातील १०१ लीळा या सदराखालीं दिली आहे, ती येणें प्रमाणें —

नरेंद्र कवे ग्रंथ भेटीसी अनुसरणें: नरेंद्रकवि· सैल्यकवि. नृसिंहकवि=अयाचिते हे तिघे बंधु देवगिरीयेसी रामदेवरायाचे या आश्राह्रतीयेती: नृसिंह कवीयें नलोपाख्यान केलें: सैल्य कवीयें रामायण केलें· ते आपुलाले ग्रंथनगरी सभे माझारी जावोनी रामदेवो रायापुढें भणितलें: तेथांचि नरेंद्र कवि बैसले असति· तेयांसी भटो-बासापासौनि श्रवण होतेः तेहीं ग्रंथ ऐकोनिया तोषले· आन सैल्य कवि ( अपभ्रंशें साल कवी ) ते भणितलें: ऐसाचि जरी द्वारकेचा रावो वर्णितेती तरि तुमचेया जन्मांतराचेया पापा पुरश्चरण होतें कीः ऐसें रामदेवराया देखतांचि भणितलें. तंव तेहीं भणितलें: तुम्हांसी एक-कवित्व करवत ना काः मा पाहो तुमचा वर्णनु· मग नरेंद्रकवि तेणें चि मळें अटरागत वोवीये " रुक्मिणी स्वयंवर " ग्रंथ केलाः मग-तोही वधुद्धया देखताचि रामदेवराया पुढां भणितला सहर्षे वाचिता देये वोविये पर्यंत आला " देवाचिया दादुलेपणाचा उवाग ॥ न साहेचि मातांही सागरा ॥ भणे वोसरौनी राजसभा ॥ ठिधली द्वारा-वती ॥ " यावरी रामदेवरायें भणितलें ग्रंथाचा अभंगी ( अर्नी ) नाम आसुनें देयावें: मा ग्रंथाचिया जतुर्कीया वोवीया तेतुकेन्हि सोनटके आन चौथरीया आसु वोराळूर्णाये पावीजेल· जव नरेंद्र कवें भणितलें: नगजे हो. आमुचेया कविकुळा खोल लागेल. तंव रामदेवरावो ग्रन्था-रसोरें ग्रंथ तेया पासौनि घेतला· तव नरेंद्र कवियें रायातें निनविलें· जे गाजे हो इया ग्रंथी आगुरें कवित राहीं शोध उरलाचि असेः हो एक वेळ ग्रंथ देयावाः मा शोधौनी देवों: तंव रायें भणितलें: उदेया-

चिये वेळे अथ आणोनी देयाव ना तरि आम्ही घेनोचि राहो ऐसें भणानि हेमाडी पंडिताची ( हेमाद्रि ) वाम पाहिली तव हेमाडी पंडितीं भणितलें ना राये हो: आम्ही ब्राह्मण राया आयित की रायासी अथ नेइ तरि देवां करणासी ऐसें मणोनि नरेंद्र कवीया भणितलें कविवरो राने काइ भणितानी ते तुम्हा प्रमाण आती: नरेंद्रीं भणितलें, आम्ही रायाचीये कीं अथु देयानिया काइ दूषण-आती रामायण नलोपाख्यान ते तुम्ही रायासी जे दिधले तें रुक्मिणी स्वयंवरहि करुनिया राया अर्पावें: ऐसीं रामवर्णनु केलें तें काइ वाउरेंचि केलें कीं ऐसें भणानि सेवटील भागु वाचोनी दाखविला तें रायें तो अथु नरेंद्र कवीया दिधला परि उदेयाची सभे आणोनी येणेंचि आती हो राजेहो आती एसें अथ घेवोनि गृहा गेले आन शल्य नृसिंहात भणितलें निघे अथु मिळानि लेखनकरा पा तरि तेहीं मानिलें: ऐसेया परि तीन तीन शत वोवीय येयाचि येयाचि लेखन केलें पा पुनरपि वैसलेति नव नाळ मुहूर्तचि रायें बोलावो पाठविलें अथ शोधु जाला तो आताचि आणावा तेया सारिसेंचि नरेंद्र कवीये अथु नेवोनि रामदेवरायासी आशिर्वाद मंत्रेनसी दिन्हला आन नरेंद्र गृहा येवानि नूतन लेखन अथ नवशत ओवीयाचा घेवोनि समाराचा त्याग करुनियाभटोनामा नवळी येवोनि तेहीं भिक्षा केली ऐसीया परि रुक्मिणीस्वयंवरासी नरेंद्र कवीया महात्म मार्गा आले आन तो अथुही आला असे

( लीला १६१ )

नरेंद्रपंडित कवि आपल्या बाणेदार स्वभावामुळें राजाश्रयास मुकत आहे असें हेमाद्रीचे ध्यान येताच त्यानें मोठ्या चतुराईनें नरेंद्रास

उद्देशून जे शब्द उद्गारले त्यामुळें नरेंद्रानें आपल्या भाषणाचा ओघ बदलला आणि रामदेवरायाचा राग शांत केला. या एकाच उदाहरणावरून ग्रंथकारास दरबारांतून आश्रय मिळावा याबद्दल हेमाद्रीला किती कळकळ होती या गोष्टीची सहज कल्पना होते.

नरेंद्रकविचा " रुक्मिणी स्वयंवर " हा ग्रंथ अद्याप छापून प्रसिद्ध झाला नाही; परंतु त्यांतील दिलेल्या उताऱ्यावरून तें काव्य श्रेष्ठ दर्जाचें असावें असें दिसतें. नरेंद्रकविनें हें काव्य लिहिल्यावर महानुभावपंथाचा स्वीकार केला असें म्हणतात. या पंथाची दीक्षा घेतल्यावर त्यानें बरीच ग्रंथरचना केली व तो श्रीनागदेवस्वामींचा पट्टशिष्य बनला. श्रीचक्रधरस्वामींनें पश्चात् ही हकीकत १६१ लीळा या सदराखालीं दिली आहे.

या कथेंत ऐतिहासिक सत्य किती असेल तें असो, परंतु रामदेवरावास आपलें नांव ग्रंथकार या नात्यानें चिरकाल रहावें अशी श्रीहर्ष वगैरे राजाप्रमाणें हाव होती ही गोष्ट सिद्ध होते. रामदेवरावाच्या या महत्त्वाकांक्षेमुळें त्यानें राजवटींत महानुभावपंथाचें व इतर वाङ्मय मोठ्या प्रमाणावर निर्माण झालें यांत शंका नाहीं. रामदेवरावाच्या राजवटींत मराठी भाषेच्या भरभराटीची जी लाट उसळली ती पुढें कित्येक शतकें चालू राहिली ही गोष्ट मराठी भाषेचा बरोबर अभ्यास करणाऱ्यासही कळून येईल. रामदेवरायाच्या हयातींत म्हणजे शके १२३१ पर्यंत महानुभावपंथामध्यें नामांकित कवि व ग्रंथकार बरेच होऊन गेले ही गोष्ट भावे यांचें "महाराष्ट्र सारस्वत" वरून व श्रीयुत यशवंतराव खुशाल देशपांडे यांच्या ' महा-

नुभावीय मराठी वाङ्मय" या ग्रंथावरून दिसून येते आणि यांनी महानुभावीय ग्रंथांची सूचि प्रसिद्ध केली आहे त्यावरूनहि या विधानास पुष्टि मिळते श्रीचक्रधरस्वामींचे पट्टशिष्य नागदेवाचार्य हे होते यानाच या पंथाचे आद्य आचार्य म्हणतात त्याने काहीं ग्रंथ लिहिले असल्यास ते उपलब्ध नाहींत **गौतम बुद्धाच्या** पश्चात् त्याचा पट्टशिष्य **आनंद** याने बुद्धधर्माचा, तसेंच येशुख्रिस्तानंतर त्याचे पट्टशिष्य यांनी ख्रिस्तधर्माचा, ज्याप्रमाणे प्रसार केला त्याप्रमाणे नागदेवाचार्यांनें महानुभावपंथीय मताचा प्रसार केला नागदेवाचार्यांचा जन्म शके ११५८ त होऊन त्याचा मृत्यु शके १२२८ त झाला नागदेवाचार्यांची बहिण रूपाई नावाची होती तिची नाती महदंबा या नावाची असून ती कृष्णदेव व महादेव या यादवराजाच्या कारकीर्दीत कवयित्री व ग्रंथकर्ती म्हणून फार प्रसिद्धीस आली होती महदंबेची गीतें फार प्रेमळ व भक्तिपूर्ण आहेत. रामदेवरायाचे कारकीर्दीत श्रीभास्कर कवीश्वर ऊर्फ भानुभट्ट बोरीकर यांनी दोन ग्रंथ फार सुरस लिहिले. त्यापैकीं " शिशुपाल वध " हा ग्रंथ शके ११९५ त व " एकादश स्कंध ' शके ११९६ त लिहिला याशिवाय दामोदर पंडितानें शके १२०० मध्यें " वत्सहरण " नावाचें काव्य रचिलें महींद्र उर्फ महिभट्ट व्यास हाही श्रीचक्रधर स्वामींचे पट्टशिष्यांपैकीं होता

रामदेवरायाचे राजवटीत म्हणजे शके ११९३ पासून तों शके १२३१ पर्यंत महानुभाव पंथांत जे कवि आणि ग्रंथकार निर्माण झाले त्यांची व त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांची रोटक माहिती कोष्टकरूपाने पुढें दिली आहे.

राव जाधव ह्याचे कारकीर्दीविषयीं प्रकाश पाडणारे बरेच उल्लेख आहेत असें महानुभावपंथीय महंतांचें म्हणणें आहे; परंतु हा ग्रंथ प्रसिद्ध होईपर्यंत या बाबतींत कांहीं लिहितां येत नाहीं. दामोदरपंडितांचें वत्सहरण व कवीश्वर भास्कर व्यास यांचें **शिशुपालवध** व नरेंद्र पंडितांचें **रुक्मिणी–स्वयंवर** हे ग्रंथ श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे पूर्वींचे अगर समकालीन ग्रंथ आहेत.

वरील ग्रंथांतील भाषेवरून मराठी भाषा फार वर्षांपासून महाराष्ट्रांत प्रचारात असली पाहिजे. महानुभाव पंथाची स्थापना होण्यापूर्वी मराठी भाषेंत बरीच ग्रंथरचना झाली असावी असें अनुमान काढण्यास जागा आहे. देवगिरीचा अखेरचा राजा रामदेवराव याच्या राजवटींत, यक्षिणीची कांडी फिरवून, ती एकाएकीं निर्माण झाली असें केव्हांही म्हणतां येणार नाही. मराठी भाषेचा अभिमान बाळगणाऱ्यांनी ह्या कामी नेटानें संशोधन केल्यास प्राचीन काळच्या मराठी वाङ्मयाचा ठेवा हातीं लागण्याचा संभव आहे. रामदेवराव जाधव ह्याच्या राजघराण्यांपैकीं कांहींजणांनीं महानुभावपंथाचा स्वीकार केला होता ह्याबद्दल महानुभावीय ग्रंथांत उल्लेख आढळतो. ( नागदेवाचार्य कथा १६८ ). गोपाळ पंडित हा पैठण महाराजवळील वरखेड, वाटेगाव येथील मूळ रहिवासी होता, त्याच्या धाकट्या भावाचें नाव केशवराजसूरि असें होतें. गोपाळ पंडित हा आपलें गांव सोडून देवगिरीस जाऊन राहिला, तेथें असतांना रामदेवराव जाधवांची पाटटी राणी कामाख्या किंवा कामाईदेवी हिचा तो पुराणिक व खाजगी मानिनदार होता. कामाईदेवीनें मोक्षार्थेन नागदेवाचार्यांचा मंत्रोपदेश घेतला होता, ह्याबद्दल नागदेवाचार्यांचे चरित्रांत उल्लेख सांपडतो तो येणेंप्रमाणें:–

" भद्रकार कामाइसे तिये रामदेव रायाची धाकुटी राणी तिये मव्यायें लक्षाचा व्यापारु गोपाळ पंटिना होता कामाइसें सदापुराण ऐकिलें असती ! "

रामदेवराव जाधवाच्या अनेक राण्यापैकी कामाई नावाची एक राणी होती. नवऱ्याच्या मरणानंतर त्याच्या पत्नीनें सती गेलें पाहिजे अशी हिंदु लोकांत पूर्वापार रुढि होती तीस अनुसरून कामाई खेरिज रामदेवरावाच्या सर्व राण्या सती जाण्यास सिद्ध झाल्या परंतु कमाईच्या मनांतून सती जावयाचे नव्हतें. रामदेवरावाचा ज्येष्ट मुलगा शंकरदेव यानें, सती जाण्याविषयीं तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केला परंतु ती आपला आग्रह सोडीना. सती न जाणेबद्दल तिनें शंकरदेवास कारण सांगितलें तें असें --

' आपण नागदेवाचार्याकडून महानुभावपंथाचा मंत्र अथवा उपदेश घेतला असून त्याअन्वयें आत्महत्या करणें म्हणजे नरकाचें साधन होय ' असें तिनें सर्व लोकांसमक्ष शंकरदेवास व आपले बापास निक्षून सांगितलें, शिवाय, आपलें अवशिष्ट आयुष्य भगवचिंतनांत घालवून पतिव्रता धर्मानें वागण्याचा आपला निश्चय असल्याबद्दल तिनें त्यास स्पष्ट कळविलें. याउप्पर जबरदस्तीनें सती जावयास आपणास लावूं नये अशी तिनें शंकरदेवाची करुणा केली परंतु शंकरदेवाचें मनास द्रव आला नाहीं उलट तिनें सती गेलेंच पाहिजे असा त्यानें आग्रह धरिला. शंकरदेवाचा हा दुराग्रह पाहून तिनें त्यास शाप दिला कीं, " तू कोणाच्या तरी तावडींत सांपडला जाऊन तुझ्या अंगाची कातडी काढली जाईल व तुझें निसंतान होईल व यादवांचें राज्य अल्पावधींत नष्ट होईल " मदरचे हकी

[illegible] । नळमळन टाकरी नाह [illegible] तिथे। वाढ [illegible] मध्यभागी म [illegible] [illegible] बाध [illegible] नुकरणाचे [illegible] [illegible] नार [illegible] अथवा [illegible] नगरण प्रांतवर [illegible] परमेश्वर [illegible] तथा [illegible] बाध [illegible] नळमळ नाही तरी प्रमाद [illegible] चैतन्य [illegible] तथा [illegible] [illegible] तयाचा [illegible] तथा बाध नाही [illegible] नळमळ [illegible] पुरुष [illegible] परमेश्वर [illegible] [illegible] या तयात परमेश्वर [illegible] अगाधार कामाई [illegible] [illegible] प्रकरण [illegible] निरोपण [illegible] पुनत [illegible] [illegible] तथा [illegible] [illegible] [illegible] कामाइचा मुख [illegible] [illegible] आता [illegible] [illegible] ( [illegible] )

वरील उताऱ्यांत रामदेवराव जाधवाची राणी कामाई हिने महानुभावपंथाचा स्वीकार केल्याबद्दलची जी माहिती दिली आहे ती खरी असल्यास या पंथाच्या मताचा पगडा राजघराण्यांतील मंडळींवर व खुद्द रामदेवराव जाधवावर अमला होता असे मानण्यास जरीच जागा आहे. महानुभाव पंथासंबंधानं सनातन हिंदुधर्माच्या अनुयायांना तिरस्कार वाटत होता त्यामुळे एकंदर हिंदुसमाजांत रामदेवराव जाधवासंबंधाने तिरस्कार उत्पन्न झाला होता. त्याच्या प्रजेमध्ये असंतुष्टता उत्पन्न होण्यास जी अनेक कारणे झाली त्यांपैकी हे एक मुख्य कारण होय.

महाराष्ट्रांतील साधु संतांच्या अनेक परंपरांपैकी नाथपरंपरा ही एक होय. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या ग्रंथांत, ही गुरुपरंपरा दिली आहे, ती येणेप्रमाणे —

। आदिनाथ मच्छींद्रनाथ गोरक्षनाथ-गैनीनाथ निवृत्तिनाथ ज्ञाननाथ उर्फ ज्ञानदेव या भावार्थे घराणें यजुर्वेदी वत्सगोत्री वाजसनीय शाखेचे होते म्हणजे श्रीज्ञानेश्वर महाराज हे आमच्या चरित्रनाथ काच्या शाखेचे ब्राह्मण असून समानगोत्री होते श्रीज्ञानेश्वरमहा राजांनीं आपल्या पधराव्या वर्षी ज्ञानेश्वरी ग्रंथ पुरा केला व त्यानंतर ' अमृतानुभव ' या नावाचा वेदांतपर ग्रंथ त्यांनीं लिहिला तो भाषेच्या व विवेचनाच्या दृष्टीने अमळ दुर्बोध आहे या दोन मुख्य ग्रंथाशिवाय ' भक्तराज ' ' स्वात्मानुभव ' हेहि ग्रंथ त्यांनीं लिहिले आहेत यांखेरीज ' चांगदेव पासष्टी, ' ' सच्चिता-नंद लगोटा, ' ' कल्याण पत्रिका, ' ' नमन ' ' पचीकरण, ' ' महावाक्य, ' ' हरिपाठ ' ' मुक्ताइचरित्रिका ' गायत्रीरहस्य ' ' अन्वयव्यतिरेक ' वगैरे लहानमोठे ग्रंथ श्रीज्ञानेश्वर महाराजांचे म्हणून समजले जातात परंतु हे ग्रंथ त्यांनी लिहिले यांबद्दल गेतिहा सिक पुरावा नाहीं व या बाबतीत विद्वानांत एक मत नाहीं श्रीज्ञाने श्वर महाराजांप्रमाणेच त्यांची इतर भावंडे विद्वान व विरक्त असून त्या सर्वांनीं मराठीत ग्रंथ रचना केली आहे निवृत्तिनाथांनीं हरिपाठ या नावाचा एक मुद्रग ग्रंथ लिहिला आहे ' निवृत्तिसार ' या नावाचा आणखी एक ग्रंथ त्यांनी लिहिला असाबद्दल नामदेवाच्या एका अभंगात उल्लेख केलेला आढळतो परंतु यांखेरीज या बाबतीत दुसरा आधार नाहीं सोपानदेव यांनें पचीकरण हरिपाठ नमन वगैरे प्रकरणें लिहिलीं असून सोपानदेवी या नावाची एक समश्लोकी गीतेवरील टीका श्रीमद्‌गगर्देवराव लिहिली आहे मुक्ताबाईचे अभंगाची भाषा गोड असून ते भक्तिरसाने ओथंबलेले आहेत तिने रचिलेले

"तारीचे अभग" प्रसिद्ध असून, त्यावरून तिच्यां भावडाना तत्कालीन ब्राह्मणाकडून जो छळ झाला त्या प्रसगावर चागला प्रकाश पडतो तिनें सुमारं सहाशें वर्षांपूर्वी रचलेल्या 'हरिपाठा'तें लोक अद्याप आवडीनें पठण करितात

श्रीज्ञानेश्वर महाराजाचे समकालीन सत व ग्रथकार नामदेव विसोबा खेचर, चोखामेळा वगैरे होते ते पढरपुरच्या श्रीविठ्ठलाचे नि सीम भक्त असून भागवत धर्माचे पुरस्कर्ते होते त्यानीं स्वत ग्रथ लिहिले नाहीत परतु स्वयस्फूर्तीनें त्यानीं जी कविता केली ती त्याच्या शिष्यवर्गानी लिहून ठेविली विसोबा खेचर हा शके १२३१ श्रावण शु० ११ शीस समाधिस्त झाला यातील काहीं ग्रथ कार रामदेवराव जाधवाचे राजवटींत निर्माण होऊन ते त्याच्या पश्चात् कालवश झाले व त्याचे काहीं ग्रथ यादवाचे राज्य नष्ट झाल्यानतरचे आहेत

रामदेवराव जाधवाच्या राजवटींत ज्ञानेश्वरी हा एकच ग्रथ निर्माण झाला असता तरी त्याची कारकीर्द मराठीवाङ्मयाच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें सस्मरणीय झाली असती ज्ञानेश्वरी ग्रथाची योग्यता फार मोठी आहे ह प लक्ष्मण रामचद्र पागारकर ह्यानीं श्रीज्ञानेश्वर महाराजाचे चरित्र लिहिलें आहे त्यात ज्ञानेश्वरी ग्रथाच्या थोरवी सबधाने उद्गार काढले आहेत ते यथार्थ असून अत्यत मननीय आहेत त्याचा उतारा पुढें दिला आहे

ज्ञानेश्वरी हा ग्रथ मराठी भाषेंत जसा चालत तसा ग्रथ यानंतरही पाहण्यात आहे धर्मग्रथ म्हणून काव्य म्हणून, व्यवहारनीति शिकावण रा म्हणून ज्ञान ताही रचीत ज्ञानवीरक पण ज्ञानवीराच सिंहासन उळमळायला लावणारा

दुसरा ग्रंथ झाला नाहीं. कोणी ज्ञानेश्वरींतले सिद्धान्त व विषयप्रतिपादनाची रम्य शैली पाहून डोलेल, कोणी भाषासौंदर्य व उपमादृष्टान्तादिकांची समर्पक योजना पाहून नाचेल, कोणी दृष्टान्तद्वारा महाराजांनीं व्यक्त केलेलें व्यवहारज्ञान पाहून चकित होईल, कोणी महाराजांची निस्सीम गुरुभक्ति व त्यांच्या वाणींतलें अद्भुत प्रेम पाहून रंगेल, कोणी कर्म, ज्ञान व उपासना यांतील सिद्धांत-शास्त्र व व्यवहार यांचा उत्कृष्ट मेळ बसेल अशा पद्धतीनें-महाराजांनीं मांडलेले पाहून संतुष्ट होईल. पण एवढें खरें की, जो जो ज्ञानेश्वरीचा परिचय करून जाईल तो तो परम समाधान पावेल. ज्ञानेश्वरीचें अंतरंग संतसज्जनांना सुखवील व शब्द-सौष्ठव रसिकांना रमवील. शब्दही गोड व अर्थही गोड. महाराजांनीं आपल्या ग्रंथाचें द्विविधत्व ओळखलें की काय कोण जाणे ' तेणें अध्यात्मशास्त्रीं इयें। अंतरंगचि अधिकारिये । परि लोक वाक्चातुर्यें । होईल सुखिया " (अ. १८–१७५०) असें म्हटलें आहे. ज्ञानेश्वरींत परमार्थ व प्रपंच दोन्ही सांगितले आहेत. **महाराजांनीं सिद्धांतांत परमार्थ व दृष्टांतांत व्यवहार शिकविला आहे.** उपमा, रूपक व दृष्टांत यांच्या द्वारें त्यांनीं व्यवहारनिरीक्षण केलें आहे. सोन्यानें जणूं सोन्याच्याच गुणानें ओतावें। तसा त्यांना आध्यात्माच्या जोडीनें व्यवहार असा उत्कृष्ट ओळखता आहे की प्रपंच परमार्थ यांत बिलकुल वेगळेपणा करतां येत नाहीं असा बोध ज्ञानेश्वरीच्या वाचनानें होतो. हा एकच ग्रंथ पुरे आहे अशी सर्वांगपूर्णता त्यांत आहे.

श्रीमद्भगवद्गीतेप्रमाणेंच ज्ञानेश्वरीचे अठरा अध्याय आहेत; व या सर्वांमिळून सुमारें ९,००० (नऊ हजार) ओव्या आहेत. मार्मिक उपमा व दृष्टान्त यांच्या द्वारें श्रीमद्भगवद्गीतेचें रहस्य सामान्य जनांस सुलभ रीतीनें समजेल अशा तऱ्हेनें विवेचन करण्याची महाराजांची शैली अप्रतिम आहे यांत शंका नाहीं. व या वैशिष्ट्या-मुळें ज्ञानेश्वरी हा ग्रंथ महाराष्ट्र सारस्वताचा मुकुटमणि होऊन बसला

नामदेवमहाराज यांचे भक्तिरसानें ओथंबलेले असे पुष्कळ अभंग आहेत त्यांच्या सारखा परमेश्वराचा प्रेमळ भक्त क्वचितच सापडेल ' श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या उपदेशाची छाप नामदेवमहाराजांवर पडलेली जागोजाग दृष्टोत्पत्तीस पडते. नामदेवमहाराजांच्या घरची दासी जनाबाई हिजवरही श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या उपदेशाचा पगडा पडल्याचे दिसून येतें जनाबाईनें स्वतः पुष्कळच अभंगरचना केली आहे महाराष्ट्रांतील सर्व भक्तमंडळींपेक्षा जनाबाईच्या वाणींत प्रेमळपणा विशेष रीतीनें भरलेला आहे असें आढळून येतें श्रीविठ्ठलास आळवितांना तिच्या प्रेमळ वाणींतून जे अभंग बाहेर पडले ते सहृदय मनुष्याच्या कानावर पडले असता त्याच्या भक्तिरसाला भरती आल्यावाचून राहणार नाहीं तिनें रचिलेल्या हरिश्चंद्राख्यान, प्रल्हादचरित्र, कृष्णजन्म, बालक्रीडा वगैरे काव्यांत भक्तिरस पूर्णपणें भरलेला आहे. 'थालीपाक' नांवाचा तिचा ग्रंथ फार उत्कृष्ट आहे श्रीज्ञानेश्वर महाराज व नामदेव यांचा संवाद चालू असतां नामदेवानें आपला ' गुरूपानुभव ' पुढील अभंगांत निवेदित केला, तो ऐकून श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या नेत्रांतून प्रेमाश्रु वाहूं लागले असें म्हणतात --

नामसंकीर्तन [illegible] । [illegible] ॥१॥
नमन [illegible] । [illegible] ॥२॥
[illegible] । [illegible] ॥३॥
[illegible] । [illegible] ॥४॥
[illegible] । [illegible] ॥५॥
[illegible] । [illegible] ॥६॥
[illegible] । [illegible] ॥७॥

एकदम व्हावी हें एक ईश्वरी सूत्र समजलें पाहिजे. सनातन हिंदु धर्माचे अभिमानी श्रीज्ञानेश्वरमहाराज, नामदेव वगैरे संतकवि, व महानुभावपंथीय ग्रंथकार व कवि, या सर्वांचा भागवतधर्माचा प्रसार करणें हा सर्वसाधारण हेतु होता. बहुजन समाजांत अध्यात्मिकज्ञानाचा फैलाव त्यांच्या नेहमींच्या बोलण्याच्या भाषेंत करून परमेश्वरासंबंधानें त्यांच्या मनांत प्रेम उत्पन्न करावें असा या सर्वांच्या लिखाणांचा रोख होता असें दिसतें. रामदेवराव जाधव व हेमाद्रि हे कालवश झाल्यास सुमारें ६०० वर्षे होऊन गेलीं; परंतु मराठी भाषेच्या अभिवृद्धीसाठीं त्यांनीं जे प्रयत्न केले त्यामुळें मराठी भाषा अस्तित्वांत असेपर्यंत त्यांची कीर्ति कायम राहील यांत संदेह नाहीं.



नाशिक-प्रांतांतील तिरश्मि-पर्वताच्या एका गुहेंत सांपडलेल्या लेखावरून असें समजतें कीं, आंध्रभृत्य वंशांतील पुलुमाई राजाच्या कारकीर्दीच्या एकोणिसाव्या वर्षी त्याची आजी ( आईची आई ) व गौतमी–पुत्र सातकर्णी याची आई गौतमी बलश्री हिनें ही गुहा तयार करवून भाद्रायणी पंथाच्या भिक्षु–संघास अर्पण केली होती. हा गौतमी पुत्र सातकर्णी राजाचा आजा असून त्याचा अमल असिक, सुराष्ट्र, अपरांत, विदर्भ, अनुपआकरावंति इत्यादि देशावर होता.

कालिदासानें आपल्या रघुवंशांत रघूच्या दिग्विजयाचें वर्णन करितांना अपरांताच्या राजांनीं रघूस करभार दिल्याचें म्हटलें आहे. जुनागड येथील रुद्रदामन याच्या वेळचा एक शिलालेख सांपडला आहे त्यांतहि अपरांताचा उल्लेख आहे. सूर्पारक ( हल्लींचें सोपारें ) येथें ठाणें शहरापासून सुमारें दोन-तीन मैलावर कान्हेरीची लेणीं आहेत; त्यांतील शिलालेखांत अपरांताचा उल्लेख आहे.

या भागास कालांतरानें ' कोंकण ' असें नांव प्राप्त होऊन त्याचे उत्तर व दक्षिण कोंकण असे पोटभाग पडले. सुरतजिल्ह्याच्या दक्षिण हद्दीपासून रत्नागिरी जिल्ह्याची उत्तरहद्द यांच्या दरम्यानचा प्रदेश उत्तर कोंकणांत मोडत असे. रत्नागिरी जिल्ह्याची उत्तर व कारवार जिल्ह्याची दक्षिणहद्द यांतील प्रदेश दक्षिण कोंकणांत मोडत असे. या भागास ' कोंकण ' हें नांव केव्हा व कसें प्राप्त झालें याबद्दल ऐतिहासिक आधार मिळत नाहीं. ख्रिस्ती शकापूर्वी शूर्पारक ( सोपारें ) येथें एका श्रीमंत व्यापाराचा पूर्ण नांवाचा.

दामीपुत्र होता. तेथील मावकागत तो प्रमुख म्हणून गणला ,जात असे. त्यानें बौद्धधर्माची दिक्षा घेतली होती.

कोंकणात बुद्धधर्माचा प्रसार करण्याकरिता गौतमबुद्धानें आपले धर्मप्रचारक ऊर्फ भिक्खु पाठविले होते अशी हकीगत बुद्धधर्मीय एका सूत्रात दिली आहे, कोंकणांतील बऱ्याच लोकास त्यानें बुद्धधर्माची दीक्षा दिली. या सूत्रात दिलेल्या मजकुरावरून अपरांतास कोंकण हें नाव फार प्राचीन कालापासून पडलें होतें असें दिसतें. कान्हेरी येथील गुहेंत एक शिलालेख सापडला आहे त्यात शिलाहार वंशातील पहिला राजा कपर्दी याचा मुलगा पुलकेशी यानें आपणास कोंकणातील मगळपुरीचा अधिपती असें म्हटलें आहे. रघुवंशात ( स. ४ श्लो. ५० ) अपरांताचा उल्लेख असल्याचें वर म्हटलें आहे. या शब्दाची व्याख्या करताना टीकाकार वलभानें त्यास ' कोंकण ' असें दुसरें नाव दिलें आहे. हा वलभ हेमाद्रीच्या पूर्वी होऊन गेला असें विद्वानांचें मत आहे.

कोंकणच्या किनाऱ्यावर पुरी, शुर्पारक, श्रीस्थानक ( हल्लींचे ठाणे ) वसई, चौल या नावाची बंदरें असून या बंदरांवरून ईजिप्त (मिसर देश) अरबस्तान, इराण, ग्रीस वगैरे देशातील लोकांचे व्यापारी दळणवळण होतें, अशाबद्दल पारशी व ग्रीक लोकांचे ग्रंथात भरपूर पुरावा आहे. ग्रीस व अरबस्तान येथील काही प्रमुख व्यापाऱ्यांनी आपलें कायमचे स्थान ठाणें व सोपारें येथें केल्याचा उल्लेख सदरील ग्रंथात आढळतो. टॉलेमी नामक भूगोलशास्त्रज्ञाच्या वेळीं ( इ. स. १३५-१५० ) ग्रीक लोकानां हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील दुसऱ्या कोणत्याहि भागापेक्षा कोंकण प्रांताची जास्त

माहिती होती असें दिसतें. ग्रीक लोकांचा चौल बंदरानजीक फार मोठा व्यापार होता त्यावरून टॉलेमी यानें पश्चिम-हिंदुस्थाना संबंधीं बरीच माहिती मिळविली होती असे दिसतें त्यानें हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्याचे चार भाग केले होते ते असे :–सुराष्ट्रेने, लारिके, आरियेके व दामुरिके, पैकीं पहिल्या भागांत कच्छ, काठेवाड, व उत्तरगुजराथप्रांत यांचा समावेश केला जात होता, दुसऱ्यांत लाटदेश ऊर्फ दक्षिणगुजराथप्रांत याचा समावेश केला जात होता टॉलेमीच्या ग्रंथांत वर्णन सोपारें, चाल, नाशिक पैठण वगैरे व्यापारी शहरांचीं वर्णनें दिलीं आहेत. याशिवाय ठाणें जिल्ह्यांतल्या सात स्थळांचीं नांवें दिलीं आहेत, ती येणेंप्रमाणें –नवसारी, गोरे, भिवंडी तालुक्यांतील टुगाड, वसईच्या खाडी नजीकचें भाईंदर, चौल, महाडनजवळचें पाल व कुलाबा जिल्ह्यांतलें घोडेगांव या बंदरांतून परदेशांना माल हिंदुस्थानांतील सर्व भागांत जात असे म्हणून व्यापारीदृष्ट्या हिंदुस्थानचा पश्चिम किनारा परदेशच्या लोकांना फार महत्वाचा वाटत असे प्रस्तुत काळींही, मुंबई, कराची वगैरे बंदरांमुळें या किनाऱ्याचें महत्व अद्याप कायम आहे

कोंकण प्रांतावर इ स ४ थ्या शतकापर्यंत आभीर राजांचा अमल होता त्यानंतर गुप्तराजे यांचा अमल काही काळ पर्यंत होता गुप्त राजानंतर राष्ट्रकूटानें कोंकणावर आधिपत्य केलें नाशिक जिल्ह्यांतील बागलाण, व सातारा जिल्ह्यांतील कऱ्हाड, या दोन ठिकाणीं सापडलेल्या ताम्रपटावरून राष्ट्रकूट वंशांतील कृष्णराजा हा इ स ३७० पासून इ स ४०० पर्यंत कोंकणावर राज्य करीत होता असें दिसतें त्यानंतर इ स सहाव्या शतकांत मौर्यवंशीय राजाचा

कोंकणावर अमल होता. चालुक्यवंशीय राजा कीर्तिवर्मा ह्यानें इ. स. ५६७ ते ५९१ चे दरम्यान उत्तर कोंकणावर स्वारी करून मौर्यांचा पराभव केला. त्याचा मुलगा पुलकेशी यानें कोंकण प्रातावर पुन्हा स्वारी करून मौर्यांचें उचाटण केलें व तो प्रांत पुन्हा काबीज केला. या पुलकेशीनें आपल्या पराक्रमाच्या जोरावर माळवा, गुजराथ कनोज व वनवासी हे प्रांत आपल्या अमलाखालीं आणिले. इ. स. ८१० पर्यंत चालुक्यवंशीय राजाचा अमल कोंकणावर होता. उत्तर कोंकणावर शिलाहारवंशीय राजाचा अमल शके ७३२ (इ. स. ८१०) वर्षी सुरू झाल्याबद्दल पुरावा मिळतो. या शिलाहार वंशाच्या तीन शाखा होत्या, पैकीं मुख्य शाखा कऱ्हाड, कोल्हापूर येथें असून दुसरी कोंकणातील वनवासी येथें होती, व तिसरी उत्तर कोंकणांतील पुरी (जंजिऱ्या नजिकची दंडा–राज–पुरी) येथें होती. या तीनही शाखांचें मूळ ठिकाण टगर (हल्लींचें जुन्नर) नावाचें शहर होतें. कारण तीनही शाखेच्या राजाचे बिरुदावलींत तगरपुरवराधीश्वर हे बिरुद सर्वसाधारण आहे. रामदेवराव जाधवाचा चुलता महादेवराय यानें उत्तर कोंकणावरील शिलाहाराची सत्ता शके ११८८ चे सुमारास नष्ट केली, तोंपर्यंत या प्रांतावर शके ७३२ (इ. स. ८१०) पासून शके ११८८ (इ. स. १२६६) पर्यंत सुमारें साडेचारशें वर्षे त्याचा अमल अव्याहत चालू होता, ही गोष्ट त्या वंशाची संपूर्ण वंशावळ पुढें दिली आहे तिजवरून व तत्कालीन ताम्रपट व शिलालेख याजवरून सिद्ध होते.

## उत्तर कोंकणांतील शिलाहारवंशीय राजांची वंशावळ.

१ कपर्दि

२ पुल्लशक्ति

३ दुसरा कपर्दि ऊर्फ लघुकपर्दि ( शके ७६५–७९९ )

४ वप्पुवन्न

५ झंझ ( इ. स. ९१६ ) — लक्ष्मियव्वा कन्या ( हिचा चांदर येथील यादव वंशीय राजा भिल्लम यान्याशी विवाह झाला होता )

६ गोग्गि

७ वज्जडदेव ( वज्रदेव )

८ अपराजित (शके ९१९)

९ दुसरा वज्जडदेव ( वज्रदेव )

१० अरिकेसरी (शके ९३९)

११ छित्तराज (शके ९४८)

१२ नागार्जुन

१३ मुम्मुणि (शके ९८२)

१४ अनंतदेव (शके १००३–१०१६)

१५ अपरादित्य (शके १०६०)

१६ हरिपालदेव (शके १०७१, १०७२, १०७५)

१७ मल्लिकार्जुन (शक १०७८ व १०८२)

१८ दुसरा अपरादित्य (शके ११०६ व ११०९)

१९ केशिदेव ( शके ११३५ व ११६१ )

२० सोमेश्वर ( शक ११७१ व ११८२ )

| | |
|---|---|
| १३ मुम्मुनी ( शके ९८२ ) ( इ. स. १०६० ) | ... अंबरनाथचा शिलालेख. |
| १४ अनंत देव ... ( शके १००३–१०१६ ) | ... व्याहाड ( विहार ) येथील ताम्रपट शके १००३ मधील ताम्रपटांतील गांव हे गांव अस्तित्वांत नसून त्या ठिकाणीं तलाव बांधला आहे व त्याचें पाणी मुंबई शहरास पुरविलें जातें. खारेपाटणचा ताम्रपट (संस्थान भांडार शके १०१६ ) या ताम्रपटाचें कै. न्यायमूर्ति तेलंग यांनीं संशोधन केलें आहे या ताम्रपटा वरून त्याचे राजवटींत घडलेल्या गोष्टींवर प्रकाश पडतो. |
| १५ (पहिला) अपरादित्य (शके १०६० इ. स. ११३८). | ... चांजे ( उरण पेट्यांतील ) येथील शिलालेख कोंकणेश्वर पहिल्या अपरादित्यानें काश्मीर येथील विद्वत्परिषदेस येथून तेजकंठ नांवाचा विद्वान गृहस्थ आपला प्रतिनिधी म्हणून पाठविला होता ( श्रीकंठ चरितांत याबद्दलचा उल्लेख स्पष्ट आहे. ) |
| १६ हरिपालदेव. ... ( शके १०७१ ते १०७५ ) (इ. स. ११४९ ते ११५३) | ... ठाणें व पडघे येथील तीन शिलालेख. ( शिलालेख १०७८ ) |

वरून व त्याच्या शिलालेखावरून शके ९२२ पासून शके ११८८ पर्यंत उत्तरकोंकणावर या राजघराण्याचा अव्याहत अम्मल होता असें दिसून येतें.

या घराण्यातील शेवटचा राजा सोमेश्वर याची कारकीर्द शके ११७१ पासून ११८८ ( इ. स १२४९ पासून १२६६ ) पर्यंत होती. देवगिरीच्या महादेवरायाची कारकीर्द शके ११८२ ( इ स. १२६० ) पासून शके ११९३ ( इ. स १२७१ ) पर्यंत होती या महादेवरायाचें, ' कुकुणेश्वर ' सोमेश्वराबरोबर तुमळ युद्ध झालें व त्यात सोमेश्वराचा पूर्ण पराभव होऊन तो समुद्रात बुडाला असें हेमाद्रिनें या युद्धाचें व्रतखडात चटकदार वर्णन दिलें आहे. उत्तरकोंकणप्रात देवगिरीच्या साम्राज्याचा भाग झाल्यानतर महादेवरायानें त्यावर आपले प्रतिनिधी नेमून तेथील राज्यकारभार चालविला, ही गोष्ट ओवळें येथील ताम्रपटावरून व अंजूरच्या शिलाशासनावरून सिद्ध होते अंजूरच्या शिलाशासनात रामदेवराव जाधवाच्या राजवटीत उत्तरकोंकणचा प्रतिनिधी देवगिरीकडील भारद्वाजगोत्री श्रीकृष्णदेव नावाचा ब्राह्मण होता असें दिसतें

अल्लाउद्दिन खिलजीनें इ. स १२९४ मध्यें देवगिरीवर अचानक छापा घालून रामदेवरावाचा पराभव केला व त्यास दिल्लीच्या बादशहाचें माडलिक म्हणून कबूल करण्यास भाग पाडिलें या धामधूमींत रामदेवरायाचा दुसरा मुलगा बिब उर्फ भीमदेव यानें उत्तरकोंकणची वाट धरिली व त्या प्रातांची राज्यसूत्रें आपले हातीं घेतलीं व देवगिरी व पैठण येथून आपलेबरोबर आणलेल्या ब्राह्मण व क्षत्रिय सरदारांस निरनिराळ्या अधिकाराच्या जागेवर नेमिलें त्यांनी

पुरुषोत्तमपत नायक वाघळे यास सरदेसाई व देशपांडेपणाचें वतन देऊन इतर ब्राह्मणास जोशी उपाध्येपणाच्या वृत्त्या दान दिल्या.

निंबदेवाच्या वेळचे शिलालेख व ताम्रपट प्रत्यक्ष उपलब्ध नाहीत परंतु त्याचे पश्चात् उत्तर कोंकणप्रांत मुसलमानराजाच्या अमला-खालीं गेल्यावर बेदरच्या बादशहाच्या वेळचा शके १३३८ (इ स १४१६) सालचा एक महजर उपलब्ध आहे त्यात निंबदेवाच्या वेळच्या शिलालेखाचा उल्लेख आहे. याखेरीज त्याचे कारकीर्दीबद्दल ऐतिहासिक पुरावा म्हणण्यासारखा नाहीं निंबदेवानें उत्तर कोंकणावर किती वर्षे राज्य केलें व त्याच्या पश्चात् या प्रांताची राज्यसूत्रें कोणाच्या हातीं गेलीं याबद्दल विश्वसनीय हकिकत मिळत नाहीं

उत्तरकोंकणप्रांतावर अनहिल-पट्टण येथील श्रीभोळेभीम अगर भीमदेव यानें शके १०६२ (इ स ११४०) चे सुमारास राज्य केलें असा काहीं ग्रंथात उल्लेख केलेला आढळतो. परंतु भोळेभीम हा चालुक्यवंशीय होता गुजराथच्या इतिहासात त्याच्या कारकीर्दीचे वर्णन दिलें आहे, त्यावरून उत्तर कोंकणात तो केव्हाही आला नव्हता असें दिसून येतें तसेंच पैठण येथें राम या नावाचा एक मांडलिक राजा असून त्यास भीम नावाचा एक मुलगा होता, व त्यानें उत्तर कोंकणावर राज्य केलें अशा आशयाचा काहीं ग्रंथात उल्लेख केलेला आढळतो परंतु या दोन्हीं विधानास इतिहासाचा आधार नाहीं शिवाय वर दिलेला शिलाहार राजाचा इतिहास या विधानास पोषक नाहीं

निंबदेवास केशवदेव अगर प्रतापसिंह या नावाचा मुलगा होता, व त्यानें मरोळ ( साष्टीबेटाच्या उत्तर भागातील अंधेरी व कुर्ले याचे

दरम्यानचा गाव ) नवीन प्रतापपुर नावाची राजधानी स्थापिली असें म्हणतात परंतु दंतकथेशिवाय या विधानास दुसरा आधार नाहीं

रामदेवराव जाधव यास दिल्ली येथे नेऊन त्याजकडून बादशहान काहीं करारमदार करून घेतले याबद्दल फेरिस्तान आपल्या प्रवास वर्णनात पुढील हकीगत दिली आहे रामदेवराव जाधवानें दिल्लीच्या बादशहाचें मांडलिकत्व कबूल केल्यामुळें अल्लाउद्दिन खिल्जीनें देव गिरीचें राज्य त्यास परत दिलें, व त्याच्या राज्याच्या लगत असलेल्या गुजराथप्रांताचा काहीं भाग त्यास तोडून दिला बागलाण नवसारी प्रांत त्यास जातइनाम करून दिला दक्षिणेतील तत्कालीन हिंदु राज्यें जिंकण्याचें कामी रामदेवराव जाधवानें दिल्लीच्या बादशहास पूर्णपणें मदत करावी अशीही शर्त सदरील करारात होती रामदेव राव जाधवानें या सर्व शर्ती मान्य केल्या. दिल्लीहून परत आल्यावर त्यानें नवसारीच्या सुभेदारीच्या जागावर आपला मुलगा भिल्लदेव याची नेमणूक केली ' भानुविजय ' नावाच्या महानुभावीय ग्रंथा तील एक उतारा मागील भागात दिला आहे त्यात रामदेवराव जाध वानें भिल्लदेवास गुजराथेंत पाठविल्याचा स्पष्ट उल्लेख केला आहे, त्यावरून फेरिस्तानें दिलेल्या वरील हकिगतीस दुजोरा मिळतो नव सारी प्रांतावर भिल्लदेवाची सुभेदार म्हणून नेमणूक झाल्यावर त्यानें ठाणें येथें असलेली आपली कचेरी तेथून हालवून अनहिलपट्टण येथें नेली असावी असें दिसतें कारण तेव्हापासून उत्तरकोंकणप्रांत अनहिलवाड्याचा पोटभाग म्हणून समजण्यात येऊ लागला देवगि रीच्या यादवांचें राज्य नष्ट होईपर्यंत उत्तरकोंकणप्रांताचा राज्य कारभार अनहिलपट्टण येथून चालत असावा असें दिसतें गुजराथ

मानाच्या सुभेदारीच्या कामावर असताना तेथील राज्यकारभार चाल-विण्यासाठीं, सिंघदेवानें देवगिरी व पैठण येथून आरल्या विश्वासातील महाराष्ट्रीय ब्राह्मण व क्षत्रिय या वर्गांतील बरीच मडळी नेली असावी असें मानण्यास जागा आहे. देवगिरीचें राज्य नष्ट झाल्यावर गुजराथप्रांत मुसलमानांच्या ताब्यात कायमचा गेला. त्यामुळें या सर्व दक्षिणीमडळीस उत्तरकोंकणात परत येणें भाग पडलें त्यांपैकीं बऱ्याच ब्राह्मण व क्षत्रिय कुळांनीं सुरत वेटान आणि ठाणें व कुलाबा जिल्ह्यात वसाहत केली व या तीनही प्रांतात मदरील ब्राह्मण-कुळातील वंशजाकडे-जोशी उपाध्येपणाच्या वृत्त्या अद्याप चालत आहेत, तसेच मदरील सोमवंशीय क्षत्रिय ज्ञातींत, नाईक, चौधरी, चोघुले, राऊत(रावटे)वगैरे आडनावाचीं कुळें अद्याप आहेत. देवगिरीचे यादवांचे राज्यात ल्फरी खात्यात मोठमोठ्या हुद्याचीं कामें त्यांचेकडे असावी असे त्यांच्या आडनावावरून अनुमान काढण्यास जागा आहे. अर्नाळ्याच्या सोमवंशीय नाईक घराण्यातील ज्या वीर पुरुषांनी वसईप्रांत फिरंग्याकडून हस्तगत करण्याचे कामीं इ. स. १७३९ साली चिमणाजी आप्पास महत्वाची मदत केली, (याबद्दलचा उल्लेख) तिसऱ्या भागात येऊन गेला आहे नाईक घराण्यातील मूळ पुरुष बिंब-देवाबरोबर आलेल्या विधानास पोषक असे कागदपत्र त्यांचे वंशजाकडे आहेत असें समजतें उत्तरकोंकणात व गुजराथेंत जी ब्राह्मण व क्षत्रिय मडळी गेली ती महाराष्ट्रीय होती याबद्दल शका नाहीं इ स.१४१४ (हिजरी८१७)मागचा बेदरच्या बादशहाचा महजर, शके १२२३ चें बिंबदेवानें पुरुषोत्तम श्रीधर कावळे पैठणकर यास दिलेलें दानपत्र, तसेच ओवळें येथील ताम्रपट व अर्नाळ्याचें शिलाशासन, यात

उल्लेखिलेल्या व्यक्तींच्या नावावरून या विधानास दुजोरा मिळतो. देवगिरीचे यादवराजे सोमवंशी होते ही गोष्ट निर्विवाद आहे. **महादेवरायानें** उत्तरकोंकणप्रांत शिलाहारराजाकडून जिंकून घेतल्यानंतर,तेथील राज्यकारभार पाहण्यासाठीं देवगिरीकडील श्रीकृष्णदेव, अच्युत नायक वगैरे विश्वासू अधिकारी पाठविले होते त्याप्रमाणेंच बिंबदेवानें देवगिरीहून उत्तरकोंकणांत जातेवेळीं आपल्याबरोबर आपल्या घराण्याशीं संबंध असलेल्या क्षत्रिय कुळांस व अधिकारी मंडळींस तसेंच धार्मिक कृत्यें करण्यासाठीं आपल्या कुलगुरूंस बरोबर नेलें असल्यास त्यांत कांहीं वावगें नाहीं. या ब्राह्मण व क्षत्रिय मंडळींचे दरम्यान त्यावेळीं असलेले यजमान व पुरोहितपणाचे संबंध त्यांचे वंशजांनीं अद्याप कायम ठेविले आहेत, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

बेदरच्या बादशहा सुलतान अल्लाउद्दिन गाजी ह्याचे वेळचा
महजर शके १३३८ ? (१३३६)-हिजरी ८१९ ? (८१७)-
इ. स. १४१६ ? (१४१४)

हा महजर फारशी भाषेंत असून त्यावर बेदरच्या बादशहाचा शिक्कामोर्तब आहे. शिवाय त्याच्या दोनही बाजूस त्यावेळच्या दरबारी पद्धतिप्रमाणें तत्कालीन काझींचे शिक्के आहेत. महजर म्हणजे खुद्द राजानें अगर त्यानें नेमिलेल्या न्यायाधिशानें दिलेला निकाल. साष्टी बेटाच्या उत्तरभागांत समुद्रकिनाऱ्याच्या नजिक मालाड नांवाचा गांव आहे. त्या गांवच्या सरदेसाई व सरदेशपांडेपणाचें वतन बिंबदेवानें पैठणाहून आपल्याबरोबर आणलेल्या ब्राह्मणांपैकीं पुरुषोत्तमपंत श्रीधर नायक कावळे यास शके १२११ (शके १२३१) मध्यें वैशाख व॥ अमावास्येस सूर्यग्रहणसमयीं दान दिलें होतें. उत्तरकोंकण

प्रांताची राज्यसूत्रें सिंघणदेवाचे हातीं आलीं त्यावेळीं मालाडचें सरदेसमाई व सरदेशपांडेपण गोविंद मिटकरी नावाच्या एका गोवर्धन ब्राह्मणाकडे होतें सदरील गोविंद मिटकरी हा कांहीं कालानंतर दिवंगत झाला त्याच्या पोटीं पुत्रसंतान नव्हतें त्याची विधवा चांगुणाबाई हिला चोविस हजार होन देऊन सिंघणदेवांनीं सदरील वतन विकत घेतलें व वर लिहिल्याप्रमाणें तें पुरुषोत्तमपंत नायक कावळे यास दान दिलें साष्टी व मालाड प्रांतातली दरएक गावच्या उत्पन्नांतून या वतनदारास पन्नास फदे ( तत्कालीन नाणें ) घेण्याचा हक्क असे. या हक्कास पिछोडी असें म्हणत या शिवाय स्थानिक जोशीउपाध्ये पणाचे व मानपानाचे हक्काचाही त्यांत समावेश होत असे हें दानपत्र सिंघणानें त्यावेळच्या पद्धतिप्रमाणें शिळावर कोरविण्याचा व त्या जागोजाग रोंवण्याचा हुकूम केला होता तेव्हांपासून शके १२२६ पर्यंत पुरुषोत्तमपंत कावळ्याच्या वंशजांनीं ह्या वतनाचा निर्वेधपणें उपभोग घेतला असावा असें दिसतें कारण शके १२२७ च्या सुमारास मालाड येथील सोमदेवमले याचा पुत्र देवदेवमल ठाकूर यानें या वतनावर आपला हक्क आहे असा वाद प्रथमच उपस्थित केला कावळे व ठाकूर यांचा तंटा महम० दलील ( दिवाण ) या नावाच्या स्थानिक अधिकाऱ्यापुढें निकालाकरितां गेला त्यानीं दिलेला निकाल उभय पक्षास पसंत न पडल्यामुळें पक्षकारांच्या विनंतीवरून कज्जाचें सर्व कागदपत्र महमद दलील यानें बेदरचा बादशाह सुलतान सुलेमान अल्लाउद्दीनगाझी याजकडे अखेर निकाला करितां पाठविले त्यावेळच्या न्यायपद्धतिप्रमाणें दिवाणी मुकदम्याची चौकशी योग्य रीतीनें व्हावी म्हणून स्थानिक पंचाच्या समक्ष उभय

पक्षकाराचा लेखी व तोंडी पुरावा कोर्टापुढे घेण्यात येत असावा असे दिसते इंग्लंड देशात दिवाणी व फौजदारी मुकदम्यात पंचाच्या सल्ल्याने कोर्ट निकाल करीत असते हिंदुस्थानात काहीं फौजदारी खटल्यात मात्र आरोपीस ज्यूरीची सवलत मिळते बादशहाने स्थानिक पंच जमवून उभयपक्षाकडील लेखी व तोंडी पुरावा घेतला हे वतन बिंबराजाने कावळे याच्या पूर्वजास दान दिले होते सदरील दानपत्र ज्या शिलेवर कोरलेले होते त्या बादशहाने आपल्या पुढे आणवून त्याच्या खरेपणाबद्दल आपली खात्री करून घेतली याप्रमाणे पुढे आलेल्या एकंदर पुराव्याचा विचार करून बादशहाने कावळ्याच्या तर्फे निकाल दिला बिंबदेवाच्या वेळचा दुसरा पुरावा शिलालेख उपलब्ध असल्याचे दिसून येत नाही

या महजरात बिंबदेवाने पुरुषोत्तम कावळे यास, शके १२२१ प्रमाथीसंवत्सरी वैशाख महिन्याच्या अमावास्येस सूर्यग्रहणाची पर्वणी साधून मालाड येथील सरदेसाई व सरदेशपांडेपणाचे वतन दान दिल्याबद्दलचा उल्लेख असून, ते ज्या शिलेवर कोरले होते त्या बादशहाने आपल्या खात्री करिता दरबारात आणविल्या होत्या असे स्पष्ट म्हटले आहे, यावरून सदरील शिलालेखाच्या अस्तित्वाबद्दल शंका घेण्यास जागा उरत नाही परंतु असल शिलालेख उपलब्ध नसल्या-मुळे या बाबतीत संशोधनदृष्ट्या जास्त लिहिता येत नाही

अलिबाग तालुक्यातील नागाव येथील भीमेश्वराच्या देवळात शके १२८० चा हंबीररायाचे वेळचा एक मराठी शिलालेख उपलब्ध आहे. प्रथमाच्या सन १९०५ सालच्या १० व्या अंकात इतिहासाचार्य के. राजवाडे यांनी या शिलालेखाचे मनोरंजक विवेचन

प्रस्तुत ( पिंछोडीच्या दाव्याच्या ) महजराबद्दल पुढें लिहिल्याप्रमाणें आपलें मत दिलें आहे " देवगिरीच्या विंदराजानें शके १२२१ ( शके १२२३ ? ) मध्यें पुरुषोत्तम नायक कावळे यास दिलेलें दानपत्र खरें असून या महजरातील मजकूर त्याच्या खरेपणा बद्दल साक्ष पटवीत आहे हा महजर बेदरचा ब्रहामनी पातशहा अल्लाउद्दीन ( दुसरा ) ह्याच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षी लिहिला गेला हें वर्ष हस सद् व हफ्दह म्हणजे ८१७ हिजरी म्हणजे शके१३३५ व इ स १४१४ होय. ह्यामालीं बेदरच्या पातशहापुढें भीमदेवाचें ( विंदेवाचें ? ) मूळ आज्ञापत्र प्रतिवादीनें माडलें होतें भीमदेव ठाण्याम यादवाची सुभेदारी करीत असता शके १२२१ च्या माघात चागुणाराई मिटकरीण इजकडून देशपांडेपणाचें वतन विकत घेऊन तें एक वर्ष व तीन महिन्यानीं म्हणजे शके १२२३ च्या वैशाखात पुरुषोत्तमपत कावळे गजगुरु यास दान देता झाला पिंछोडीच्या दाव्याच्या महजरात मदरील दानपत्राचा उल्लेख केलेला आहे या महजरात विंदेवाच्या मूळ जुन्या मराठी आज्ञापत्राचें फारशी भाषातर शके १३३५ त केलेलें आहे, व त्यावरोनर मूळ जुन्या मराठी आज्ञापत्राचें मराठी भाषेंत तात्पर्य दिलें आहे या तात्पर्यांत शार्वरी सवत्सराला शक १२२२, व प्लवसवत्सराला शक १२२३, पाहिजे कारण शके १२२२ च्या माघानतर एक वर्ष तीन महिन्यानीं म्हणजे शके १२२३ च्या वैशाखात बिंदराजानें दानपत्र दिलें असें फारशी व मराठी तर्जुम्यात म्हटलें आहे या शकाच्या आकड्यामध्यें चूक होण्याचें कारण फारशी व मराठी भाषातर

कागदाच्याना ज्ञानेश्वरकालीन मूळ जुनें मराठी अक्षर व आकडे नीट न वाचता आल्यामुळें ही गफलत झालेली आहे. ह्याप्रमाणें फारशी भाषांतरांतील फसली सनाच्या आकड्यांतही दुरुस्ती केली पाहिजे. ह्या दुरुस्त्या फार खोल विचार करून करावयाला नको आहेत. वर वर पाहाणाऱ्यालाही त्यांची अवश्यकता दिसेल. हा लेख येणेंप्रमाणें दुरुस्त करून घेतला म्हणजे त्यांतील मजकूर पूर्णपणें विश्वसनीय आहे असें दिसून येतें. प्रस्तुत महजर बेदरचा बाहमनी पातशहा अलाउद्दीन ( दुसरा ) ह्याच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षी लिहिला. हें वर्ष हसमद् व हफ्दह् म्हणजे ८१७ हिजरी ( शके १३३६ ) (इ. स. १४१४) होय. ह्या साली बेदरच्या पातशहापुढें भीमदेवाचें (बिंबदेवानें शके १२२३ चें) मूळ आज्ञापत्र प्रतिवादीनें मांडलें होतें त्यांतील मजकूर प्रस्तुत महजरांत दिला आहे; व तो पूर्णपणें विश्वसनीय आहे. फारशी नक्कल अस्सल बरहुकूम असून त्याचें मराठी रूपांतर मागाहून बऱ्याच वर्षांनीं केलें आहे. त्यामुळें त्यांतील मराठी भाषा यादवकालीन नाहीं. तथापि आंतील मजकुराला धक्का बिलकूल लागलेला नाहीं. ह्या महजरांत बहामनी पातशहा सुलतान सुलेमान अल्लाउद्दीन ( दुसरा ) ह्याच्या कारकीर्दीचें पहिलें वर्ष ८१७ हिजरी होतें असें म्हटलें आहे. ८१७ हिजरी म्हणजे इ. स. १४१४ होय. फेरिस्ता ह्यानें दिलेल्या हकिगती प्रमाणें या दुसऱ्या अल्लाउद्दीनाची कारकीर्द इ. स. १४३५ त सुरू झाली. या दोन सनांत एकवीस २१ वर्षांचा फरक पडतो यावरून महजराच्या खरेपणाबद्दल कांहीं विद्वान लोकांनी शंका प्रदर्शित केली आहे. परंतु फेरिस्तानें अल्लाउद्दीनाच्या कारकीर्दीच्या सुरवातीचें

साल ( इ. स १४३५ ) दिलें आहे त्याबद्दल मुसलमान इतिहास लेखकांत अद्याप एकमत नाहीं दुर्गादेवीच्या दुष्काळाच्या फर्मांना-सबधानें लिहिताना फेरिस्तानें असाच त हेची चूक केली आहे या एकंदर निवेचनावरून पिठोंडीच्या दाव्याचा महजर पूर्णपणे विश्वसनीय आहे ''

बिंबदेवानें पुरषोत्तम नायक कावळे यास वैशाख व० ३० स प्लव नाम सवत्सर शके १२२१ सूर्यग्रहणीं जें दानपत्र दिलें आहे त्यातील शक चुकीचा आहे यात शका नाहीं कारण प्लवनाम सवत्सर वास्तविक शके १२२३ मालीं होतें व त्या वर्षाच्या वैशाख वा॥ ३० स उत्तर कोंकणात ग्रहण होतें ही गोष्ट ज्योतिर्गणितावरूनहि स्पष्ट दिसतें यावरून इतिहासाचार्य कै० राजवाडे यानी या दानपत्राच्या शका-सबधीं घेतलेला आक्षेप बरोबर आहे असें दिसतें बिंबदेवानें दिलेलें सदरील दानपत्र मुळात पाहावयास न मिळाल्यामुळें ते संस्कृत अगर मराठींत होते हे समजण्यास मार्ग नाहीं त्यातील मजकूर ज्ञानेश्वरकालीन जुन्या मराठींत होता असें क राजवाड्यानीं कोणत्या आधारावरून म्हटलें आहे तें समजत नाहीं

यादवकालीन बहुतेक शिलालेख व ताम्रपट संस्कृत व कानडी भाषेत आहेत तेव्हा सबल पुराव्याच्या अभावी सदरील दानपत्र मराठींत कोरलें गेलें होतें असें म्हणणें वाजवी होणार नाहीं

सदरील महजर ( निवाडा ) ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्वाचा आहे बिंबदेवानें ज्या पुरुषोत्तम नायक पैठणकरास माराडचें सरदेसाईपण व सरदेशपाडेपण दिलें त्याचें नाव पढरपूरच्या देवळाच्या जीर्णोद्धारासाठी ज्या दानशूर गृहस्थानी देणग्या दिल्या त्याच्या

यादींत आढळतें. पंढरपूरचें नायक घराणें हें प्रतिष्ठित व सुसंपन्न होतें. सदरील यादींत गंगाधर नायक, गणपती नायक, सिध नायक, श्रीपती नायक, पुरुषोत्तम नायक यांची नांवें आढळतात. त्यांपैकीं गंगाधर नायकानें एकापेक्षा अधिक वेळा देणग्या दिल्याचें आढळून येतें. पंढरपूरच्या देवळाचें जीर्णोद्धाराचें काम शके ११९५ पासून शके १२०० पर्यंत चालू होतें. चिंचदेवाचें दानपत्राचा शक १२२३ आहे. यावरून या दानपत्रात नमूद केलेला पुरुषोत्तम नायक हा वरील नायक घराण्यांपैकींच असावा असें दिसतें. चिंचदेवाचे दानपत्रात कर्णीक शंकर प्रभू व कर्णीक देवदास प्रभू यांची नांवें आढळतात. पंढरपूर येथील श्रीविठ्ठलमंदिराचे जीर्णोद्धाराचे मदतीसाठीं तत्कालीन ज्या उदार पुरुषांनी देणग्या दिल्या त्यांची यादी पंढरपूरच्या शिलालेखात दिली आहे. त्यांत कर्णिक घराण्यातील पुरुषांची नांवें आढळतात. यावरून रामदेवराव जाधवांचे राजवटींत ' कर्णिक ' घराणें सुसंपन्न असून राजदरबारांत सदरील घराण्यातील पुरुषांचें वजन असावें असें दिसतें. देणगी देणाऱ्यांच्या यादींत, देवगिरीचे यादवराजे, महादेवराव व रामदेवराव व त्यांचा करणाधिप आमचा चरित्रनायक हेमाद्रि यांची नांवें प्रामुख्यानें नमूद करण्यांत आलीं आहेत वगैरे हकीगत पूर्वी येऊन गेली आहे. वरील विवेचनावरून चिंचदेवानें उत्तरकोंकणात येनेवेळी आपलेवरोवर देवगिरी व पैठणकडील महाराष्ट्रीय मंडळी आणली होती या विधानास पुष्टि मिळते. या महजरावरून शके १३३८ मार्गी उत्तरकोंकणप्रांत मुसल्मानांच्या अमलाखालीं होता असें दिसतें.

हा महजर इ. स. १४१४ मध्यें ( हिजरी सन ८१७ ) बेदरचा पातशहा सुलतान महंमद गाझी याचे दिला असें म्हटलें आहे,

परंतु त्या साली बेदरचे गादीवर अल्लाउद्दीनशहा बहामनी ( दुसरा ) हा होता व त्याचे पश्चात् इ. स १४३४ (हिजरी सन ८३८) मध्यें सुलतान अहमद गाझी हा बेदरच्या गादीवर बसला. यावरून ह्या महजराच्या खरेपणाबद्दल कांहीं विद्वान गृहस्थांनीं आक्षेप घेतले आहेत. परंतु बहामनी वंशांतील वेगवेगळ्या पुरुषांनीं दक्षिणेंत जीं निरनिराळीं राज्यें स्थापन केलीं त्यांचा समग्र व खराखुरा इतिहास आजपर्यंत कोणी लिहिण्याचा प्रयत्न केला नाहीं मुसलमानी बखर कारामध्ये एकाच प्रसंगाबद्दल दिलेल्या हकीकतींत बरीच तफावत दिसून येते. अशापरिस्थितींत महजराच्या सालांत चूक आहे इतक्याच कारणावरून इतर पुराव्याच्या अभावीं तो बनावट आहे असें म्हणणें वाजवी होणार नाहीं.

अहमदशहा बहामनी ( दुसरा ) हा बेदरचे गादीवर असतांना उत्तरकोंकणप्रांताच्या सुभेदारीचें काम अल्लाउद्दीन गाझी ह्यांचे-कडे असावें असें दिसतें. व त्यानें बेदरच्या तक्तनशीन बादशहाच्या तर्फे निकाल दिला असल्यास अशी चूक होण्याचा संभव आहे अगर मूळ हुकूमाची नक्कल करणाऱ्यानें, हिजरी सन ८३८ ऐवजी नजरचुकीनें ८१७ हा आंकडा घातला असल्यास नकळे! बहामनी राज्याचा विश्वसनीय इतिहास बाहेर येईपर्यंत या वादग्रस्त मुद्याचा कायमचा निकाल लागणें शक्य नाहीं दुसरा आक्षेप असा आहे कीं, शके १२२१ सालीं प्रव संवत्सर नसून त्या सालच्या वैशाख वद्य ३० स सूर्यग्रहण उत्तरकोंकणांत नव्हतें परंतु इतिहासाचार्य राजवाडे ह्यांनीं ह्या आक्षेपाचें निरसन केलें आहे शिलालेखातील भाषा व मजकूर बरोबर न समजल्यामुळें

शके १२२३ च्या ऐवजी १२२१ असा आंकडा नजरचुकीनें पडला असला पाहिजे. कारण शके १२२१ सालीं वृष संवत्सर नसतांना तें शिलालेखांत लिहिण्याची ढोबळ चूक कोणताही हिंदुराजा करणार नाहीं. शिवाय ज्योतिर्गणितशास्त्रावरून शके १२२३ न वृषसंवत्सर असून त्या सालच्या वैशाख व॥ ३० रोजीं उत्तरकोंकणांत सूर्य ग्रहण होतें असें स्पष्ट दिसतें. मूळ फारसी महजरांत फसली सनाचा नामनिर्देश नसतांना त्याच्या इंग्रजी तर्जुम्यांत फसली सन दिला आहे, ही भाषांतरकाराची चूक आहे. शहाजहान बादशहाच्या कारकीर्दीपर्यंत दक्षिणेंत फसली सन प्रचारांत आला नव्हता, यामुळें अस्सल महजरांत फसली सनाचा निर्देश जबाबदार अधिकाऱ्यांकडून केव्हांहि करण्यांत आला नसता, ही गोष्ट निर्विवाद होय.

या महजरावरून पेंठणकर कावळे व मालाडचे देसले यांचे दरम्यान पिछोडीच्या हक्कासंबंधानें जो तंटा चालला होता त्याचा निकाल लागला आहे. या हक्काचा नागमोल कोर्टापुढें आणलेल्या शिलावर कोरलेला होता, त्यावरून तो महजरात उतरून घेतला असावा असें दिसतें. सदरहू तपशिलावरून तत्कालीन सामाजिक स्थिती वर थोडा प्रकाश पडतो म्हणून तो पुढें देण्यांत येत आहे.

1. [illegible]
देत असावा ( [illegible] पानें ३१ व [illegible] ५ )
2. [illegible] "[illegible]" [illegible]
"[illegible]"
3. [illegible]

व पन्नास पानांचा ' विडा ' वाजतगाजत पुरुषोत्तमपन्ताकडेस पाठवावा.

४. प्रत्येक गांवाच्या उत्पन्नांतून ' सरदेसाईपणाचे ' रुपये तीन, व ' सरदेशपाण्डेगिरीचे ' रुपये दोन, मिळून रुपये पांच (दरसोंकडा) पुरुषोत्तमपंतास देत जावे.

५. कोणाकडेस लग्नकार्यसम्बन्धी मण्डप घातल्यास ' मण्डवटका ' पुरुषोत्तमपंतास द्यावा. म्हणजे तन्निमित्त दोन पसे देत जावे

६ बहिष्कारनिमित्त प्रायश्चित देऊन कोणास शुद्ध करणे असल्यास प्रत्येक ' प्रायश्चित्ताचे ' द्रव्यांतून द्यावा किंवा पुरुषोत्तम-पन्तास द्यावा.

७ हव्य कव्यादि प्रत्येक कार्यांत प्रथम ' टिळा ' व ( सन्मान प्रीत्यर्थ ) ' विडा ' पुरुषोत्तमपन्तास द्यावा.

८ लग्नकार्यसम्बन्धी ' घटिकापाट ' पुरुषोत्तमपंतास देत असावा

९. प्रत्येक गावातून दोन ' विघे जमीन ' सरकारच्या करांपासून, पुरुषोत्तमपन्तास माफ असावी.

१०. प्रत्येक परगण्यातून सरकारच्याकरापासून माफ असा ' एक गांव ' पुरुषोत्तमपन्तास इनाम द्यावा.

११. वरील चौदा परगण्यातील गावातून दर बिघ्यास सरदेसाईपणाच्या हक्काबद्दल व सरदेशपाण्डेगिरीच्या हक्काबद्दल ' चार चार पायली भात,' असे पुरुषोत्तमपन्तास देत असावे.

१२. अष्टाधिकारांपैकी जे सरकारचे कर असतील ते सर्व पुरुषोत्तम-पन्तास माफ असावे.

वरील तपशिलावरून ६०० शे वर्षांपूर्वी उत्तर कोकणांत सरदेसाई । सरदेशपांडेपणाचें वतनांत कोणकोणत्या हक्काचा समावेश होत असे ह्याची कल्पना होते. स्थानिक विडा, टिळा वगैरे मानपानाचें

हक्काखेरीज, लग्नकार्यांत घटकापात्रिका घालण्याचा व बहिष्कृत इसमास प्रायश्चित देऊन शुद्ध करण्याचा वगैरे धार्मिक हक्काचाही त्यात समावेश होतो असें दिसतें. वरील तपशीलात पिच्छोडी या शब्दाचा उपयोग केला आहे. हा शब्द मराठी अगर गुजराथी नसून मूळ हिंदी भाषेतला आहे. हिंदी भाषेच्या कोशांत पिछौडा म्हणजे पासोडी ( अंगावर घेण्याचें उपवस्त्र ) व पिच्छोडी म्हणजे पासोडी असा या शब्दाचा अर्थ दिला आहे. प्रत्येक गावातून सरदेशपांडे यास एक पिच्छोडी अगर तिच्या ऐवजीं पन्नास रोकड रुपये घेण्याचा हक्क होता. यावरून उत्तर कोंकणात पासोडी घेण्याचा हक्क ६०० ते वर्षांपूर्वी अमलात होता असें दिसतें.

पासोडीचा हक्क घेण्याची वहिवाट महाराष्ट्रात फार वर्षे चालत आहे. याबद्दलचा उल्लेख "**मावजी व पारसनीस**" यांनी प्रसिद्ध केलेल्या 'पेशव्यांच्या दफ्तरांतील वतनपत्रें व निवाडपत्रें' या पुस्तकात आढळून येतो. सदरील पुस्तकात मावळ प्रांतातील मौजे गहुंजे येथील कृष्णाजी बिन नरसोजी बोडका मोकदम यास मौजे नवपुरचे मोकदमीचे वतन दिल्याबद्दलचें वृत्तिपत्र ( नं. ९ ) छापलें आहे. * सदरील वृत्तिपत्रात पासोडी घेण्याच्या हक्काचा उल्लेख केला आहे त्याचा तपशील येणेंप्रमाणें.---

---

* मावजी व पारसनीस [illegible]
[illegible] पा. ४०-४०

| तुजकडे मान नितपशील आर्धी | ग्गिर्जी व नावाजी याजकडे मान नितपशील माग |
|---|---|
| १ नागर | १ हागाचा पोळी |
| १ दसरीयाचा मान | १ स्पवाळीचा मान |
| १ गराळगार | १ गारीचा गान |
| १ पागाडी निम | १ पगाडा निम. |
| १ गावन्याची वारी निम | १ म्यावऱ्याची वारी निम |
| १ तर्थ फ आर्धी | १ तथ फ माग |
| १ विडा आर्धा | १ विडा |
| १ चाभारापासून पायतान नग | १ चाभाराकडून पायपाग |
| १ कार्तीयाचा माळ आर्धी | १ मंग घर आर्ध |
| १ म्हग घर पाल्क | १ फागवाचा मार्गी नाग |
| १० | १० |

तसेच हिरोजी बिन शिवाजी बिन भिकाजी टगुळकर मोकदम मौजे कामथडी तर्फ खेडे बारे प्रांत याम दिलेल्या वतनपत्रात मजकूर आहे तो येणप्रमाणे —

मौजे मजकूरच्या पाटिलकिच्या वतनाची सेवा दटक प्रमाण करणे नाण वतन संबधी हक्क लाजी मानपान इनाम पासोडी याने उत्पन्न काळी व पाढरीचे सुदामतप्रमाण पुत्र पोत्रादि वंशपरंपरेने अनभवून सुखरूप राहणे + याशिवाय "पि छोडी" हा शब्द पुष्कळ जुन्या सनदात व हक्काच कागदात येतो त्याचा अर्थ वस्त्र जमा असून वतनदाराच्या कुटुंबाच्या निर्वाहाकरिता दिलेले वेतन असावे त्याचा

+ टीप - राजवाडे खं १ ( मराठ्यांच्या इतिहासाची साधने )

आला आहे सदरील शिलालेख ठाणे-कोंकणचा राजा हंबीरराव यांचे वेळचा असून तो आपणास " श्रीमत्प्रौढिप्रतापचक्रवर्ति महाराजाधिराज" म्हणवीत होता असें त्यावरून दिसतें सदरील शिलालेखावर शालिवाहन शकाबरोबर हिजरी सन दिला आहे व त्याचा प्रधान सिहिप्रो नावाचा मुसलमान होता असें म्हटलें आहे. शके १२८० मध्यें उत्तरकोंकणात मुसलमानी राज्याचा जम बसला नव्हता असें असता आपणास "प्रौढिप्रतापचक्रवर्ति" म्हणविणारा कोणता स्वाभिमानी हिंदुराजा आपले शिलाशासनावर मुसल्मानी सन लिहील ? तसेंच त्यावेळीं दिवाणगिरीची कामें करण्यास हिंदू लोकामध्यें कर्तबगार माणसाचा तुटवडा होता अशा तऱ्हेचा उल्लेख कोठेंही आढळून येत नाहीं यादवकालीन शिलालेख व ताम्रपट संस्कृत अगर कानडी भाषेंत आहेत यादवाच्या शिलाशासनातील काहीं बिरुदापैकीं एक बिरुद या शिलालेखात दिलें आहे, यावरून हंबिरराव हा इतर पुराव्याच्या अभावी देवगिरीच्या यादवराजघराण्यापैकीं असला पाहिजे हे विधान इतिहास व युक्तिवाद यास धरून नाहीं मुसलमानासबधानें हिंदूच्या मनामध्यें अत्यत चीड होती अशा वेळीं हिजरी सन दक्षिणेंत सुरू होण्यापूर्वी त्यास सदरील शिलालेखात प्राधान्य दिलें आहे ही गोष्ट फार चमत्कारिक दिसते के राजवाडे यानीं शिलालेखाचें संशोधन करिताना त्याचा खरेपणा प्रस्थापित करण्याविषयीं जीं कारणें दिलीं आहेत तीं अपुरी असून संशोधकाना निरुत्तर पटण्यासारखीं नाहींत

नागाव हा गाव अष्टागरात असून त्या प्रातात चौल हें व्यापाराचें एक मोठें बदर होतें त्या ठिकाणीं ईजिप्त, अरबस्तान, इराण वगैरे देशातील पुष्कळ लोक व्यापाराकरिता येत असत व पुष्कळ अरब लोक

त्याठिकाणी स्थाईक रहिवासी झाले होते. काहीं अरबी व्यापाऱ्यांनीं तत्कालीन भारतीय प्रथाची आरबी भाषेंत रूपांतरें करून आपले देशांत नेल्याचा उल्लेख मुसलमानी तवारिखांतून केलेला आढळतो. उत्तरकोंकणांतील चक्रवर्ति हिंदुराजाच्या प्रधानाचें पद एखाद्या मुसलमान गृहस्थास मिळालें असतें तर मुसलमानी तवारिखांतून त्याबद्दल गौरवपूर्वक निर्देश करण्यात आला असता. पण एकंदर परिस्थितीवरून या शिलालेखाच्या खरेपणाबद्दल जबरदस्त शंका येते असें मोठ्या दिलगिरीनें म्हणावें लागतें. इ. स. १९१२ सालीं प्रसिद्ध झालेल्या महिकावतीच्या बखरीस इतिहासाचार्य राजवाडे यांनीं प्रस्तावना लिहिली आहे, त्यांतहीं शके १२८९ सालीं उत्तर-कोंकणांत हंबीरराव नांवाचा राजा होता, अशाबद्दल बिलकुल उल्लेख नाही. यावरूनही हा शिलालेख खरा नाहीं ही गोष्ट सिद्ध होतें.

प्रस्तुत शिलालेखांतील अपभ्रष्ट संस्कृत भाषेचा नमुना पुढें दिला आहे:--

"श्रीमत्य प्रौढिप्रतापचक्रवर्ति महाराजाधिराज हंबीरु राओ ठाणें कोंकणराज्यं क्रोति सत्येतस्मिन् काळे प्रवर्तमानें धरमादिपत्र लिखितं यथा सर्वव्यापारिसिंहिप्रो तंनिरोपित अठागर अधिकारिआ कुसना अहासण नाकाचा सणवै देऊ प्रोप्होन्हवेळितः

सदरील शिलालेखांतील मजकुराचा चांगला बोध होत नाहीं. श्रीरायाचा प्रधानु म्हणजे हंबीररावाचा प्रधान ह्यानें तेथील मोठा व्यापारी सिहिप्रो यांस मोठमोठी झाडें ज्यांत आहेत अशी वाडी विकली असावी व त्याकामीं अष्टागरांतील आगऱ्यांनीं त्यास उपद्रव करूं नये असा धरमु ( धर्म ) या धरमपत्रांत नमूद केला असावा

असें दिसतें. या धरमपत्रांतील साक्षीदारांत 'नागदेऊ भाई दार्युम्सदे शेटि' व नागांवच्या जमातींपैकीं पैगु महामद्र दाउवार आया राजि दाउवार आया असे साक्षीदार आहेत. पहिलें नांव पारशी गृहस्थाचें असावें. दुसरें महामद्र ( मुसलमान ) अरबी गृहस्थाचें असावें.

शके १२८९ च्या सुमारास पारशांची वसाहत नागांव येथें असल्याचा कोठें उल्लेख नाहीं. दुसरा इसम मुसलमान अरब असावा. त्यास महामद्र अशा नांवानें संबोधिलें आहे. हंबीरराव हा कदाचित् चौल प्रांताकडील आगरी लोकांचा सरदार असल्यास न कळे? परंतु याकामीं संशोधन झाल्याबांचून हा शिलालेख खरा आहे असें म्हणणें रास्त होणार नाहीं. तसेंच या शिलालेखांत उल्लेखिलेला हंबीरराओ ( राव ) देवगिरीच्या यादव कुळांतील होता असें म्हणणें ऐतिहासिकदृष्ट्या बरोबर नाहीं.

देवगिरीचे बिंबदेवाचा उत्तरकोंकणप्रांतावर अम्मल होता असें दाखविणारे दोन ग्रंथ आमचे पाहण्यांत आले आहेत. पैकीं बिंबाख्यान नावाचें पुस्तक रघुनाथ पुतळाजी राणे यांनीं इ. स. १८७७ सालीं छापून प्रसिद्ध केलें. या पुस्तकाच्या प्रति अद्याप बऱ्याच ठिकाणीं उपलब्ध आहेत. हाच ग्रंथ महिकावतीची ऊर्फ माहिमची बखर या नावानें कल्याण येथील आमचे मित्र श्रीयुत सदाशिव महादेव दिवेकर यांनीं इतिहासाचार्य कै. राजवाडे यांचे प्रस्तावनेसह इ. स. १९१४ मध्यें छापून प्रसिद्ध केला. बिंबाख्यान ऊर्फ महिकावतीची बखर प्रथम उजेडांत आणण्याचें श्रेय रघुनाथ पुतळाजी राणे यांस देणें वाजवी आहे. के. राजवाडे ह्यांस या ग्रंथाची माहिती होती

असें त्यानीं आपल्या प्रस्तुत बखरीच्या प्रस्तावनेंत कबूल केलें आहे. असें असून "या बखरीचा पत्ता आजपर्यंत नव्हता, व नापत्ता असलेल्या या इतिहासप्रांताचा आड येणारा पडदा प्रस्तुत बखरीच्या प्रकाशनानें दूर सारला जावा, व इतिहास रंगभूमीवरील एक अज्ञात चित्रपट खुला होत आहे तें पाहून सहृदय वाचक बखरीचा पत्ता लावणाऱ्या व ती हस्तगत करणाऱ्या दिवेकराना दुवा देतील" अशा आशयाचें राजवाडे यानीं सदरील बखरीचे प्रस्तावनेंत दिलेलें मत ऐतिहासिक सत्यास धरून नाहीं. तसेंच "आजपर्यंत सापडलेल्या सर्व बखरींत आपण प्रसिद्ध करीत असलेली महिकावतीची बखर सर्वांत जुनाट आहे" असें सदरील बखरीच्या प्रस्तावनेंत कै. राजवाडे यानी विधान केलें आहे त्यासही कांहींएक आधार दिला नाहीं. राणे याच्या बिंबाख्यानात अथवा महिकावतीच्या बखरींत देवगिरीच्या यादवराजाची अगर बिंबदेवाची ऐतिहासिक माहिती मिळेल अशी कोणाची अपेक्षा असेल तर ती व्यर्थ आहे, ही गोष्ट पुढील विवेचनावरून वाचकाच्या सहज ध्यानात येईल.

या ग्रंथात पौराणिककालातील दशावताराचे उत्पत्तिपासून उत्तरकोंकणात फिरंग्याचा अम्मल सुरू होईपर्यंत हजारों वर्षांची हकीकत वेगवेगळाल्या लेखकानीं गोंवण्याचा प्रयत्न केला आहे.

भगवान् दत्तानें व केशवाचार्यानें देवगिरीच्या यादव घराण्याच्या ज्या दोन वेगवेगळ्या वंशावळी या बखरींत दिल्या आहेत त्या, प्रस्तुत पुस्तकाच्या तिसऱ्या भागाच्या शेवटीं दिलेल्या कोणत्याही वंशावळींशीं जुळत नाहीत. महिकावतीच्या बखरींतील पृ. ७३-७४ मध्यें भगवान् दत्तानें वंशावळ दिली आहे ती येणेंप्रमाणें —


सूर्यवंश.
सविता
आजानबाहु
गंगाधर
श्रीधर
१ नइनंदन
२ सुदिमन्य ( ४००० दिवस राज्य )
३ भावतानगु ( तीन संवत्सर )
४ भद्रसेन
रघुतम
५ महासिद्धि ( ३०२२ दिवस राज्य )
६ ०
७ विजयावश ( एकोणीस संवत्सर )
८ सोमप्रभु (वीस संवत्सर, बारामास, चार दिवस)
९ कृष्णदेव
१० रघुपति ( पंधराशत-संवत्सर )
११ रघुपतिकुमर (१० वर्षे, ७ मास, ६ दिवस)
१२ कमलादीन ( १८०२ दिवस )
१३ अश्विनदेव ( सातशत संवत्सर )
१४ श्रीभानु ( सहाशत संवत्सर )

१५ ० ( दोनशत संवत्सर )

१६ जयसवन ( दीडशत वर्षे )

१७ रामराजा ( तुर्काण जालें )

या बखरीच्या ८९ पानावर केशवाचार्यांनें दिलेली वंशावळ येणें प्रमाणें:—

१ रामराजा ( संवत ५७४ )

त्रिपाळराजा

त्रिंबकराजा

गोविंदराजा

कृष्णराजा

०

०

०

रामराजा(कृष्णराजाचा वंशिक (शके ११९३)

या दोन्हीं वंशावळी, 'बारगळ, विचित्र अर्थात अविश्वसनीय' आहेत अशी कबुली इतिहासाचार्य राजवाडे यांनीं दिली आहे. ताम्रपट; शिलालेख, मुसलमानी तवारिखा, मयारावृत्तें, काव्यें किंवा अन्य सजातीय, विजातीय संस्कृत, प्राकृत लेख ह्यांपैकीं कशाचाच पडताळा बिंबवंशीय राजांच्या किंवा नागरशादि राजांच्या बखरींत

आला आहे. सदरील शिलालेख ठाणे-कोकणचा राजा हवीरराव यांचे वेळचा असून तो आपणास "श्रीमत्प्रौढिप्रतापचक्रवर्ति महाराजाधिराज" म्हणवीत होता असें त्याजवरून दिसतें. सदरील शिलालेखावर शालिवाहन शकाबरोबर हिजरी सन दिला आहे व त्याचा प्रधान सिहिम्रो नावाचा मुसलमान होता असें म्हटलें आहे. शके १२८९ मध्यें उत्तरकोंकणात मुसलमानी राज्याचा जम बसला नव्हता असें असता आपणास "प्रौढिप्रतापचक्रवर्ति" म्हणविणारा कोणता स्वाभिमानी हिंदुराजा आपले शिलाशासनावर मुसलमानी सन लिहील ? तसेंच त्यावेळीं दिवाणगिरीची कामें करण्यास हिंदू लोकामध्यें कर्तबगार माणसाचा तुटवडा होता अशा तऱ्हेचा उल्लेख कोठेंही आढळून येत नाहीं. यादवकालीन शिलालेख व ताम्रपट संस्कृत अगर कानडी भाषेत आहेत. यादवाच्या शिलाशासनातील काहीं बिरुदापैकीं एक बिरुद या शिलालेखात दिलें आहे, यावरून हविरराव हा इतर पुराव्याच्या अभावी देवगिरीच्या यादवराजघराण्यापैकीं असला पाहिजे हें विधान इतिहास व युक्तिवाद यास धरून नाहीं. मुसलमानासंबंधानें हिंदूच्या मनामध्यें अत्यंत पीळ होता अशा वेळीं हिजरी सन दक्षिणेंत सुरु होण्यापूर्वी त्यास सदरील शिलालेखात प्राधान्य दिलें आहे ही गोष्ट फार चमत्कारिक दिसते. कै. राजवाडे यानीं शिलालेखाचें संशोधन करिताना त्याचा खरेपणा प्रस्थापित करण्याविषयीं जीं कारणें दिलीं आहेत तीं अपुरी असून संशोधकाना बिलकुल पटण्यासारखीं नाहींत.

नागाव हा गाव अष्टागरात असून त्या प्रांतात चौल हें व्यापाराचें एक मोठें बंदर होतें. त्या ठिकाणीं ईजिप्त, अरबस्तान, इराण वगैरे देशातील बरेच लोक व्यापाराकरिता येत असत व बरेच अरब लोक

त्याठिकाणी स्थाईक रहिवासी झाले होते. काही अरबी व्यापाऱ्यांनी तत्कालीन भारतीय प्रथाची आरबी भाषेत रूपांतरें करून आपले देशात नेल्याचा उल्लेख मुसलमानी तवारिखांतून केलेला आढळतो. उत्तरकोंकणांतील चक्रवर्ति हिंदुराजाच्या प्रधानाचे पद एखाद्या मुसलमान गृहस्थास मिळालें असतें तर मुसलमानी तवारिखांतून त्याबद्दल गौरवपूर्वक निर्देश करण्यात आला असता. पण एकदर परिस्थितीवरून या शिलालेखाच्या खरेपणाबद्दल जबरदस्त शंका येते असें मोठ्या दिलगिरीनें म्हणावें लागतें. इ. स. १९१४ साली प्रसिद्ध झालेल्या महिकावतीच्या बखरीस इतिहासाचार्य राजवाडे यांनीं प्रस्तावना लिहिली आहे, त्यातही शके १२८९ साली उत्तर-कोंकणांत हबीरराव नावाचा राजा होता, अशाबद्दल मुळीच उल्लेख नाही. यावरूनही हा शिलालेख खरा नाहीं ही गोष्ट सिद्ध होते.

प्रस्तुत शिलालेखातील अपभ्रष्ट संस्कृत भाषेचा नमुना पुढे दिला आहे --

" श्रीमत्य प्रौढिप्रतापचक्रवर्ति महाराजाधिराज हबीरु राओ ठाणें कोकणराज्य कोति सत्येतस्मिन् काळे प्रवर्तमाने धरमादिपत्र लिखित यथा सर्वव्यापारिसिहिप्रो तनिरोपित अठागर अधिकारिआ कुसना अहामण नाकाचा सुणवै देऊ प्रेण्होन्त्वेळित

सदरील शिलालेखातील मजकुराचा चांगला बोध होत नाहीं. श्रीरायाचा प्रधानु म्हणजे हबीररावाचा प्रधान झाने तेथील मोठा व्यापारी सिहिप्रो यास मोठमोठी झाडें ज्यात आहेत अशी वाडी विकली असावी व त्याकामीं अष्टागरातील आगऱ्यांनीं त्यास उपद्रव करू नये असा धरमु ( धर्म ) या धरमपत्रात नमूद केला असावा

असें दिसतें. या धरमपत्रांतील साक्षीदारांत 'नागदेऊ भाई दार्युभ्सदे शेटि' व नागांवच्या जमातीपैकीं पैंगु महामद्र दाउवार आया राजि दाउवार आया असे साक्षीदार आहेत. पहिलें नांव पारशी गृहस्थाचें असावें. दुसरें महामद्र ( मुसलमान ) अरबी गृहस्थाचें असावें.

शके १२८९ च्या सुमारास पारशांची वसाहत नागाव येथें असल्याचा कोठें उल्लेख नाहीं. दुसरा इसम मुसलमान अरब असावा. त्यास **महामद्र** अशा नांवानें संबोधिलें आहे. हंबीरराव हा कदाचित् चौल प्रांताकडील आगरी लोकांचा सरदार असल्यास न कळे' परंतु याकामीं संशोधन झाल्यावांचून हा शिलालेख खरा आहे असें म्हणणें रास्त होणार नाहीं. तसेंच या शिलालेखांत उल्लेखिलेला हबीरराओ ( राव ) देवगिरीच्या यादव कुळांतील होता असें म्हणणें ऐतिहासिकदृष्ट्या बरोबर नाहीं.

देवगिरीचे सिंगदेवाचा उत्तरकोंकणप्रांतावर अम्मल होता असें दाखविणारे दोन ग्रंथ आमचे पाहण्यांत आले आहेत. पैकीं बिंबाख्यान नावाचें पुस्तक रघुनाथ पुतळाजी राणे यांनीं इ. स. १८७७ सालीं छापून प्रसिद्ध केलें. या पुस्तकाच्या प्रति अद्याप बऱ्याच ठिकाणीं उपलब्ध आहेत. हाच ग्रंथ महिकावतीची ऊर्फ माहिमची बखर या नांवानें कल्याण येथील आमचे मित्र श्रीयुत सदाशिव महादेव दिवेकर यानीं इतिहासाचार्य कै. राजवाडे यांचे प्रस्तावनेसह इ. स. १९१४ मध्यें छापून प्रसिद्ध केला. बिंबाख्यान ऊर्फ महिकावतीची बखर प्रथम उजेडांत आणण्याचें श्रेय रघुनाथ पुतळाजी राणे यांस देणें वाजवी आहे. कै. राजवाडे ह्यास या ग्रंथाची माहिती होती

असें त्यांनी आपल्या प्रस्तुत बखरीच्या प्रस्तावनेंत कबूल केलें आहे. असें असून " या बखरीचा पत्ता आजपर्यंत नव्हता, व नापत्ता असलेल्या या इतिहासप्रांताच्या आड येणारा पडदा प्रस्तुत बखरीच्या प्रकाशनानें दूर सारला जावा; व इतिहास रंगभूमीवरील एक अज्ञात चित्रपट खुला होत आहे तें पाहून सहृदय वाचक बखरीचा पत्ता लावणाऱ्या व ती हस्तगत करणाऱ्या दिवेकरांना दुवा देतील " अशा आशयाचें राजवाडे यांनीं सदरील बखरीचे प्रस्तावनेंत दिलेलें मत ऐतिहासिक सत्यास धरून नाहीं. तसेंच " आजपर्यंत सांपडलेल्या सर्व बखरींत आपण प्रसिद्ध करीत असलेली महिकावतीची बखर सर्वांत जुनाट आहे " असें सदरील बखरीच्या प्रस्तावनेंत कै. राजवाडे यांनीं विधान केलें आहे त्यासही कांहींएक आधार दिला नाहीं. राणे यांच्या विंचाख्यानांत अथवा महिकावतीच्या बखरींत देवगिरीच्या यादवराजांची अगर बिंबदेवाची ऐतिहासिक माहिती मिळेल अशी कोणाची अपेक्षा असेल तर ती व्यर्थ आहे, ही गोष्ट पुढील विवेचनावरून वाचकांच्या सहज ध्यानांत येईल.

या ग्रंथांत पौराणिककालातील दशावताराचे उत्पत्तिपासून उत्तर-कोकणांत फिरंग्यांचा अम्मल सुरू होईपर्यंत हजारों वर्षांची हकीकत वेगवेगळाल्या लेखकांनीं गोंवण्याचा प्रयत्न केला आहे.

भगवान् दत्तानें व केशवाचार्यानें देवगिरीच्या यादव घराण्याच्या ज्या दोन वेगवेगळ्या वंशावळी या बखरींत दिल्या आहेत त्या, प्रस्तुत पुस्तकाच्या तिसऱ्या भागाच्या शेवटीं दिलेल्या कोणत्याही वंशावळींशीं जुळत नाहींत. महिकावतीच्या बखरींतील पृ. ७३-७४ मध्यें भगवान् दत्तानें वंशावळ दिली आहे ती येणेंप्रमाणें:—


सूर्यवंश.
सविता
आजानबाहु
गंगाधर
श्रीधर
१ नदनंदन
२ सुदिमन्य ( ४००० दिवस राज्य )
३ सावतामनु ( तीन संवत्सर )
४ भद्रसेन
रघुतम
५ महामिद्धि ( ३०२२ दिवस राज्य )
६ ०
७ विजयाधरा ( एकोणीस संवत्सरें )
८ सोमप्रभ (पांच संवत्सर, बारामास, चार दिवस)
९ कृष्णदेव
१० रघुपति ( पंधरासात-संवत्सर )
११ रघुपतिकुमर (१० वर्षे, ७ मास, ६ दिवस)
१२ कमळादीन ( १८०२ दिवस )
१३ अश्विनदेव ( सातसत संवत्सर )
१४ धर्मभानु ( सहासात संवत्सर )

१५ ० ( दोनशत संवत्सर )
|
१६ जयसवन ( दीडशत वर्षे )
|
१७ रामराजा ( तुर्काण जाळें )

या बखरीच्या ८९ पानावर केशवाचार्यांनीं दिलेली वंशावळ येणें प्रमाणेः—

१ रामराजा ( संवत ५०४ )
|
त्रिपाळराजा
|
त्रिंबकराजा
|
गोविंदराजा
|
कृष्णराजा
|
०
|
०
|
०
|
०

रामराजा(कृष्णराजाचा वंशिक (शके ११९३)

या दोन्हीं वंशावळी, 'घारगळ, विचित्र अर्थात अविश्वसनीय' आहेत अशी कबुली इतिहासाचार्य राजवाडे यांनीं दिली आहे. ताम्रपट; शिलालेख, मुसलमानी तवारिखा, प्रवासवृत्तें, काव्यें किंवा अन्य सजातीय, विजातीय संस्कृत, प्राकृत लेख ह्यांपैकीं कशाचाच पडताळा बिंबवंशीय राजांच्या किंवा नागरशादि राजांच्या बखरीत

दिलेल्या कथासंबंधानें किंवा हकीगतीसंबंधानें उपलब्ध नाहींत, असा शेरा खुद्द राजवाडे यांनीं महिकावतीबखरीच्या प्रस्तावनेंत (पान ७५) दिला आहे. बिंबवंशीयादि राजे उत्तरकोंकणांत साक्षात् झाले अगर यावरून गेले असें ठाम म्हणण्यास यांहि पुराव्याच्या अभावीं सकृद्दर्शनीं मोठी अडचण पडते असें राजवाडे यांनीं महिकावतीच्या बखरीसंबंधानें तिला जोडलेल्या प्रस्तावनेंत उद्गार काढले आहेत. ह्या बखरींत देवगिरीच्या यादवाची हकीकत देताना जीं ठोबळ प्रमादस्थळें दृष्टोत्पत्तीस येतात तीं येणेंप्रमाणें —

(१) देवगिरीचे यादव (यदुवंशीय) असून त्यांचा मूळपुरुष इंदु म्हणजे चंद्र होता असें ब्रतखंडांतील वंशावळीवरून व यादवांच्या शिलाशासनावरून दिसतें. महिकावतीच्या बखरींत देवगिरीचे यादवराजे सूर्यवंशीय होते असें म्हटलें आहे. देवगिरीचे यादव आपल्या बिरुदावळींत आपण सोमवंशीय असल्याचें दरएक शिलाशासनांत साभिमानानें लिहितात.

(२) या बखरींत देवगिरीच्या यादवांच्या ज्या दोन वंशावळी वर दिल्या आहेत त्या हेमाद्रीच्या ब्रतखंडांत दिलेल्या वंशावळींशीं अगर खुद्द यादवकालीन शिलालेख व ताम्रपट यांत दिलेल्या वंशावळींशीं बिलकुल जुळत नाहींत. (या पुस्तकाचा भाग ३ रा पान )

(३) देवगिरीच्या महादेवरायानें उत्तर कोंकणचा शिलाहार वंशीय सोमेश्वर राजा ह्याचा पराभव शके ११८८ मध्यें करून उत्तर कोंकणावर आपली सत्ता स्थापिली ही गोष्ट महादेवरायाचा समकालीन मंत्री हेमाद्रि ह्यानें व्रतखंडांतील राजप्रशस्तींत नमूद केली आहे. शिवाय, शके ११९४ चा ओवळें येथील ताम्रपट व शके

१२१२ तील अण्जूरचा शिलालेख यांतील मजकूरावरून शके ११८८ पासून उत्तरकोंकणप्रांत हा देवगिरीच्या यादवांच्या साम्राज्याचा भाग होता असें स्पष्ट दिसतें. असें असतां देवगिरीचे रामदेवराव जाधव यानें शके ११९३ मध्यें उत्तरकोंकणांवर स्वारी केली, व त्यांत तेथील बिंबघराण्यांतील राजा केशवदेव यानें त्याचा पराभव केला; व त्या लढाईंत रामदेवराव जाधवाचा मंत्रि हेमाद्रि ह्यानें भाग घेतला होता अशी हकीगत सदरील बखरींत दिली आहे. तसेंच शके १२१६ त रामदेवरावानें दुसऱ्यांदा उत्तर कोंकणावर स्वारी केली व त्यांतही त्याचा पराभव झालाअशी हकीगत दिली आहे. ह्या दोन्हीं हकिकतीस ऐतिहासिक आधार बिलकुल नाहीं.

ओवळें येथील ताम्रपटावरून व अण्जूरच्या शिलाशासनावरून असें दिसतें कीं, रामदेवराव जाधवाचे पदरीं अच्युतराव नायक व श्रीकृष्णदेव असे दोन लढवय्ये सरदार उत्तरकोंकणप्रांताचें रक्षण करण्याकरितां नेमिले होते. ओवळें हा गांव ठाणें शहरापासून सुमारें चार पांच मैलावर आहे व अण्जूर हाही गांव जलमार्गानें ठाण्याहून तितक्याच अंतरावर आहे. शके ११९३ त रामदेवराव जाधवाचा, उत्तरकोंकणांत बिंब आडनांवाच्या वंशांतील केशवदेव यानें पराभव केला ही गोष्ट खरी असेल तर ओवळें येथील ताम्रपट (शके ११९४ चा) खरा नाहीं असें म्हणावें लागेल. शिवाय रामदेवराव जाधव यास तीन कर्ते सवरते मुलगे असल्यामुळें त्यास स्वतः स्वारीवर जाण्याचें कांहीं कारण नव्हतें.

( ४ ) रामदेवराव जाधव यास केशवदेव या नांवाचा मुलगा अस-

त्याचें दक्षिणच्या इतिहासात, महानुभावीय वाङ्मयात अगर इतर कोणत्याही ग्रंथात आढळून येत नाहीं रामदेवरावाच्या पश्चात् त्याचा मुलगा शंकरदेव हा गादीवर बसला व त्याचे पश्चात् शंकरदेवाचा मेव्हणा (रामदेवरावाचा जावई) हरपाळदेव बसल्याबद्दल ऐतिहासिक पुरावा आहे परंतु या बखरींत रामदेवराव जाधवराच्या मागें केशवदेव व त्याचे पश्चात् त्याचा मुलगा रामदेवराव (दुसरा) हा गादीवर बसला असें म्हटलें आहे राजवाडे यांच्या मताप्रमाणें रामदेवराव जाधव हा हरिदासांच्या कथा शास्त्रांच्या सभावना, महानुभावाचे मराठ हेमाद्रींची व्रतखंडातील व्रतें, उद्यापनें इत्यादि गोष्टींत निमग्न असल्यामुळें, सैन्य व राज्य ह्यांच्या व्यवस्थेकडे सातारच्या शाहु महाराजाप्रमाणें त्याचें विलकूल लक्ष नव्हतें अशा तऱ्हेचा रामदेवराव जाधव स्वतः होऊन उत्तरकोंकणावर दोनदा अगर तीनदा स्वारी करण्यास धजेल असें सभवत नाहीं शिवाय या गोष्टींत ऐतिहासिक सत्य असतें तर त्याबद्दलचा मजकूर आंबळें येथील ताम्रपटात अगर अंजूरच्या शिलालेखात अवश्य नमूद करण्यात आला असता

रामदेवरावाचा मुलगा बिंबदेव ह्यानें उत्तरकोंकण, नागरशहाचा मुलगा त्रिपुरकुमर याजपासून शके १२१६ सालीं जिंकून घेतलें असतें तर त्यावेळचा एखादा शिलालेख अगर ताम्रपट क्वचित उपलब्ध असता बिंबदेवानें अल्लाउद्दीनास शह देण्याकरिता गुजराथेंत जाऊन मारल्याच्या बाजूनें पायबंद देण्याचा त्याचा विचार होता असें राजवाड्यांचें मत आहे परंतु ह्या विधानास ऐतिहासिक आधार नाहीं अल्लाउद्दीन ह्याच्या मूळ पीठिकेची जी हकिकत बखरींत दिली आहे, ती निव्वळ दंतकथा असून हास्यास्पद आहे

( ५ ) बिंबदेवानें शके १२१६ पासून शके १२२५ पर्यंत उत्तर-कोंकणात राज्य केलें, व त्याचे पश्चात् त्याचा मुलगा प्रतापशहा हा गादीवर आला. या प्रतापशहावर नागरशहाचा मुलगा त्रिपुरकुमर ह्यान स्वारी केली परंतु प्रतापशहापाशी असावें तसें सैन्यबळ नसल्यामुळें त्यानें आपला वृद्ध आजा देवगिरीचा रामदेवराव जाधव ह्याजकडे सैन्याची मदत मागितली रामदेवराव जाधवानें जीवन नाईक सानखेटकर व हेमपंडित ( हेमाद्रि पंडित ? ) ह्याम प्रतापशहाच्या मदतीस उत्तरकोंकणात पाठविलें. या संयुक्त सैन्याचा त्रिपुरकुमारानें पराभव केला. या पराजयानंतर रामदेवराव जाधव व प्रतापशहा या उभयतानीं पुन्हा युद्धाची तयारी केली रामदेवरावानें अनहिल-पट्टणचा राजा जयसिंग यास मदतीस बोलाविलें या तिघाचे सैन्य नागरशहा व त्रिपुरकुमर याजवर चढाई करून गेले. उभयताच्या सैन्याचें अधेरीच्या रानात तुंबळ युद्ध झालें त्यात रामदेवरावाचा नातू प्रतापशहा ह्याचा पूर्ण पराभव झाला या युद्धानंतर प्रतापशहाचे अगर त्याचें उत्तरकोंकणच्या राज्याचे काय झालें. याबद्दल बखरकार काहीच हकिकत देतनाहीत दुसरा नागरशहा व त्रिपुरकुमर ह्यानीं त्याच्या प्रजेत भेद उत्पन्न करून शके १२५४ त प्रतापशहाचें राज्य कायमचें खालसा केलें, असा मजकूर सदरील बखरींत दिला आहे

देवगिरीच्या यादवाची जी हकीकत या बखरींत दिली आहे ती निराधार व अविश्वसनीय अशी असूनही इतिहासाचार्य राजवाडे यानीं ती खरी आहे असें भासविण्याचा प्रयत्न केला आहे. इतिहास-संशोधनाची ही पद्धति अश्रुतपूर्व आहे हें कोणाही नि पक्षपाती इतिहाससंशोधकास कबूल करणें भाग आहे.

बखरींतील कांहीं गोष्टींवर शब्दच्छल मल्लिनाथी करून बखरींतील दंतकथांना ऐतिहासिक पेहराव चढविण्यात त्यांनीं आपलें नेहमीचें चातुर्य खर्च केलें आहे परंतु कल्पनेच्या पायावर रचलेली इमारत थोड्याशा संशोधनानें ढासळून पडते ही गोष्ट नव्यानें सांगण्याची जरूरी नाहीं राजवाडे हे एखादी गोष्ट खरी आहे असें गृहित धरून तिच्या समर्थनाकरितां कारणें हुडकून काढण्याचा खटाटोप करितात. यामुळें त्यांच्या संशोधनात घोटाळा उडतो अशी आमची प्रामाणिक समजूत आहे ह्याचा एक दाखला पुढें देण्यात येत आहे अंधेरी येथें नायकोराव ह्यास देवीचा दृष्टान्त होऊन त्यानें सर्व जातींचे लोक जमवून महाराष्ट्रधर्माचा उपदेश माहालजापुरी येथें केला व तो सर्वांस पसंत पडला असें बखरीत म्हटलें आहे. समर्थ रामदास स्वामी याचे ग्रंथात "मराठा तितुका मेळवावा महाराष्ट्र धर्म वाढवावा" अशी शिकवण आहे सदरील शिकवणीचें प्रतिबिंब नायकोरावाचे उपदेशात आहे अशी आपली समजूत करून घेऊन राजवाडे यानीं नायकोरावाच्या महाराष्ट्रधर्माच्या विवरणावर बरींच पानें खर्च केलीं आहेत वास्तविक ह्या दोन्हीं शिकवणीत जमीन अस्मानाचा फरक आहे असें पूर्ण विचारान्तीं कोणासही दिसून येईल नायकोरावानीं स्वतःच्या महाराष्ट्र-धर्माची रूपरेखा दिली होती ती अशी –'सर्व ब्राह्मणेतरानीं ब्राह्मणाचें वर्चस्व राजकीय, धार्मिक व सामाजिक बाबतींत पूर्णपणें मानिलें पाहिजे, व त्यांच्या नेतृत्वाखालीं सर्व कामें केलीं पाहिजेत, वेळेस त्यांनीं ब्राह्मणाचें उच्छिष्टहीं खाल्लें पाहिजे व असें झालें तरच हिंदु समाजात जुट होऊन म्लेच्छांचें उच्चाटन होईल 'राजवाडे ह्यांच्या मतें श्रीसमर्थांच्या महाराष्ट्र-

धर्मातील शिकवणीपेक्षा नायकोराज्ञाची शिकवण जास्त व्यापक आहे. वास्तविक पाहिलें असता अशा तऱ्हेचा सर्व जातींची बैठक अंधेरी येथें खरोखर झाली होती किंवा नाही, तसेंच बखरीतील हा लेख समर्थांच्या लिखाणानंतर झाला किंवा कसें या मुद्यांचें संशोधन करण्याचें सोडून, राजवाडे यांनी वरील गोष्टी खरोखरच घडल्या असें गृहित धरलें आहे, व त्यावरून मन मानेल तशी अनुमानें काढिली आहेत. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या संशोधनपद्धतीचा आणखी एक मासला देणें जरूर आहे.

बखरीच्या प्रस्तावनेच्या ( ३४ ) पानावर मजकूर आहे तो येणेंप्रमाणें –त्यावेळीं शके १०६२ पासून ११६३ पर्यंत पैठणावरून जी ब्राह्मण मंडळी आली त्यांची याद बखरकार देतो ती अशी –

(१) गंगाधर नाईक सावखेडकर–शेष वशिकाचे कुळगुरु
(२) विश्वनाथपंत कावळे—राजपुरोहित
(३) भास्कर पंडित चामरे
(४) गोवर्धनाचार्य देवधर—प्रधान याशिनाय
(५) अनंत नायक छत्रे (१०) पटणकर
(६) केशव राम घोटे (११) जीवन नाईक सावखेडकर
(७) मोगरे (१२) हेमाडी [ हेमाद्रि पंडित ]
(८) जाधवे येनटच्या तिघांचीं नावें बखरींत दिलीं आहेत
(९) हेमटे

इत्यादि यजुर्वेदी देशस्थ मांदियाळी मंडळींपैकीं गंगाधर नाईक सावखेडकरास पसपवली गांव व विश्वनाथपंत कावळ्यास वृत्त्या राजहस्तें मिळाल्या. ही सर्व यजुःशाखीय मंडळी देवगिरीच्या

प्रजाजनांपैकीं असून महाराष्ट्रीय होती असें बखरींतील मजकुरावरून उघड दिसतें.

त्याप्रमाणें निंबावरोबर उत्तरकोंकणांत आलेले ब्राह्मण पैठण, मावळेट वगैरे गावचे मूळ रहिवाशी असून महाराष्ट्रीय माध्यंदिन शाखेचे ब्राह्मण होते असें निर्विवाद दिसतें असें असतां बखरीमध्यें याबाबतींत कांहींएक उल्लेख नसतांनाही, ते मगध देशांतून आले असावे अशी राजवाडे ह्यांनी कल्पनेची भरारी मारिली आहे मगध देशाचें कोनाकोपऱ्यांतील अप्रयुक्त असं दुसरें नाव हुडकून काढून त्या नावावर कोटिक्रम करून ते गौडब्राह्मण असावे असें त्यांनीं ध्वनित केलें आहे तसेंच 'जरी ते शुक्लयजुर्वेदी होते तरी महाराष्ट्रांतील प्राचीन यजुर्वेद्याहून त्यांचे आचार चालीरीति भिन्न होत्या' असें राजवाडे यांनीं विधान केलें आहे परंतु ह्या दोन्हीं विधानास त्यांनीं कांहींएक आधार दिला नाहीं

वरील विधानावरून 'बिंबाख्यान' अगर 'महिकावतीची बखर' या ग्रंथाची ऐतिहासिकदृष्ट्या कांहीं किंमत नाहीं असें दिसून येईल देवगिरीच्या यादवांचा उत्तरकोंकणप्रांतावर शके ११८८ [ इ स १२६६ ] पासून अमल सुरू झाला व तो, सदरील प्रांत मुसलमानांच्या अमलाखालीं जाईपर्यंत सुमारें ७० ८० वर्षे तो चालू होता असें दिसतें ह्या कालांतील इतिहासावर प्रकाश पाडण्याच्या कामीं सदरील ग्रंथावरून बिलकुल मदत होत नाहीं

शके १०६० पासून शके ११६३ पर्यंत शिलाहारांचा अमल उत्तरकोंकणावर साक्षात असतांना माणी बेटाच्या उत्तरभागांतील वाढें गावापासून भाईंदरपर्यंत व मुंबई बेटाच्या उत्तरेकडील माहिम

[ दादर ] भागांत, विंब नांवाच्या घराण्यांतील कांहीं अप्रसिद्ध मांडलिकांचें राज्य होतें, अशाबद्दल साधार पुरावा कोठेंही उपलब्ध नाहीं. श्रीस्थानक [ हल्लींचें ठाणें ] सोपारें, चऊल, दंडाराजपुरी व मंजाण हीं गांवें भरभराटीच्या स्थितींत असतानां, माहिमासारख्या कोनाकोपऱ्यांतील गावांत, विंब घराण्यांतील राजांनीं शेजारच्या पराक्रमी शिलाहार राज्याच्या उपसर्गावांचून व त्यांच्या नजरेआड राज्य केलें असावें हें संभवनीय दिसत नाहीं. महिकावतीची बखर लिहिणारे भगवानदत्त व केशवाचार्य ह्याच्याबद्दल कांहींएक माहिती उपलब्ध नाहीं असें राजवाडे कबूल करतात. या लहानशा बखरींत पौराणिक काळापासून तों साष्टी, वसईप्रांत व मुंबई बेट पोर्तुगीज लोकांच्या अंमलाखालीं जाईपर्यंत त्या प्रांतावर राज्य करणारांची हकिगत दिली आहे. ती असजशी कानावर पडली तसतशी बेजबाबदार लेखकांनीं त्याची योग्य छाननी न करितां लिहून ठेविल्याचें दिसतें. ऐतिहासिक लेख लिहिण्याचे कामीं जी साधनसामुग्री लागते ती मिळविण्याचे कामीं इतिहासाचार्य राजवाडे यांनीं जी अपूर्व कामगिरी केली आहे, त्याबद्दल त्यांच्याविषयीं आदर ज्यास वाटत नाहीं, असा महाराष्ट्रांत क्वचितच मनुष्य सांपडेल ! परंतु संशोधनकार्य करतांना निव्वळ ऐतिहासिकदृष्टि न ठेवितां, कल्पनेच्या वातावरणांत विहंगमवृत्तीनें वावरण्याचा मोह त्यास आवरून धरतां येत नव्हता असें मोठ्या दिलगिरीनें म्हणावें लागतें !

देवगिरीचें यादवांचें राज्य शके १२३९ (इ. स. १३१८) त कायमचें नष्ट झालें. त्यानंतर थोड्याच वर्षांनीं मुसलमानांचा अंमल दक्षिणेंत व उत्तरकोंकणांत झाला. उत्तरकोंकणांत विंबदेवाचा अम्मल

असतांना जमीन महसुलाच्या बाबतींत बऱ्याच सुधारणा करण्यांत आल्या व त्याचे वेळच्या जमीन महसुलाची पद्धत पोर्तुगीज लोकांचे पद्धतिपेक्षा श्रेष्ठ दर्जाची होती अशाबद्दल ( इ. स. १८०८ चे रग्युलेशन १ [ Rebulaim I ] मध्यें उल्लेख केलेला आहे. याबद्दलचें दिग्दर्शन मागील भागांत केलें आहे.



# भाग ६ वा.

## मोडी लिपि.

लिपि विधात्रा लिखिता जनस्य
भाले विमृज्य परिमृज्य दुष्टाम्।
कल्याणिनीमेष लिखत्वधैना
चित्रां प्रमाणी कुरुते विधिश्च ॥

( चतुर्वर्गचिंतामणि )

प्राचीन काळच्या इतिहासाचें संशोधन करणारांस व पुराण-वस्तु-संशोधन-शास्त्राचा अभ्यास करणारांस लिपिशास्त्राचें ज्ञान असणें अवश्य आहे. प्राचीन काळचे शिलालेख, ताम्रपट, चलनीनाणीं, भूर्जपत्रें व ताडपत्रावरील लेख, निरनिराळ्या लिपींत लिहिलेले आढळतात. लिपींच्या अज्ञानामुळें संशोधन कार्य अपुरें राहातें. सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी भरतखंडांत जवळ जवळ चौसष्ट लिपि प्रचारांत होत्या असें दिसून येतें. बुद्धवाङ्मयामध्यें **ललित विस्तार** या नांवाचा एक प्राचीन ग्रंथ आहे, त्यांत गौतमबुद्धाच्या वडिलांनें त्याम धूळ पाटीवर बसविलें त्यावेळची हकिकत दिली आहे. उरगसार जातीच्या चंदनाच्या लाकडाच्या पाटीवर सोन्याच्या लेखणीनें धुळाक्षरें काढण्यास विश्वामित्र नांवाच्या पंतोजीनें जेव्हां आपल्या बालशिष्यास सांगितलें, तेव्हां गौतमबुद्ध आपल्या गुरुजीस म्हणाला कीं, मला चौसष्ट लिपि माहित आहेत त्यांपैकी कोणत्या लिपींत धुळाक्षरें काढूं ? आपल्या बालशिष्याच्या कुशाग्रबुद्धीबद्दल त्याचे गुरुजीस कौतुक वाटलें. या गोष्टींत ऐतिहासिक सत्य किती असेल तें असो; परंतु त्याकाळीं भरतखंडात निदान चौसष्ट लिपि प्रचारांत असल्या पाहिजेत. या लिपींची नांवें येणेंप्रमाणें.---

| | |
|---|---|
| ब्राह्मी | अनुलोम |
| खरोष्टी | अर्धधनु |
| पुष्करसारी | दरद |
| अंग | खास्य |
| वंग | चिन |
| मगध | हूण |
| मांगल्य | मध्याक्षर विस्तार |
| मानुष्य | पुष्पलिपि |
| अंगुली ( आंगठ्यानें लिहिण्याची लिपि. ) | देवलिपि |
| शकारी | नागलिपि |
| ब्रह्मवल्ली | यक्ष |
| द्राविडी | गंधर्व |
| किनारी | किन्नर |
| दक्षिण | महोरग |
| उग्र | असुर |
| चित्रलिपि ( आकृतींची लिपि ) ( Hyro gly ) | गरुड |
| मृगचक्र | गणनावर्त |
| चक्रलिपि | उत्क्षेपवर्त |
| वायुमारुत | निक्षेप वर्त. |
| भौम-देव | पादलिपि |
| अंतरिक्षदेव | द्विरुत्तर पदं संधि |
| उत्तर कुरु | यावद् दशोत्तर पदसंधि |
| पूर्व विदेही | मध्या हारिणी |
| उत्क्षेप ( लंबाकृती ) | सर्व रुत संग्रहिणी |



इतिहासाचार्यः–विश्वनाथ काशीनाथ राजवाडे.

[जन्म आषाढ शु॥ ८ शके १७८५] [मृत्यू मार्गशीर्ष व॥ १२ शके १८४८

| | |
|---|---|
| निक्षेप ( Pendulues writing ) | विचायुलोप |
| सागर | विमिश्रीत |
| चक्र | क्षिपितप्रस्तहान |
| लेख–पतिलेख | रोचमानान्धरणी-प्रेक्षण |
| अनुद्रुत (Slow writing | गगन प्रेक्षिणी |
| शास्त्रावर्तलि | सर्वौषधि निस्यन्दर्ता |
| | सर्वसार संग्रहणा |
| | सर्वभूतरत संग्रहणी |

ह्या चौसष्ट लिपींचें पुढें लिहिल्याप्रमाणें वर्गीकरण करतां येईल. (१) देशविषयक=विवक्षित देशांत प्रचलित असलेली लिपि (२) जातिविषयक=विवक्षित जातींत प्रचलित असलेली. (३) संमिश्र= निरनिराळ्या अक्षरवाटिकांनीं मिश्रित. ( ४ ) सांकेतिक.

यांपैकीं बऱ्याच लिपी प्राचीनकाळांपासून नामशेष झाल्या आहेत. भरतखंडांत ऐतिहासिक काळांत सुमारें १४ लिपि प्रचारांत होत्या, असें लिपि शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. त्या येणेंप्रमाणें:––

| | |
|---|---|
| ब्राह्मी लिपी | मध्यमदेशी |
| गुप्त | तेलगु–कानडी |
| कुटिल | ग्रंथलिपि |
| नागरी | कलिंग |
| शारदा | तामील |
| बंगलीय ( Benguli ) | वट्टेळुत्तु |
| पश्चिमी | खरोष्ठी |

या १४ लिपींपैकीं ब्राह्मी व तिजपासून निर्माण झालेल्या उपलिपि भरतखंडांतील बहुतेक भागांत अद्याप प्रचलित आहेत. ब्राह्मीलिपि

ब्रम्हदेवानें निर्माण केली म्हणून ती पवित्र मानण्यात येते. या लिपीच्या वर्ण मालेंतील पहिले स्वराक्षर 'अ' हें ॐ ह्या प्रणव चिन्हा पासून अस्तित्वात आलें, व ' क ' हे व्यंजनाक्षर स्वस्तिक चिन्हापासून झालें अशी सार्वत्रिक समजूत प्राचीन काळा-



पासून आहे. वर निर्दिष्ट केलेल्या चौदा लिपीपैकीं ब्राह्मी व खरोष्टी ह्या मुख्य लिपी होत. खरोष्टी लिपी भरतखंडाचे वायव्येकडील प्रांतात म्हणजे पंजाब, गांधार वगैरे देशात अशोकाचेवेळीं चालू होती सदरील प्रांतात अशोकाचे जे शिलालेख सांपडले आहेत ते या लिपींत लिहिलेले आहेत अशोकाच्या पूर्वीचे शिलालेख खरोष्टी लिपिंत लिहिल्याचे आढळून येत नाहीं. इराण देशातील प्राचीनकाळच्या चांदीच्या नाण्यावर लिहिलेला मजकूर ब्राह्मी व खरोष्टी या दोन्ही लिपींत आहे अशोकानंतर भरतखंडाच्या उत्तरेकडील काहीं भागात विदेशी राजाचा अमल होता, त्यावेळच्या नाण्यात, शिक्कामोर्तबात, व शिलालेखात खरोष्टी लिपिचा उपयोग केला जात होता असें दिसतें. इराण देशात खरोष्टी लिपि मुख्यत्वें प्रचारात होती. या लिपीखेरिज "अरमिइन" या नावाची लिपी इराणदेशात प्रचलित होती.

वेदकालामध्यें लिपीचें अस्तित्व नव्हतें व पाणिनीच्या प्रथात लिपीचें अस्तित्व सुचविणारा एकही शब्द नाहीं असें मॅक्समुल्लर साहेबाचें मत आहे परंतु अलिकडे उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून हे मत साफ चुकीचें आहे असें दिसतें. भूर्जपत्र, ताडपत्र व कापसापासून तयार केलेल्या कागदावर लिहिलेला मजकूर हवेमुळें बहुत काळ टिकत नाहीं म्हणून दानपत्रें व शासनपत्रें शिलावर व ताम्र्याच्या धातूच्या पत्र्यावर कोरण्याचा प्रघात अशोकाच्या-

वेळेपासून पडला. परंतु यावरून प्राचीन काळीं भरतखंडांतील लोकांस कागदाची माहिती नव्हती असें म्हणतां येणार नाहीं. दानपत्रें व राजशासनें याखेरीज सर्वसाधारण लेखनव्यवहाराचे कामीं कागदाचा उपयोग केला जात असे यांत शंका नाहीं.

ख्रिस्तपूर्व ३२६ वर्षांत अलेक्झांडर दि ग्रेट् ह्याचा **नियार्कस** या नांवाचा एक सेनापति पंजाबमध्यें होता. त्यानें आपल्या ग्रंथांत असें म्हटलें आहे कीं, कापूस अगर कापडाच्या चिंध्या कुटून त्यापासून हिंदुस्थानचे लोक कागद बनवीत असत व कागद करण्याची कला त्यास फार वर्षांपासून अवगत होती. मेग्यास्थिनीस ह्यानेंही आपले ग्रंथांत वरीलप्रमाणेंच मत नमूद केलें आहे. इसवीसनापूर्वीच्या बौद्ध-वाङ्मयांत लेखन-कलेची प्रशंसा केली असून तत्कालीन गृहस्थाश्रमी लोकांनां तीं एक निर्वाहाचें साधन होतें असें म्हटलें आहे.

मिसरदेशांत नाईल नदीकांठच्या दलदलींत पंपासरस ( बोरू: सर्कंडा ) यापासून प्राचीनकाळीं कागद तयार करीत असत. देवगिरी येथें कागद तयार करण्याचे कारखाने प्राचीनकाळीं होते, अशी माहिती बऱ्याच ठिकाणीं आढळून येते. दौलताबाद (मूळचें देवगिरी) शहरच्या एका भागास कागदपुरा हें नांव अद्यापीहि चालत आहे. हिंदुस्थानांत मुसलमानांचा अंमल होईपर्यंत एतद्देशीय लोकांस कागद हा पदार्थ माहित नव्हता असें जें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे तें वरील विवेचनावरून चुकीचें आहे असें दिसून येईल.

ब्राह्मी व तीजपासून निर्माण झालेल्या लिपी डावीकडून उजवी-कडे लिहिण्याचा प्रघात आहे. परंतु खरोष्टी व तिजपासून उपस्थित झालेल्या लिपी आरबीक, फारशी, हिब्रू वगैरे उजवीकडून डावीकडे

लिहिल्या जातात खरोष्ठी लिपीचा उगम सेमिटिक देशात ( मध्य एशिया ) झाला असावा असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे.

ब्राह्मी लिपी भरतखंडात फार वर्षांपासून चालू आहे तिजपासून गुप्त लिपि बनली गेली सदरील लिपि गुप्तराजाचे कारकीर्दीत उत्तर हिंदुस्थानातील बहुतेक भागात प्रचलित होती ब्राह्मी लिपीपासून कुटिल लिपि निर्माण झाली तिच्या नावावरूनच तिच्या वशिष्ठ्याचा बोध होतो ब्राह्मी लिपीतील स्वर, व्यजनें व मात्रा यांच्या आकृतीत व वळणात लेखनसौकर्यासाठी जरूर ते फरक करण्यात येऊन सदरील लिपी बनविली आहे हे फरक करताना वर्णमालेतील मूळाक्षराचे वळणात वक्रता उर्फ वाकडेपणा दिसून येतो म्हणून या लिपीस कुटिल उर्फ मुरडलेली अर्थात मोडी असे म्हणतात इ स ६ व्या शतकात सदरील लिपी प्रचारात होती असें दिसतें कुटिल लिपीला, कायस्थ अगर कैथी लिपि असली म्हणतात कुटिल लिपीपासून मोडी लिपी बनली असावी असे काही विद्वानांचें मत आहे कुटिल ( संस्कृत ) व मोडी ( मराठी ) हे दोन शब्द एकाच अर्थाचे आहेत ज्या अक्षराच्या मूळ वळणात मोड पाडली गेली आहे, अगर जे मुरडलेलें आहे, अशा अक्षराच्या वर्णमालेस अगर अक्षर-वाटिकेस मोडी अगर कुटिल लिपी असें म्हणतात विल्हण कवीनें इ स ११ व्या शतकात विक्रमांकदेवचरित नावाचा एक ग्रंथ लिहिला, त्यात कायस्थ लिपीचा त्यान भामुख्यानें उल्लेख केला आहे, तो येणेप्रमाणें —

नो कायस्थ कुटिललिपिभि र्नार्पिर्यांङ्कदक्षे
( विक्रमाङ्कचरित सर्ग १८ श्लोक ४२ )

यावरून कुटिललिपि हेमाद्रीच्या पूर्वी शंदीडशें वर्षे तरी प्रचारात होती असें दिसतें. देवनागरी व कायस्थ लिपि ह्याच्या वळणात बराच फरक दिसून येतो. मोडी लिपी ही कायस्थ लिपीचें बऱ्याच कालानंतर झालेलें उत्क्रांत स्वरूप होय, असें मानण्यास जागा आहे. **कायस्थ** या नावाची, लिहिण्याचा व्यवसाय करणारी एक जात भरतखंडात प्राचीन काळीं होती. निव्वळ लिहिण्याचा धंदा करून उदरनिर्वाह करणाऱ्या आणखी काही जाति भरतखंडात होत्या गुजराथेंत ह्याप्रकारची एक धंदेवाईक जात होती, तिला ' धुरु ' अथवा ' ध्रु ' असें म्हणत. कायस्थामध्यें **करण** ह्या नावाची एक पोटजात होती, तिला **करणिक** अथवा **कर्णिक** ( संक्षिप्त रूपात कर्ण ) असें म्हणत. कनोजच्या राजाचें दफ्तर ठेवणाऱ्या अधिकाऱ्यास " कायस्थ " अथवा " करणिक " अशी संज्ञा असे. यावरून " कर्ण " अथवा " करणिक " या शब्दाचा अर्थ राजकीय व्यवहाराचे कागदपत्र सांभाळणारा अमलदार असा अर्थ निष्पन्न होतो व करणाचा अधिप ( करणाधिप ) यास दफ्तरदार असें म्हणण्यास हरकत नाहीं.

वरील विवेचनावरून कायस्थ, कर्ण अथवा करणिक हे शब्द निव्वळ धंद्याचे निदर्शक आहेत; जातिवाचक नाहींत असें दिसून येईल. अमोघवर्षाच्या कारकीर्दींत या कायस्थांचा राजकीय कागदपत्र लिहून घेण्याचे कामीं उपयोग करीत असत. अमोघवर्ष राजाच्या वेळच्या एका लेखावरून कायस्थ हे हिंदुस्थानच्या दक्षिणभागात धंद्या निमित्त आले होते असें दिसतें. अमोघवर्ष राष्ट्रकूट ह्याच्या कारकीर्दींत **वाल्ह व कायस्थ** यास जो आश्रय मिळाला होता तो

त्याच्या नंतरच्या राजांनीं कायम ठेविला असें पुढील उताऱ्यावरून दिसतें.

लिखितं चेतद्वल्लभकायस्थवंशजातेन धर्माधिकरणस्थेन मो.

आमचा चरित्रनायक हेमाद्रि हा देवगिरीच्या यादवांचे दरबारांत करणाधिपाचे हुद्यावर होता ही गोष्ट निर्विवाद आहे. वरील विवेचनावरून करणाधिपाच्या हुद्याच्या कार्यक्षेत्रावर बराच प्रकाश पडतो.

ब्राह्मी लिपीपासून नागरी उर्फ देवनागरी लिपी इ. सन ६ व्या शतकांत निर्माण झाली असावी. राष्ट्रकूटवंशीय दंतिदुर्गराजाच्या वेळचा इ. स. ७५४ तील शिलालेख या लिपींत कोरलेला उपलब्ध आहे. देवनागरी लिपी लिहिण्यांत सुबक व सुवाच्य असल्यामुळें ती भरतखंडांत सर्वत्र लोकप्रिय झाली व प्राचीन काळापासून संस्कृत भाषेत रचिलेले बहुतेक सर्व ग्रंथ याच लिपींत लिहिलेले आहेत. यादवांचे राजदरींत देवनागरी हीच लिपी प्रचारांत होती. हेमाद्रि व वोपदेव यानीं लिहिलेले संस्कृत ग्रंथ देवनागरी लिपींतच आहेत. तसेंच रामदेवराव जाधवाचे राजदरींत सनातन हिंदुधर्मियांनीं अगर महानुभावपंथीयांनीं मराठींत लिहिलेले सर्व ग्रंथ देवनागरी लिपींतच आहे.

हेमाद्रि हा करणाधिपाचे हुद्यावर असतांना यादवांच्या राज्याचा विस्तार फार वाढला होता; त्यामुळें दरबारचा राजकीय पत्रव्यवहार मोठ्या प्रमाणावर करणें ओघानें प्राप्त झालें होतें. हात न थांबविता एका लेखणीच्या टाकानें थोड्या वेळांत पुष्कळ मजकूर लिहिता येईल अशा लिपीची हेमाद्रीस जरी भासली असल्यास नवल

नाहीं हेमाद्री हा स्वत विद्वान् लेखक असल्यामुळें स्वाजगी पत्रव्यवहार मोठ्या प्रमाणावर करण्याचा प्रसग त्यास वारवार आला असला पाहिजे नेव्हा सुलभ रीतीनें अल्पावधीत पुष्कळ मजकूर लिहिता येईल अशी एखादी त्वरालिपी नव्यानें शोधून काढण्याची, अगर या नमुन्याची पूर्वी अस्तित्वात असलेली एखादी लिपी प्रचारात आणण्याची कल्पना त्याच्या सुपीक व कल्पक डोक्यातून निघाली असल्यास आश्चर्य नाहीं !

हेमाद्री ह्याचें सस्कृत भाषेवर प्रभुत्व होतें ही गोष्ट त्यानें रचिलेल्या अनेक ग्रथावरून दिसून येते. अनेक लिपींत लिहिलेले सस्कृत ग्रथ त्याच्या नजरेखालून गेले असले पाहिजेत, ही गोष्ट त्यानें ' चतुर्वर्गचिंतामणि ' मध्यें श्रुति, स्मृति, पुराणें वगैरे शेकडों ग्रथा तील उतारे दिले आहेत यावरून सिद्ध होते त्याच्या दाडग्या विद्या व्यासगावरून, ब्राह्मी लिपीपासून निमाण झालेल्या बहुतेक लिपी त्याच्या नेहमींच्या परिचयातील असाव्या असें दिसतें

या लिपींपैकीं पश्चिमी व कुटिल लिपि या, मोडी लिपीच्या धर्ती वर होत्या म्हणजे ह्या लिपींत हात थाबविल्यावाचून एका लेखणीच्या टाकानें थोडक्या वेळात पुष्कळ मजकूर लिहिता येत असें पश्चिमी लिपी कोंकणामध्यें इ स ५ व्या शतकात प्रचलित होती असें काहीं ग्रथावरून दिसून येतें कोंकणप्रात भरतखडाच्या पश्चिम भागात असल्यामुळें तिला पश्चिमी असें म्हणत **कायस्थ** उर्फ **कायथ** अथवा **कैथी** ही नागरी लिपीचें परिवर्तन होऊन तयार झाली आहे कायस्थाचे लेखनकलेंत पिढीजाद प्रावीण्य असल्यामुळें त्यानीं ह्या लिपींस, शीघ्रता व सुलभता आणिली होती ह्यात सशय नाहीं

हेमाद्रीच्या फडणीशी खात्यांत अशा लिपींत निष्णात असलेले बरेच लोक नोकरीवर असले पाहिजेत त्यांच्या लिपींत, शीघ्रता, सुलभता वगैरे विशिष्ट गुण असल्याचें हेमाद्रीचे निदर्शनास आल्या-मुळें तिचा राजकीय व खाजगी व्यवहारांत उपयोग करण्याचें त्यानें ठरविलें असावें हें म्हणणें जास्त सयुक्तिक दिसतें.

देवनागरीच्या एकंदर वर्णमालेंतील कांहीं वर्णांस एकप्रकारचें विशिष्ट वळण देऊन मोडी लिपी तयार झाली आहे. ही गोष्ट पुढें दिलेल्या तिच्या मूळ व विकृत स्वरूपावरून दिसून येईल.

देवनागरी

अ, आ, इ, ई, उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः

𑘀 𑘁 𑘂 𑘃 𑘄 𑘅 ऋ ॠ ऌ ॡ 𑘊 𑘋 𑘌 𑘍 𑘀𑘽 𑘀𑘾

या स्वर मालेंत फक्त चार स्वरास मात्र विशिष्ट वळण दिलेलें आहे.

| देवनागरी. | विकृत स्वरूप मोडीमध्यें |
|---|---|
| क ख ग घ ङ | 𑘎𑘏𑘐𑘑𑘒 |
| च छ ज झ ञ | 𑘓𑘔𑘕𑘖𑘗 |
| ट ठ ड ढ ण | 𑘘𑘙𑘚𑘛𑘜 |
| त थ द ध न | 𑘝𑘞𑘟𑘠𑘡 |
| प फ व भ म | 𑘢𑘣𑘤𑘥𑘦 |
| य र ल व श | 𑘧𑘨𑘩𑘪𑘫 |
| ष स ह ळ | 𑘬𑘭𑘮𑘯 |
| क्ष ज्ञ | 𑘎𑘿𑘬𑘕𑘿𑘗 |

वरील कोष्टकावरून क वर्ग, च वर्ग, व ट वर्ग, ह्यांपैकीं प्रत्येक वर्गातील फक्त दोन अक्षरास मुरटलेले वळण दिले आहे त वर्गातील तीन, प वर्गातील चार, व य, र, ल, व या अतस्थ वर्णातील सर्व अक्षरास, तसेंच श, ष, स, ह ह्या उष्मन् वर्गातील तीन अक्षराम विशिष्ट वळण दिलेलें आहे. एकदर तीस अक्षरांपैकीं फक्त १९ अक्षरासच विशिष्ट वळण दिलें आहे.

वरील विवेचनावरून 'मोडी' ही स्वतंत्र लिपी नसून देवनागरीची अगर कुटिल लिपीची एक उपलिपी आहे असें सिद्ध होतें. अशा तऱ्हेच्या उपलिपी देशकालपरत्वें प्रत्येक देशात प्राचीनकाळीं होत्या व वर्तमानकाळींही अस्तित्वात आहेत. **मोडी** लिपी, यक्षिणीची काडी फिरवून एकाएकीं तयार झालेली नाहीं. तसेंच ती पैदा करण्यास सिंहल-द्वीपास उर्फ लंकेस जाण्याची कोणासही जरूरी नव्हती हेंसाठीला 'मोडी' लिपी आणण्यासाठीं लंकेस जावें लागलें असें विधान करणें म्हणजे त्याच्यासारख्या लोकोत्तर विभूतिचा अपमान करणें होय ''

**ब्राह्मी लिपी** —पूर्वी निर्दिष्ट केलेल्या चौदा लिपींपैकीं गुप्त, कुटिल, नागरी, शारदा, ग्रंथ, कलिंग, पश्चिमी व मध्यप्रदेशी या, **ब्राह्मी**ची विकृत रूपें होत. ग्रंथलिपी मद्रास इलाख्यातील अर्काट, त्रिचनापल्लि, सालेम, मदुरा वगैरे ठिकाणीं प्रचलित आहे. कलिंग लिपी ही मद्रास इलाख्यातील गजम वगैरे प्रांतात प्रचारात आहे. तामील ही मलबार प्रांतात प्रचलित आहे. वटेलट्टु ही तामील लिपींची एक पोटलिपी आहे.

इसवी सनाच्या आठव्या शतकात शारदा लिपि, ही काश्मीर व पंजाबप्रांतात प्रचलित होती. शारदा-लिपीपासून **ठाकरी** नांवाची एक

शीघ्र उपलिपी निर्माण झाली कथी अगर मोडी लिपीप्रमाणे अल्पावधीत पुष्कळ मजकूर लिहिण्याचे कामी या लिपीचा उपयोग करीत बंगलीय लिपि बंगालप्रांतात प्रचलित होती बंगाल येथील एका नारायणपालच्या काळचा एक लेख या लिपींत कोरलेला आहे बंगलीय लिपीपासून नेपाळी, मैथिली, उरिया व बंगालप्रांतात हल्लीं प्रचलित असलेली बंगाली लिपी ह्या निर्माण झाल्या

कैथी अथवा कायथ ( कायस्थ ) लिपी ही नागरीचें परिवर्तन होऊन बनली आहे कुटिल व कैथी या लिपींचा परस्पर निकट संबंध आहे कैथी ही जलद लिहिण्याची लिपी आहे संस्कृतातील संपूर्ण वर्णमालेचा उपयोग या लिपींत करता येत नाहीं ऋ, ऌ, न, न व अगर व या वर्णांत काहीं फरक नाहीं ज, स, थ हीं अक्षरें नागरीपासून भिन्न आहेत मोडी लिपीही कथी अथवा कायस्थ लिपीपासून फारशी भिन्न नाहीं

फारशी भाषेंत **नस्ख** व **शिकस्ता** अशा लिहिण्याच्या दोन पद्धति आहेत ग्रंथ रचनेच्या कामीं ज्या लिपीचा उपयोग केला जातो त्या पद्धतिला नस्ख अशी संज्ञा आहे व जलद लिहिण्याच्या पद्धतीस **शिकस्ता** असें म्हणतात इंग्रजी भाषेंत ग्रंथ लिहिण्याचे कामीं रोमन लिपिचा उपयोग करितात जसें – A B C, D, L I G, H, वगैरे परंतु पत्रव्यवहाराचे कामीं ज्या लिपीचा उपयोग केला जातो तिला *Italics* असें म्हणतात, जसें –*abcdefgh* म्हणजे रोमन लिपि ही फारशी भाषेंतील **नस्ख** पद्धति होय, व *Italics* ही **शिकस्ता** पद्धति होय याप्रमाणें दरएक भाषेंत, ग्रंथ लिहिण्याची लिपि, व्यवहारातील कागदपत्र लिहिण्याचे कामी उपयोगात येत असलेल्या लिपीपासून भिन्न असते

इतिहासाचार्य राजवाडे ह्यांच्यामतें श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायात मोडी लिपीचा अप्रत्यक्ष रीतीनें उल्लेख केला आहे तो येणेंप्रमाणे —

हे बहू असो पंडितू परन्तु नाक्षराचा हातू
वाव्या म्हे वेगवतू न पवाच ।

या ओवीतील वेगवतू हे पद फार महत्वाचें आहे असें राजवाडे यांचें मत आहे. बालबोध अक्षर वेगानें लिहिता येत नाहीं, तेव्हा त्या लिपीसंबधानें वेगवत हा शब्द योजण्यात विशेष अर्थ नव्हता हे पद मोडी अक्षराच्या संबधानें मात्र सार्थ आहे यावरून श्रीज्ञानेश्वरीच्या पूर्वी मोडी अक्षर प्रचारात आलें होतें असें राजवाडे अनुमान काढितात हेमाद्री व ज्ञानेश्वर महाराज हे समकालीन होते. तेव्हा हेमाद्रीच्यापूर्वी मोडी लिपि अस्तित्वात होती हें उघड दिसतें यावरून मोडी लिपीचें जनकत्व हेमाद्रीकडे येत नसून ती त्यानें महाराष्ट्रात राजकीय व खाजगी कागद पत्र लिहिण्याचे कामीं नव्यानें प्रचारात आणिली ह्याच मतास पुष्टि मिळते

मराठ्याच्या इतिहासाची साधनें या ग्रथाच्या आठव्या खडात इतिहासाचार्य राजवाडे यांनी मोडी लिपीसंबधानें आपले विचार प्रगट केले आहेत ते येणेंप्रमाणें —

"ज्ञानेश्वरी हा ग्रथ शके १२१२ ( इ स १२९० ) मध्य लिहिला गेला हेमाद्री हा इ स १२६० पासून देवगिरीच्या जाधवाचा दफ्तरदार होता हेमाद्री हा दफ्तरदार होण्याच्या पूर्वी उत्तर हिंदुस्थानात मुसलमानाचें राज्य होऊन ८० ९० वर्षे झाली होतीं सिंघण राजानें माळवा वगैरे विध्याद्रिच्या पलिकडील प्रात जिकून

घेतले होते तेव्हां मुसलमानांची व म्लेंच्छांची ओळख मराठ्यांना आली होती. ही ओळख होत असतांना मुसलमानांची कागद लिहिण्याची तऱ्हा महाराष्ट्रांत सुरू झाली, व ही सुरू झाल्यावर मोडी लिहिण्याची पद्धत हेमाद्रीला सुचली. ही मोडी लिहिण्याची पद्धत हेमाद्रीनें मुसलमानांच्या शिकस्तानामक पद्धतीवरून घेतली. पारशीत लिहिण्याच्या पद्धति अनेक आहेत, त्यांत नस्ख व शिकस्ता ह्या पद्धति आपल्याकडील बाळबोध व मोडी ह्या पद्धतींशी जुळतात.

नस्ख अक्षर बाळबोधाप्रमाणें स्पष्ट व सुवाच्य असें लिहावें लागतें व शिकस्ता अक्षर मोडून लिहिलेलें असतें. जलदीनें लिहिण्यांत सट अक्षर मोडून लिहिण्याचें जें वळण त्याला फारशींत शिकस्ता म्हणतात. मोडी हा शब्द फारशी शिकस्ता ह्या शब्दाचें हुबेहुब भाषांतर आहे. मोडी ह्या शब्दाचा वाचक शब्द संस्कृतांत अगर महाराष्ट्रांत नाहीं. हा शब्द हेमाडपंतानें फारशी शिकस्ता या शब्दाच्या अर्थाकडे लक्ष देऊन मराठींत अक्षर लिहिण्याचा एका पद्धतीला नव्यानें लागू केला. हेमाडपंतानें अक्षर लिहिण्यांत ही नवी सुधारणा केली तोंपर्यंत महाराष्ट्रांत सर्व लेखी व्यवहार बाळबोध अक्षरांत होत असे. मोडी लिहिण्याचा प्रघात आज ६५० वर्षें चालू असतां भरतखंडांतील इतर कोणत्याही भाषेला हा प्रघात उचलण्याची आवश्यकता दिसली नाहीं. कागदावर लिहिण्याचा प्रघात पडल्याबरोबर मोडी लिहिण्याचाही प्रघात महाराष्ट्रांत एकदम पडला, व हा प्रघात पाडण्याचें प्रथम श्रेय यादवांचा दफ्तरदार जो हेमाद्री त्यास विद्वत्तेच्या व अधिकाराच्या बळावर सहजासहजीं घेतां आलें. मोडी अक्षर देवनागरी अक्षरें मोडून तयार केलें आहे, हें चार पांच

वर्षापूर्वीची जुनी पत्रें व महजर पाहिले म्हणजे सहज दिसून येतें'

इतिहासाचार्य राजवाडे यांनी वरील विचारसरणींत ज्याच गोष्टी गृहित धरल्या आहेत त्या येणेप्रमाणें —

( १ ) मुसलमानांचा हिंदुस्थानात प्रवेश होण्यापूर्वी कागदाची माहिती एतद्देशीय लोकास बिलकूल नव्हती

( २ ) कागदावर लिहिण्याचा प्रघात पडल्याबरोबर, मोडी लिहिण्याचाही प्रघात महाराष्ट्रात लवकरच पडला

( ३ ) हेमाद्रिचे वेळीं फारसी भाषेचा प्रसार महाराष्ट्रात झाला होता

( ४ ) हेमाद्रीस फारशी भाषेचे उत्तम ज्ञान होतें

वरील विधानास राजवाडे यांनी काहीएक आधार दिले नाहीत उलट अलेक्झांडर धि ग्रेट ह्याचा सेनापति नियार्कस यानें हिंदुस्थानात कापूस अगर चिंध्या कुटून कागद फार प्राचीन काळापासून तयार करीत व तो लिहिण्याच्या उपयोगात आणीत असे आपरें ग्रथात खिस्तपूर्व सुमारें तीनशें वर्षांच्या पाठीमागें लिहून ठेवलें आहे ग्रीक व चिनी लोकांनीही हिंदुलोकास कागद तयार करण्याची कला फार प्राचीनकाळापासून अवगत होती असें आपल्या प्रवासवर्णनात लिहून ठेविले आहे यावरून मुसलमानांनी हिंदुस्थानच्या लोकास कागदाची ओळख प्रथम करून दिली ह्या म्हणण्यात तथ्य नाही फारशी भाषेचा प्रवेश दक्षिणेंत तेरावें शतकात अगर त्यापूर्वी झाल्याबद्दलची माहिती कोणत्याही ग्रंथात उपलब्ध नाहीं. हेमाद्रीस फारशी भाषा अवगत होती व हेमाद्रीनें मोडी लिहिण्याची पद्धत मुसलमानांच्या शिकस्तानामक लेखनपद्धतीवरून

घेतली या विधानास राजवाडे यांनी काहींच्च आधार दिला नाहीं उलट, संस्कृत भाषेंत ब्राह्मी, देवनागरी, वगैरे लिपींतून अनेक उप लिपी कालांतरानें निर्माण झाल्या व त्यात पश्चिमी, मध्यमदेशी, कुटिल पेटी, टाकरी, वगैरे जलद लिहिण्याच्या लिपी हेमाद्रीच्या पूर्वी हिंदुस्थानात अस्तित्वात होत्या अशी माहिती लिपिशास्त्रावरील ग्रथात मिळते 'मोडी या अर्थाचा वाचक शब्द संस्कृतात नाहीं, व तो शब्द हेमाडपंतानें फारशी शिकस्ता या शब्दाच्या अर्थाकडे लक्ष देऊन मराठी अक्षर लिहिण्याच्या त्या पद्धतीला नव्यानें लागू केला, असे राजवाडे यांचें म्हणणें आहे परंतु सदरील विधानें वस्तुस्थितीस धरून नाहींत संस्कृतात कुटिल हा शब्द मोडी शब्दाचा वाचक आहे 'कुटिल' म्हणजे वाकडा, मुरडलेला, मोडलेला, 'मोडी' हे 'कुटिल' शब्दाचे मराठींत हुबेहुब रूपांतर होय

हेमाद्रीचा विद्याव्यासंग दांडगा होता ह्यामुळें तत्कालीन वेगवेगळ्या लिपींतले ग्रथ त्याच्या वाचण्यात आले असले पाहिजेत एखादी नवी लिपी शोधून काढण्यास अगर प्रचारात आणण्यास फारशी भाषेंतील लेखनपद्धतिकडे धाव मारण्याची त्यास जरूरी न हती देवनागरी लिपी जलद लिहिता यावी म्हणून तिला वळण देण्याचें यत्न लेखनकलेंत निष्णात अशा कायस्थाकडून, फारशी भाषेचा हिंदुस्थानात प्रवेश होण्यापूर्वी चालू होते, वगैरे हकिगतीचा पूर्वी उल्लेख येऊन गेला आहे

हेमाद्रीने मोडी लिहिण्याची पद्धति लंकेहून आणिली ह्या दंतकथे बद्दल इतिहासाचार्य राजवाडे ह्यांचें मत पुढें लिहिल्याप्रमाणें आहे –

' देवगिरीच्या जाधवांचें साम्राज्य सर्व दक्षिणभर कन्याकुमारी-पर्यंत होतें हे प्रसिद्ध आहे साम्राज्यातील दफ्तरें तपासण्यास कन्या

कुमारी किंवा रामेश्वर ह्या दक्षिणेकडील प्रांतांत जाऊन व कदाचित् लंकेची यात्रा करून परत आल्यावर सर्व दफ्तर मोडींत लिहिण्याचा वटहुकूम हेमाद्रीनें काढला असावा असें दिसतें. लंकेहून परत येण्याला व हा नवा वटहुकूम काढण्याला एकच गाठ पडल्यामुळे लंकेचा व मोडी अक्षराचा लोकांनी विनोदानें संबंध जोडून दिला असेल असें वाटतें. बाकी लंकेतील त्यावेळच्या सिंहलीभाषेचा व मोडीचा कांहीं संबंध होता ह्याला बिल्कुल प्रमाण नाहीं.'

वरील उताऱ्यातील प्रत्येक विधान कल्पनेच्या पायावर रचलेलें असून त्यास इतिहासाचा आधार नाहीं. देवगिरीच्या यादवांचा अमल, म्हैसूर व कर्नाटक या प्रांताच्या दक्षिणेकडील प्रांतावर होता असें दाखविणारा एकही शिलालेख अगर ताम्रपट उपलब्ध नाहीं. हेमाद्रीच्या हातचें, अगर देवगिरीच्या यादवांच्या दफ्तरांतील मराठींत लिहिलेलें एकही चिठोरें उपलब्ध नाहीं. त्यानें तयार केलेली मेस्तकेही उपलब्ध नाहींत, हेमाद्री हा दरबारचे कामासाठीं यादवांच्या राज्यांत दौऱ्यावर निघाल्याबद्दलचा कोठें उल्लेख नाहीं. त्याचे वेळचा एकही वटहुकूम उपलब्ध नाहीं. हेमाद्रीनें मुक्ताफल ग्रंथावर लिहिलेल्या कैवल्यदीपिका नामक टीकेंत, अगर त्याच्या चतुर्वर्गचिंतामणि ग्रंथांतही यावानतींत कांहींएक उल्लेख केलेला आढळत नाहीं. इतिहाससंशोधनाच्या बाबतींत कल्पनाशक्तीस स्वैरक्रीडा करूं देणें केव्हांही चांगलें नाहीं.

लंकेंत मोडी–लिपी प्रचारात नव्हती, त्याठिकाणीं बौद्धधर्मातील हीनयान पंथ चालू होता, व तेथील सिंहली भाषेचा मोडी लिपीशीं कांहींएक संबंध नव्हता, असें राजवाडे कबूल करितात.

मोडी लिपीच्या जनकत्वासंबंधानें सुमारें तीस चाळीस वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत मोठा वाद उपस्थित झाला होता. इतिहासाचार्य राजवाडे व प्रोफेसर रा. रा. भागवत वगैरे विद्वान् गृहस्थाच्या मतें हेमाद्रीनें सदरील लिपी शोधून काढली. सदरील मत प्रस्थापित करण्यासाठीं इतिहासाचार्य राजवाडे यानीं त्यावेळीं जीं कारणें दिलीं होतीं, तींच त्यानीं आपल्या म. इ. साधनें या ग्रंथाच्या ८ व्या खंडांत विस्तृत रूपानें नमूद केली आहेत. परंतु तीं, इतिहास व युक्तिवाद याचे कसोटीस उतरत नाहींत हें दाखविण्याचा आम्हीं यथामति प्रयत्न केला आहे.

रा. ब. बाळकृष्ण आत्माराम गुप्ते यानीं Indian Antiquary नावाच्या इंग्रजी नियतकालिकात सुमारें २५ वर्षांपूर्वी एक लेख लिहून त्यात श्रीशिवाजीमहाराजाचे चिटणीस बाळाजी आवजी यानीं मोडी लिपी इ. स. १५६५ त प्रथम शोधून काढली असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्या मताचें समर्थन करण्यासाठीं त्यानीं जीं कारणें दिलीं आहेत ती येणेंप्रमाणें –( १ ) श्रीशिवाजीमहाराजाचे पूर्वीचा एकही मोडी लेख उपलब्ध नाहीं; ( २ ) पंढरपूरच्या देवळांतील जमाखर्ची लेखात मोडी लिपीचा मागमूस नाहीं; व (३) प्राचीन ताम्रपटात, मोडी लिपी आढळत नाहीं. नाशिक येथील तीर्थोपाध्ये वे. गिरिधर ऊर्फ गिरीभट क्षेमकल्याणी याचेकडे जुन्यात जुनी वही त्यास सरकारमार्फत मिळाली होती. त्यात ८५ मोडी लेखांपैकीं ८० लेख कायस्थ प्रभूचे निघाले. जुन्यात जुना मोडीलेख शके १५६५-इ. स. १६४३ पलिकडला नाहीं. असें या वह्याच्या संशोधनात निष्पन्न झालें. बाळाजी आवजी याचे वडील जंजिऱ्याचे शिद्याचे नोकरींत

असता, त्यास आपल्या यजमानाबरोबर दिल्लीदरबारात पुष्कळ वेळा जाण्याचा प्रसंग येत असे तेथें असताना फारशी भाषेंतील जलदी लिहिण्याच्या शिकस्ता पद्धतीच्या वळणावर मोडी लिपीची कल्पना त्यांनें प्रथमच काढली' व देवनागरी लिपींत योग्य फरक करून चिटणीशी वळणाची नवी लिपी बनविली असें रा. व. गुप्ते यांनी या लेखात म्हटलें आहे. फारशी भाषेंतील शिकस्ता पद्धतीवरून 'मोडी' लिपीची कल्पना निघाली याबाबतीत मात्र राजवाडे व गुप्ते यांचें एकमत दिसतें परंतु तिच्या जनकत्वासंबंधानें त्याच्यात मतभेद आहे. राजवाडे यांचे मताप्रमाणें मोडी–लिपीची कल्पना पहिल्या-प्रथम हेमाद्रीनें काढली रा. व. गुप्ते याच्या मताप्रमाणे 'कारकुनी पेशाचे आदिस्थानीं विराजमान असलेले राजकारणी खरे सूत्रकार बाळाजी आवजी यांनीं आपल्या बुद्धिकौशल्यानें मोडी लिपी शोधून काढली व श्रीशिवछत्रपतींनें तीं प्रचारात आणली' आमच्या मतें या वादात शास्त्रीयसंशोधनापेक्षा उभयपक्षीं ज्ञातिविषयक वृथा-भिमानाची छटा दिसून येते

भरतखंडात मुसलमानाचा प्रवेश होण्यापूर्वी, ब्राह्मी, देवनागरी, वगैरे ऐतद्देशीय प्राचीन लिपीमध्यें कालपरत्वें जी परिवर्तनें अगर फेरफार झाले त्याचा सूक्ष्म रीतिनें अभ्यास केल्यानें व निरनिराळ्या लिपींत वेळोवेळीं कसकसे फेरफार झाले याचें मनन केल्यानें या वादग्रस्त विषयाचा निकाल सहज लागणार आहे

लिपिशास्त्राच्या अनुरोधानें आम्ही या भागात जें विवेचन केलें आहे त्यावरून राजवाडे व गुप्ते यांचीं मतें विचारात घेण्यास फार अडचणी येतात पेशवाईत, या मोडी लिपीस आणखी एक प्रकारचें

नवीन वळण मिळालें, व तें ' निवळकरी ' वळण या नावानें प्रसिद्ध आहे. शुद्ध हेमाद्रीच्या वेळच्या मोडी लेख उपलब्ध झाल्यास त्यांत व हल्लींच्या मोडीच्या स्वरूपांत बराच फरक असल्याचें दिसून येण्याचा संभव आहे.

मोडी हा शब्द मौर्य–मार्या–मोडी–मोडी या परंपरेनें सिद्ध झाला असें मानून ही लिपी मौर्यराजा चंद्रगुप्त व त्याचा नातु अशोक ह्यांचे राजवटींत चनली असा आमच विद्वानांचें मत आहे. परंतु अलि-कडे लिपिशास्त्रावर तज्ज्ञांनीं सोपपत्तिक ग्रंथ लिहिले आहेत त्यांचा अभ्यास करून या बाबतींत अधिक संशोधन करतां येण्याजोगें आहे.

लेखनकलेंत फार प्राचीनकाळापासून निष्णात असलेल्या कायस्थांनी देवनागरीस एक प्रकारचें वळण अगर ल्पेट देऊन लिहिण्याचे कामीं तिला सुलभता आणली व अशा तऱ्हेची लिपी हेमाद्रीचे वेळीं अस्तित्वांत होती असें पूर्वीं सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. व्यवहारदक्ष हेमाद्रीनें ती फक्त प्रचारांत आणली असें म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं.

मोडी लिपी बंद करून मराठी प्रांतांतील सर्व कोर्टांतील व्यवहार बाळबोधांत चालावे असा मुंबई सरकारनें कांहीं वर्षांपूर्वीं वटहुकूम काढला होता. त्यावेळीं बाळबोध अक्षर कितीही जलदीनें लिहिलें तरी त्याला मोडी लिपीची सर येत नाहीं असें दिसून आलें. शिवाय अशा रीतीनें जलद लिहिलेलें लिखाण अत्यंत दुर्बोध होत असे, असा कटु अनुभव आल्यामुळें सरकारास आपला वट हुकूम परत घेणें भाग पडलें. हेमाद्रीनें मोडी लिपी स्वतः तयार केली याबद्दल कांहींएक ऐतिहासिक पुरावा नाहीं. शिवाय मोडींत लिहिलेलें तत्कालिन एकही लिखाण अस्तित्वांत नाहीं. सबब या बाबतींत साधार पुरावा पुढें येईपर्यंत

परंपरागत आलेल्या गोष्टीवर अथवा दंतकथेवर भरंवसा ठेवणें योग्य दिसत नांहीं.

इ. स. १७३९ तील मोडी लिपीचा मासला म्हणून थोरल्या बाजीरावाचे धाकटे बंधु चिमणाजी आप्पा यांचें स्वदस्तुरचें मोडींत लिहिलेले पत्र पुढें दिलें आहे:—

श्री



वरील मोडी लिपीचें देवनागरींत रूपांतर.

श्री.

अखण्डित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री अन्ताजी रघुनाथ गोसावी यासीः—

सेवक चिमणाजी बल्लाळ नमस्कार सुरुसन सलासिनमया व अलफ तुम्हीं पत्र पाठविलें ते प्रविष्ट जाहलें. लखनार्थ विस्तारें कळला.

ऐशियास मुख्य भावार्थ की, अवघा प्रसंग सत्य भासून कर्तव्य असेल तें तैसीच आज्ञा करावी नाहीं तरी दुराशेंत गुताविं सारिखें नाहीं म्हणून लिहिलें; ऐशियास अवघा प्रसंग तुम्हीं प्रत्ययास आणून दिला आहे, त्यास अनृत्य कायें निमित्य भासेल. अवघा प्रसंग सत्यच आहे. व कार्यही कर्तव्य आहेच आहे. तुम्हीं चित्तांत संशय आणोवा ऐसा अर्थ नाहीं. कर्णाजी शिंदे यांजकडून मनुष्य देविलें ते आले नाहीं म्हणून लिहिलें, त्यास मनुष्याविसी पहिलें लिहिलें होतें; हलीही लिहिले आहे. ते मनुष्य देतील. जाणिजे छ २२ जावान आज्ञांकित.



## भाग ७ वा.

### महानुभाव-पंथीय मराठी वाङ्मय.

सर्वं मद्भक्तियोगेन मद्भक्तो लभतेऽञ्जसा ॥
स्वर्गापवर्गं मद्धाम कथंचिद्यदि वाञ्छति ॥ १ ॥
नैरपेक्ष्यं परं प्राहुर्निःश्रेयसमनल्पकम् ॥
तस्मान्निराशिषो भक्तिर्निरपेक्षस्य मे भवेत् ॥ २ ॥
एवमेतान्मयादिष्टाननुतिष्ठन्ति मे पथः ॥
क्षेमं विंदन्ति मत्स्थानं यद्ब्रह्म परमं विदुः ॥ ३ ॥

श्रीमद्भागवत ( एकादश स्कंध अ. २० )

नानामतें पाखांडें । कर्मठता आणि बांडें ।
त्यांचीं ठेचावीं तोंडें । हरिभजनें ॥ ३ ॥
जें जें हरीचें लीलाचरित । तें तें माझेंचि स्वतंत्र ।
देव भक्त एकत्र । भेद नाहीं. ॥ ४ ॥
जो जो अवतार हरी धरी । तो तो सोच अवधारी ।
हरिनाम गजरीं । जगदोद्धारी ॥ ५ ॥
सर्वांभूतीं भगवद्भावो । हा भक्तांचा निजनिर्वाहो ।
धर्माचा आग्रहो । वाढवणें ॥ ६ ॥
सर्वांभूतीं दया शांती । प्रतिपाळावी वेदोक्ति ।
देवचि एक निश्चिती । करणें आवा ॥ ७ ॥
लीलाविग्रही भगवंत । तया म्हणती नित्यमुक्त ।
आम्हा काय तेथें । वेगळे असों । ॥ ८ ॥ (एकनाथ)

भरतखंडांत श्रुतिकालापासून, सृष्टीची उत्पत्ति कशी व केव्हां झाली? तिचा उत्पादक कोण? आत्मा नित्य कीं अनित्य? जीवात्मा व परमात्मा यांचे परस्पर संबंध काय आहेत? वगैरे गहन विषया-

कडे तत्कालिन तत्त्ववेत्त्याचें लक्ष वेधलें होतें. ह्या विषयावर चिकित्सकबुद्धीनें विचार करून तत्कालिन ऋषींनी जे सिद्धांत ठरविले ते त्यांनीं आरण्यकें, ब्राह्मण, उपनिषदें वगैरे ग्रंथांत लिहून ठेविले आहेत. ज्या त्या तत्त्ववेत्त्यानें आपापल्या दृष्टीनें ह्या आध्यात्मिक विषयाचा अनेक बाजूंनी विचार केला होता, त्यामुळें त्यांच्यामध्यें एकवाक्यता दिसून येत नाहीं. ह्या मत-वैचित्र्यामुळें एकाच विषयासंबधानें अनेक तत्त्ववेत्त्यांची भिन्न भिन्न मतें असलेली दिसतात. काहींच्या मतें, एका अगम्य व अनिर्वचनीय शक्तीच्या योगानें सृष्टि निर्माण झाली असून तिचें चालकत्व या शक्तीकडे आहे. या मताचे लोकांस सेश्वरवादी म्हणतात. उलट पक्षीं, सृष्टीची उत्पत्ति स्वयंभू असून निसर्गाच्या काहीं ठराविक नियमान्वयें तिचे व्यापार सुरळितपणें चालतात, आणि प्रत्येक सृष्ट पदार्थास उत्पत्ति, स्थिति व लय असून दरएक स्थितींतून त्यास क्रमाक्रमानें जावें लागतें, असें कित्येकांचें मत आहे. या मतवाद्यास निरीश्वरवादी ( पाखंडी ) असें म्हणतात. ब्रह्मसूत्रकार, योगसूत्रकार व नैय्यायिक ह्यांची गणना सेश्वरवाद्यांत होऊं लागली. सांख्य, वैशेषिक, लोकायतिक ( चार्वाकमतानुयायी ) ह्यांचा अंतर्भाव निरीश्वरवाद्यांत होऊं लागला. सर्व उपनिषदांचें सार जी श्रीमद्भगवद्गीता, तिच्यांत ईश्वराचें आस्तिक्य प्रतिपादिलेलें असून सकृद्दर्शनी भिन्न दिसणाऱ्या सांख्य व योग मताचा गीताकारानें समन्वय करण्याचा प्रयत्न केला आहे. निरीश्वरवाद्यांना श्रीमद्भगवद्गीतेंत बिलकुल थारा नाहीं. गीताकाल व रिस्तिधर्माचा उदय याचे दरम्यान जो काल गेला त्यांत जैन, बुद्ध वगैरे धर्मांची स्थापना झाली. या दोनही धर्मांचे संस्थापकांना वेदांचें

प्रामाण्य, ईश्वराचें आस्तित्त्वमणि वर्णाश्रमधर्म हीं ममत नसल्यामुळें त्याची गणना निरीश्वरवाद्यांत होत असे

शुद्ध वेदान्तमताद्यांत दोन मुख्य पक्ष निर्माण झाले अद्वैतवादी व द्वैतवादी, अद्वैतवाद्यांत, केवलाद्वैती व विशिष्टाद्वैती असे दोन पोट भाग निर्माण झाले श्रीमच्छंकराचार्य हे केवलाद्वैती मताचे पुरस्कर्ते होते श्रीरामानुजाचार्य हे विशिष्टाद्वैतमताचे प्रवर्तक होते श्रीमध्वाचार्य व श्रीवल्लभाचार्य हे द्वैतमतवादी होते श्रीमच्छंकराचार्यांनीं आपल्या लोकोत्तर बुद्धिमत्तेच्या व तर्कशास्त्राच्या जोरावर अद्वैतमताचें मंडण करून, सांख्य, वैशेषिक, जैन, बौद्ध, चार्वाक् वगैरे अवैदिक मतांचें खंडण केलें व एकंदर जनसमूहांत आपल्या अद्वैतमताचा पगडा बसविला. त्यामुळें त्यांस जगद्गुरू ही पदवी प्राप्त होऊन भरतखंडाच्या चार दिशेस आचार्यांच्या चार मठांची स्थापना झाली ही गोष्ट सन इ स ७ व्या अथवा ८ व्या शतकांत घडून आली.

वेदांतमताच्या प्रसारामुळें जैन व बौद्धधर्मास उतरती कळा लागली परंतु त्यामुळें सदरील धर्मांचें भरतखंडांतून उच्चाटन झालें, अशी जी सार्वत्रिक समजूत आहे ती बरोबर नाहीं बौद्धधर्म हा अहिंसा, भूतदया, विश्वबंधुत्व व समाजसेवा वगैरे उदात्त तत्वाच्या पायावर उभारलेला असून, सनातन हिंदुधर्मांतील पुनर्जन्म, पूर्वकर्म शील, प्रज्ञा, समाधि वगैरे तत्वें त्यास मान्य होतीं बौद्धधर्म भरत खंडांत सुमारें हजारबाराशें वर्षें प्रचलित असल्यामुळें अहिंसा, विश्वबंधुत्व वगैरे त्यांतील विशिष्ट मतें सामान्य लोकांत दृढमूल झालीं होतीं या परिस्थितीमुळें सनातन वर्णाश्रमधर्माच्या मूळस्वरूपांत बराच ढिलेपणा आला होता



महाराष्ट्र-सारस्वत-मयूर.

कै. विनायक लक्ष्मण भावे.

न्म ६-११-१८७१ ] [ मृत्यु १२-९-१९२६

इ. स. आठव्या व नवव्या शतकाच्या दरम्यान श्रीमद्भागवत-पुराण रचलें गेलें, असें विद्वान लोकांचें मत आहे. ह्या पुराणाच्या रचना-कालासंबधानें अद्याप एकमत नाहीं. परंतु श्रीमदाद्यशंकराचार्यांचे अगोदर सदरील पुराण अस्तित्वांत नव्हतें, ही गोष्ट निर्विवाद होय. इ. स. आठव्या शतकाच्या सुमारास भरतखंडांत निरनिराळे धर्म व पंथ प्रचलित होते. भागवतकारांनीं दशावताराच्या कल्पनेनें त्या सर्वांचे मोठ्या खुबीनें एकीकरण करण्याचा प्रयत्न केला व तो बऱ्याच अशानें सिद्धीस गेला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. उदाहरणार्थ **रामायणांत** ज्या **गौतमबुद्धास** चोर असें म्हटलें आहे, (यथा चोरस्तथा बुद्ध) त्याचा भागवतकारांनीं दशावतारांत समावेश केला आहे ही विचारक्रांति होण्यांत कोणतीं कारणें झालीं अस-तील याचा सर्वधर्मांचा तौलनिक रीतीनें अभ्यास करणारांनीं ( Students of Comparative religions ) अवश्य विचार करावा.

श्रीमद्भागवतपुराण हा ग्रंथ श्रीमद्भगवद्गीतेची आधुनिक काला-तील सुधारलेली आवृत्ति होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. सदरील पुराणांत श्रीकृष्णाच्या कथानकास व त्याच्या अतर्क्य लीलांच्या वर्णनास प्राधान्य दिलें असून तो परमेश्वराचा पूर्णावतार होता असें प्रतिपादन केलें आहे. सनातन वेदिक धर्माच्या मूळ स्वरू-पास धरून निव्वळ भक्तीच्या जोरावर परमेश्वरप्राप्ति करून घेता येते, असें या पुराणांत प्रतिपादिलें आहे परमेश्वराच्या स्वरूपाचें ज्ञान भक्तिमार्गानें करून घेणें हा भागवत पुराणाचा मुख्य विषय असून सर्व गोष्टी दुय्यम प्रतीच्या मानिल्या आहेत वर्णाश्रमधर्म हें

भागवतधर्माचें सर्वस्व नसल्यामुळें त्याचें उल्लंघन या धर्माच्या आड येत नाहीं. एकंदरीत भागवत पुराणानकर्माला गौणपणा दिलेला असून तांत्रिक उपासना पद्धतीला प्रामुख्य दिलें आहे असें दिसतें. सामान्यजनांनीं आपल्या उपास्य देवतेची अनन्यभावनेनें पूजा करून त्याचें गुणानुवाद गावे व ते नित्य श्रवण करावें व सदाचरणानें वागावें अशी भागवतधर्माची शिकवण आहे. भगवंताविषयीं प्रेम-भक्ती अशा रीतीनें उत्पन्न होऊन ती स्थिर झाल्यावर, त्याचें सगुण स्वरूप कळू लागतें; व त्या स्वरूपाची जाणीव झाल्यावर त्याचेविषयीं भक्ति उत्पन्न होऊन तिजमध्यें जीव पूर्णपणें नित्य रगून जातात व हरिगुण-गायन हेंच त्याच्या आयुष्याचें इतिकर्तव्य होतें. अजामिळ, प्रल्हाद, उद्धव, अक्रूर, सुदाम वगैरे भक्तांच्या उदाहरणावरून, भागवतकारानीं सदरील तत्व लोकांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला आहे. अखिल भूतमात्र हेंच परमेश्वराचें स्वरूप होय असें ओळखून सर्वांकडे समदृष्टीनें पाहणें हेंच श्रेष्ठ भक्तीचें लक्षण होय, असें भागवतात प्रतिपादिलें आहे. शालिवाहन शकाच्या बाराव्या शतकापर्यंत भरतखंडात वैष्णव, शैव, वीरशैव ( लिंगायत ) शाक्त ( वाममार्गी, अघोरी पथ ), नाथपंथ वगैरे नानाविध पथ अस्तित्वात होते.

हेमाद्री हा शके ११७१ पासून देवगिरीचा यादवराजा महादेवराय व रामदेवराव जाधव याचे राजवटींत करणाधिपाचे हुद्यावर असतानां महाराष्ट्रात आणखी एका नव्या पंथाची भर पडली. देवगिरी येथें अगर त्याच्या आसपासच्या प्रातात श्रीचक्रधर नांवाचा निवृत्तिमार्गी महाराष्ट्रीय ब्राह्मण रहात होता. तो पूर्ण वैराग्यशील असून

श्रीकृष्णाचा निस्सीम भक्त होता. त्याचा पूर्वाश्रमीचा इतिहास उपलब्ध नाहीं. भावे यांच्या ' महाराष्ट्र सारस्वतां'त अगर श्रीयुत यशवंत खुशाल देशपांडे यांच्या 'महानुभवीय मराठी वाङ्मय' नांवाचे ग्रंथांत त्याचें त्रोटक चरित्र दिलें आहे. परंतु तें सांप्रदायिक स्वरूपाचें असल्या-मुळें इतिहासाच्या कसोटीस कितपत उतरेल याबद्दल शंका आहे. शके ११८५ चे सुमारास त्यास श्रीदत्तात्रयाचा साक्षात्कार होऊन त्यानें सन्यास दीक्षा घेतली. श्रीकृष्ण हा पूर्णावतार असून त्याची अव्यभिचारी भक्ति केल्यानें मोक्षप्राप्ति त्वरित होते असें त्याचें ठाम मत होतें. त्यानें श्रीकृष्ण उपासना, अहिंसा, भूतदया व वैराग्य वगैरे विषयावर लोकांस उपदेश करण्याचा उपक्रम केला तीव्र विरक्ति सदाचारसंपन्नता, श्रीकृष्णावरील अढळ भक्ति, सर्व प्राणिमात्राविषयीं भूतदया व समाज-समता वगैरे त्याचे अंगीं असलेल्या अलौकिक गुणामुळें सर्व प्रकारच्या लोकांवर त्याची छाप तात्काळ बसली. गौतम बुद्धाप्रमाणें लोकांच्या नेहमीच्या बोलण्याच्या भाषेंत उपदेश करण्याचा व ग्रंथ लिहिण्याचा त्यानें उपक्रम केल्यामुळें, त्याच्या मताचा फैलाव असंख्य लोकांत झाला. सनातन वैदिक धर्मांतील काहीं विद्वान् लोक त्याचे पट्टशिष्य बनले भागवतपुराणांतील मुख्य तत्वें या पंथास मान्य असल्यामुळें श्रीचक्रधराचा उपदेश सामान्य जनास सहज पटू लागला. आपल्या मातृभाषेंत भागवतधर्माच्या उच्चतत्वानें भरलेलें उपदेशामृत प्यावयास मिळाल्यामुळें, सामान्य जनास मोक्षाचेंद्वार अनायासें खुलें झालें असें वाटू लागलें. श्रीचक्रधर स्वामींचा शिष्य-सांप्रदाय फार वाढल्यामुळें दूरदूरचे लोक त्याचे अनुयायी बनले. या सांप्रदायास " महानुभाव अथवा महात्मापंथ असें नांव पडलें. या पंथाचें उपास्य दैवत

केवळ श्रीकृष्ण असल्यामुळें या सांप्रदायास जयकृष्णीपंथ असेंहि म्हणतात.

देवगिरीचा यादवराजा कान्हेर अगर कन्हरदेव हा आपला धाकटा भाऊ महादेव यास बरोबर घेऊन श्रीचक्रधरस्वामींचे भेटीस गेला होता असा उल्लेख लीलाचरित्रांत केलेला आहे. कन्हरदेवानें स्वामीस दक्षिणा म्हणून बरेंच द्रव्य देऊं केलें असतां त्यांनीं तें स्वीकारण्याचें नाकारिलें. त्यामुळें स्वामींच्या निस्पृहतेबद्दल व कट-कडीत वैराग्याबद्दल यादवराजाची खात्री झाली.

रामदेवराव जाधवाचे राजवटींत महानुभावपंथाचा व तत्पंथीय वाङ्मयाचा अनपेक्षित रीतीनें उत्कर्ष झाला याचीं कारणें पूर्वी (भा. ४ पृ १०७-१९५ मध्यें) दिलीं आहेत. महानुभावीय ग्रंथकारांस राजाश्रय मिळाल्यामुळें त्यांनीं मराठी भाषेंत मोठ्या प्रमाणावर ग्रंथरचना केली. सदरील पंथाच्या अनुयायांमध्यें प्रतिभासंपन्न ग्रंथकार व कवि बरेच निर्माण झाले. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे जन्मापूर्वी या पंथाचा लीलाचरित्र नांवाचा धर्मग्रंथ लिहिला गेला असें म्हणतात. प्रस्तुत ग्रंथाच्या २०९ पृष्ठावर यादवकालीन महानुभावीय ग्रंथांची यादी दिली आहे तिजवरून ज्ञानेश्वरीच्यापूर्वी महानुभाव पंथाचे कांहीं ग्रंथ लिहिले गेले असावेत असें दिसतें. देवगिरीच्या यादवांचें राज्य नष्ट झाल्यावरहि या पंथांत नांणावलेले कवि व ग्रंथकार बरेच निर्माण झाले, व त्यांनीं मराठी वाङ्मयांत चांगली भर घातली. या वाङ्मयांतील ग्रंथांची संख्या सुमारें ४ पासून पांच हजार असावी असा अंदाज आहे. व त्यांत श्रेष्ठ दर्जाचे ग्रंथ बरेच आहेत असें भावे व देशपांडे यांचें मत आहे. इ. स. १९०७ सालपर्यंत विवेकसिंधु व ज्ञानेश्वरी हे मराठी

वाङ्मयातील आद्यग्रंथ समजले जात असत. येवढें मोठें मराठी वाङ्मय सुमारें ६००-७०० वर्षे कालाच्या उदरात कसें दडून राहिलें व तें एकाएकी उजेडात कसें आलें याबद्दल पुष्कळ लोकास अचंबा वाटतो. प्रस्तुत लेखकाचा या प्रश्नाशीं निकट संबंध असल्यामुळें त्याचा वृत्तांत थोडक्यांत पुढें देण्यात येत आहे. त्यावरून या प्रश्नाचा उलगडा सहज होईल.

पुणें येथील रहिवाशी ब्रह्मीभूत विष्णुबुवा जोग हे वारकरी पंथापैकीं एक प्रमुख होते. इ. स. १९०७ सालीं पूर्वखानदेशांतील एणगाव येथें एका कीर्तनप्रसंगीं त्यांनीं महानुभावपंथाच्या उत्पत्तीबद्दल, खोटसाळ निधानें करून सदरील पंथाची मोठ्या जनसमूहापुढें बदनामी केली. त्याचा सारांश असा कीं, कृष्णभट नावाच्या एका ब्राह्मणानें एका मांग जातीच्या स्त्रीबरोबर लग्न केलें, व या संबंधापासून त्यास चार मुलगे झाले, त्यांपैकीं एकाचें नांव मांगभाव असें होतें त्याजपासून मांगभाव–मानभाव–महानुभाव पंथाची उत्पत्ति झाली. अशा तऱ्हेची या पंथाची नालस्ती केल्यामुळें खानदेशांत महानुभाव पंथीय भिक्षुस भिक्षा मिळण्याचें बंद झालें, व त्याचेबद्दल लोकांचें मनात असलेला आदर कमी झाला. महानुभावपंथातील प्रमुख मंडळींनी विष्णुबुवा जोग ह्यांजवर जळगाव येथें मेहरबान चौलस् साहेब याचे कोर्टांत आपल्या पंथाची बदनामी केल्याबद्दल फौजदारी खटला केला. त्याकामीं फिर्यादी महानुभावांतर्फे पुण्याचे सुप्रसिद्ध वकील कै. रा. ब. आपटे, व प्रस्तुत लेखक काम चालवीत होते. फिर्यादी तर्फेच्या साक्षीच्या यादींत लोकमान्य टिळक याचें नाव होतें. परंतु त्याच्या पुराव्याची जरूरी न भासल्यामुळें कोर्टानें

जोगावर इ पी कोड ५०० अन्वये महानुभाव पंथाची बेअब्रू केल्याबद्दलचा आरोप ठेविला आरोपीतर्फे पुरावा घेण्याची तारीख नेमिली होती त्या दिवशीं त्याचेतर्फे काम चालविण्यास मुंबईतील एक युरोपियन सॉलिसिटर हजर झाले त्यांनीं इंपीरियल गॅझेटिअर व्हाल्यूम १२ पृ ८२ मध्यें महानुभावपंथासंबंधीं सरकारी-रीत्या जी हकीकत प्रसिद्ध झाली होती ती कोर्टाच्या नजरेस आणिली आरोपानें केलेलीं विधानें या हकीकतीशीं जुळत असल्या मुळें आरोपास त्याचा फायदा मिळून कोर्टानें त्यास दोषमुक्त केलें खटल्याचा निकाल झाला त्यादिवशीं विष्णुबुवा जोग यांचे नेतृत्वा खालीं त्यांचे वारकरी अनुयायांनीं महानुभावास खिजविण्याकरिता जळगाव येथें एक प्रचंड मिरवणूक काढिली होती सदरील खटल्याच्या प्रतिकूल निकालामुळें खानदेशातून आपलें उच्चाटन होईल कीं काय अशी महानुभावीयांना मोठी दहशत पडली !!

बिनसरकारी फौजदारी खटल्यात आरोपीवर कोर्टानें आरोप ठेव ल्यानंतर तो क्रि प्रो कोडच्या विवक्षित कलमाखालीं दोषमुक्त झाल्यास फिर्यादीस त्या निकालावर अपील करण्याचे कामीं कायद्याच्या फार अडचणी असतात यामुळें जोगाच्या विरुद्ध वरिष्ठ कोर्टाकडे अपील करण्यात आलें नाहीं पूर्व खानदेश जिल्ह्याचे त्यावेळचे कलेक्टर मेहेरबान् सि कॉक्स् यांचेकडे या निकालाविरुद्ध फिर्यादीतर्फे तपासणी अर्ज करण्यात आला होता परंतु त्याकामीं त्यास यश आलें नाहीं याप्रमाणें कायद्यानें आपला बचाव करून घेण्याचे सर्व मार्ग खुंटल्यामुळें महानुभवपंथाची अत्यंत निराशा झाली

इंपीरिअल गॅझेटिअर व्हा १२ पा ८२ मध्यें महानुभाव-पंथा-संबंधीं दिलेला मजकूर सपशेल खोटा आहे असें ठरवून त्याऐवजीं

मदरील पथाची साधार माहिती प्रसिद्ध केल्यावाचून या वादाचा कायमचा निकाल लागणार नाहीं अशी प्रस्तुत लेखकानें महानुभाव-पथाचे पुढारी महंतास सल्ला दिली, व ती त्यास पसत पडली हा हेतु सिद्ध व्हावा म्हणून महानुभावीय धर्मग्रथावरून व अन्य पुराव्यानें इपीरिअल गॅझेटिअर ज्या विद्वान् गृहस्थाच्या नेतृत्वाखाली सरकाराकडून प्रसिद्ध केलें जात होतें त्याची खातीरकरून देणें जरूर होतें याकामी मदत करण्यासाठीं रामचद्रबुवा वडगावकर, जामोदकरबुवा वगैरे महानुभव पथाचे पुढाऱ्यानीं आपल्याबरोबर जरूर ते ग्रथ आणून आमचे येथें बरेचदिवस वास्तव्य केलें त्याच्या मदतीनें प्रस्तुत लेखकानें इग्रजी भाषेत विस्तृत निबध तयार केला इंपीरिअल गॅझेटिअरमध्यें या पथाबद्दल दिलेली माहिती सपशेल खोटी होती असें सदरील ग्रथावरून आम्हास दिसून आलें

त्यावेळीं मुबईचे कलेक्टर ए एम् टी जॅक्सन या नावाचे एक सिव्हिलीयन होते त्याच सस्कृत भाषेवर प्रभुत्व असून शिवाय मराठी भाषेवर प्रेम होतें कै विनायकराव भावे यांचें "महाराष्ट्र कवि" ह्या नावाचें मासिक तें मोठ्या आस्थेनें वाचीत असत त्यानीं उत्तरकोकणातील folklore या नावाचें पुस्तक मोठ्या परिश्रमानें तयार करून छापिलें निरनिराळ्या इग्रजीनियतकालिकात त्यानीं विद्वत्ताप्रचुर लेख प्रसिद्ध केले होते, त्यावरून त्याची गणना विद्वानात होत असे फावल्यावेळात प्राचीन-इतिहाससशोधनाचें काम ते आस्थापूर्वक करीत असत. प्रस्तुत लेखकानें उपरिनिर्दिष्ट निबध साहेबमजकुरास दाखविला त्यानीं महानुभावीय मूळ ग्रथातील समर्पक उतारे स्वत वाचून निबधातील मजकुराच्या खरेपणाबद्दल

गाठी करून घेतली. महानुभावीय वाङ्मयात श्रीमद्भगवद्गीतेवर 'मंगलयदीपिका' या नावाची संस्कृतात लिहिलेली टीका आहे, ती त्यांचे अवलोकनात आली, व ती त्यास फार आवडली. इंपी- रिअल गॅझेटिअरमधील महानुभावपंथासंबंधानें प्रसिद्ध झालेला खोडसाळ मजकूर काढून टाकण्याबद्दल त्यांनी मि एन्थोव्हेन यास एक शिफारस पत्र लिहिलें. मि. एन्थोव्हेन साहेब यांनी याकामी बरीच सहानुभूति दाखविली. परंतु सदरील विषय त्यास प्राचीन मराठी भाषा नीट समजत नसेल त्याचा असून, आपणास यासंबंधीं काहीं करिता येत नाही, असे त्यांनी मोठ्या दिलगिरीनें कळविलें. नंतर सदरील लेख व महानुभावीय ग्रंथ डॉ. भांडारकर ह्यास प्रस्तुत लेखकानें दाखवून, याकामीं मदत करण्याबद्दल त्यास विनंति केली. डॉ. रामकृष्णपंतानीं आम्ही तयार केलेलें टाचण व महानुभावीय ग्रंथ आपलेपाशीं ठेवून घेतले, व गुप्तलिपीतील मजकूर समजून घेण्यासाठीं महानुभावीय महंतास पुणें येथें राहण्यास सांगितलें. डॉ. भांडारकरानीं त्याच्या ग्रथाचें निरीक्षण करून एक स्वतंत्र लेख तयार करून तो टाईम्स ऑफ इंडियामध्यें प्रसिद्ध केला व महानुभावपंथासंबंधानें सरकारी रीतीनें प्रसिद्ध झालेली हकीकत खोडसाळ व निराधार आहे असें त्यांनीं आपलें ठाम मत दिलें. त्याच्या परिश्रमाचें फळ मुंबई एथ्नालॉजिकल मालेंतील (Ethnological Survey Series) १३१ नंबरचा मोनोग्राफ् हें होय. सर रामकृष्ण पंत भांडारकर याच्या परिश्रमामुळे महानुभावपंथासंबंधानें खरी व ऐतिहासिक माहिती इंपीरिअल गॅझिटिअर व्हॉ. १३ मध्यें प्रसिद्ध करण्यात आली. याप्रमाणें महानुभाव पंथासंबंधानें जो अन्याय

करण्यात आला होता तो दूर झाला. व त्याची वेळी अवेळी बद-नामी करण्यात उद्युक्त असलेल्या विरोधी पक्षाचे तोंट कायमचे बद झाले.

मेहरवान जॅक्मन साहेब, डॉ भाटारकर व त्यास मदत करणारे गृहस्थ याचे महानुभावपथीयानी तत्कालीन दैनिक पत्रातून कृतज्ञ-बुद्धीपूर्वक आभार मानिले. जळगाव नजिक भादली गाव आहे तेथे महानुभावपथाचा एक मठ आहे त्या ठिकाणी महानुभावीय महताची व प्रस्तुत लेखकाची एक बैठक होऊन त्यात महानुभावीय वाङ्मयाचे एकाद्या महाराष्ट्रभाषाभिज्ञ गृहस्थाकडून सशोधन करवून ते प्रसिद्ध करण्याचे बहुमतानें ठरले. व याकामी ठाणे येथील आमचे सहा-ध्यायी मित्र व महाराष्ट्र भाषेचे निस्सीम भक्त कै विनायक लक्ष्मण भावे यांचें नाव आम्हीं साहजिकच सुचविलें विनायकराव भावे यानी ठाणें येथें मोठ्या परिश्रमानें मराठीग्रथसग्रहालयाची स्थापना करून व महाराष्ट्र कवि नावाचें मासिक स्वत त्या हिंमतीवर काढून मराठी भाषेविषयीं आपले नितात प्रेम व्यक्त केलें होतें. शिवाय पुणे येथील भारतइतिहाससशोधकमडळात त्यानीं बरेंच निबध वाचून इतिहासिक सशोधन भारत इतिहास-सशोधक-मंडळाचे कामीं आपली पात्रता विद्वान् लोकाच्या निदर्शनास आणिली होती. यामुळें भादली येथें ठर-लेली योजना पार पाडण्यास विनायकराव भावे हे पूर्णपणें लायक होते अशी प्रस्तुत लेखकाची प्रामाणिक समजूत होती विनायकराव भावे ह्यास भादली येथील बैठकीत ठरलेली योजना प्रस्तुत लेखकानें कळ विली व ती मान्य करण्याबद्दल त्यास विनति केली एकाद्या मनुष्यास भूमिगतद्रव्य ( Treasure Trove ) हस्तगत झाल्यानें जमा

अत्यानंद होतो त्याप्रमाणें महानुभावीयवाङ्मयभांडार आपल्या हातीं आल्याबद्दल विनायकराव भावे यांस आनंद झाला. भावे ह्यांनीं महंत दत्तराज व इतर महंत यांच्या सहाय्यानें ह्या वाङ्मयाचें संशोधनदृष्ट्या निरीक्षण करून त्याबद्दल एक निबंध मुंबई येथील मराठी ग्रंथसंग्रहालयांत वाचला. त्यांनीं अत्यंत परिश्रम करून हें वाङ्मय उजेडांत आणण्याचें श्रेय संपादिलें, व महाराष्ट्र सारस्वत ग्रंथ प्रसिद्ध करून आपली कामगिरी जगाच्या निदर्शनास आणिली. महानुभावपंथीय वाङ्मयाचें अज्ञात दालन कसें खुलें झालें याची मूळ पीठिका विस्तारपूर्वक देण्यांत विषयांतर झालें आहे याची आम्हांस जाणीव आहे. परंतु ह्याबाबतींत कोणकोणाकडून कसकशी मदत झाली ह्याची साधारण कल्पना वाचकांना यावी म्हणून ती देण्यांत आली आहे; यांबद्दल वाचक वर्गाची क्षमा मागणें जरूर आहे. कार्यकारण न्यायानें अगर स्थूल दृष्टीनें पाहिलें असतां हें वाङ्मय उजेडांत आणण्यास म. भ. विष्णुबुवा जोग हे कारणीभूत झाले ही गोष्ट विसरतां कामा नये. सर डॉ. रामकृष्ण भांडारकर ह्यांनीं ह्या पंथाच्या वाङ्मयाचें आस्थापूर्वक व सहानुभूतिपूर्वक संशोधन करून, या पंथाच्या उत्पत्तिसंबंधानें इंपीरियल गॅझेटिअरमध्यें पूर्वी प्रसिद्ध झालेला लेख निराधार व खोडसाळ असें ठरवून त्यांनींच साधार माहिती प्रसिद्ध केली व या पंथासंबंधानें लोकांचे मनांत उत्पन्न झालेला गैरसमज दूर केला. सदरील पंथाबद्दल ऐतिहासिक माहिती प्रसिद्ध करून सर रामकृष्ण पंतांनीं महानुभावीयपंथीयांस कायमचें उपकृत केल्यामुळें, त्या उपकाराची फेड म्हणून त्यांनीं आपलें पूर्व मत बाजूस ठेवून आपल्या पंथाचें वाङ्मय प्रकाशित करण्यास

आपली समति दिली. ह्यावरून या पंथाचें वाङ्मय उजेडात आणण्याचें मुख्य श्रेय डॉ. भांडारकर यास देणें वाजवी आहे.

महानुभाव पंथाचा सस्थापक श्रीचक्रधर ह्याजबद्दल ऐतिहासिक माहिती उपलब्ध नाहीं. परंतु या पंथाच्या सांप्रदायिक ग्रंथांत जी त्याजविषयीं माहिती दिली आहे ती कै. विनायकराव भावे ह्यांनीं आपल्या ' महाराष्ट्रसारस्वतांत ' दिली आहे. तिचा सारांश येणेंप्रमाणें.—सुमारें आठशें वर्षांपूर्वी त्रिमल्लदेव नांवाचा राजा होऊन गेला. त्याचा प्रधान विशालदेव नांवाचा एक सामवेदी ब्राह्मण होता. त्रिमल्लदेव निपुत्रिक असल्यामुळे त्यानें आपलें सर्व राज्य विशालदेवास दिलें. या विशालदेवासही फार दिवस संतान नव्हतें म्हणून त्यानें श्रीदत्तात्रयाची आरधना केली. त्याच्या कृपेनें त्यास एक पुत्र झाला. त्याचें नांव त्यानें हरपाळ असें ठेविलें. तो फार तेल बुद्धीचा असून सात्विक स्वभावाचा होता. विशालदेवानें त्यास राज्यकारभार करण्याचें कामीं आपल्या मदतीस घेतलें. परंतु त्यास द्यूत खेळण्याचा नाद इतका लागला कीं त्यानें आपलेंजवळचें सर्व द्रव्य गमाविलें. हें व्यसन पुढें वाढत वाढत इतक्या थरापर्यंत गेलें कीं राज्यकारभारांत तो लक्ष घालीनासा झाला. त्यास कमलादेवी नांवाची सुशील पत्नी होती. तिला धाकदपटशा देऊन तिजकडून द्रव्य घेऊन द्यूत खेळण्याची आपली हौस पुरविण्यापर्यंत त्याची मजल गेली. अखेर तिनें आपलें जवळचें द्रव्य देण्याचें नाकारिलें. त्यामुळें त्यानें अन्नत्याग केला. त्याचा बाप विशालदेव व आई मल्हाणदेवी ह्या उभयतांनीं त्यास आपला हट्ट सोडण्याविषयीं मोठ्या काकुळतीनें सांगितलें. परंतु तो आपला हट्ट सोडिना. अखेरीस पुत्रवात्सल्यामुळें त्यास द्रव्य देऊन आपल्या

मुलाचा निदान त्या दिवसापुरता हट्ट पुरविणें त्यांना भाग झालें

हरपाळदेव ह्यास कांहीं कालानें विरक्ति उत्पन्न होऊन त्याचे मनात रामटेकचा तीर्थयात्रा करण्याचें आलें त्यानें आपला मनोदय आपल्या आईस कळविला त्यावेळीं शिशालदेवाचे व देवगिरीचे यादव ( जाधव ) याचे दरम्यान युद्ध चालू होतें त्यामुळें आपला राजपुत्र हरपाळदेव हा जाधवाच तडाक्यात सापडेल म्हणून शिशालदेवानें त्यास जाण्याची मनाई केली परंतु हरपाळदेव रामटेक येथे जाण्यावद्दल आपला दुराग्रह सोडीना मग त्याचबरोबर निवडक लोक देऊन यात्रेकरूच्या साध्या पोषाकात त्यास पाठविण्याचे त्याच्या आईबापानी ठरविलें रस्त्यात त्याची व त्याबरोबर असलेल्या निवडक लोकाची चुकामूक झाली व हरपाळदेव हा रामटेकचा रस्ता सोडून ऋद्धिपुराकडे वळला व तेथें जाऊन पोहोंचला तो दिवस शके ११०७ विश्वावसू संवत्सर चैत्र शु १५ होता, अशी नोंद या पंथाच्या धर्मग्रंथात आहे त्यावेळीं ऋद्धिपूर येथे श्रीगोविंदप्रभु नावाचा पूर्ण वैराग्यशील विद्वान ब्राह्मण अयाचित वृत्तीनें राहात होता. हरपाळानें त्याची गाठ घेतली व त्याच्या सन्निध तो कांहीं दिवस राहिला श्रीगोविंदप्रभूनें, त्यास मंत्रोपदेश देऊन त्याचे नाव 'चक्रधर असें ठेविलें सदरील गोविंदप्रभूबद्दल थोडीशी माहिती स्थान पोथीत मिळते आहे प्रभु हे आटनाव ब्राह्मणातही असल्यामुळें तो ब्राह्मण असावा असें वाटतें हरपाळदेवानें कांहीं वर्षे अशा स्थितींत काढल्यावर आरगळ येथील कमलनायक नावाच्या एका सामवेदी ब्राह्मणाच्या मुलीबरोबर त्यानें लग्न केलें. ती फार रूपवती व विदुषी असून तिचें नाव हसाबा असें होतें विवाहाचा काल शके ११२०

राद्र संवत्सर ज्येष्ठ शुद्ध ७ मीस गोरज मुहूर्तावर होता परंतु हा वैवाहिक संबंधही फार दिवस टिकला नाहीं वेराग्याच्या भरात चक्रधर आपलें घरदार सोडून पुनः तीर्थयात्रेस निघाला तीर्थयात्रा करीत असता तो एलिचपूर, (अचळपूर) येथ गेला तेथें रामदेवोराऊ दरणा या नावाचा एक स्वतंत्र संस्थानिक होता त्यानें देवगिरीचा यादवराजा महादेवराय ह्याचे आग्रहावरून झाडीमडळाचे राजावर स्वारी केली होती, परंतु झाडीमडळाच्या राजानें महादेवरायाच्या बरोबर सलोखा केल्यामुळें एलिचपूरच्या राजास परत जावें लागलें ह्या राजाची व चक्रधराची रस्त्यात अकस्मात गाठ पडली चक्रधर त्याचे बरोबर एलिचपूर येथे गेला व त्यानें त्या राजाची कन्या गौरी हिजबरोबर विवाह केला हें चक्रधराचें तिसरें लग्न होय या लग्नाचाही शेवट दु खपर्यवसायी झाला अखेर चक्रधरास कायमची विरक्ति होऊन त्यानें लक्ष परमेश्वराकडे वळलें व त्यास श्रीदत्तात्रयाचा साक्षात्कार झाला शके ११८५ च्या कार्तिक महिन्यात सिंहराशींत गुरु असताना त्यानें सन्यास दीक्षा घेतली महानुभावाचा लीलाचरित्र नावाचा धर्मग्रंथ आहे, त्यात श्रीचक्रधराच्या तीर्थयात्रेची दरएक दिवसाची नोंद केली आहे असें म्हणतात ही रोजनिशी प्रसिद्ध झाल्यास तत्कालीन लोकस्थितीवर बराच प्रकाश पडण्याचा संभव आहे या रोजनिशींत श्रीचक्रधरस्वामी शके ११९४ मध्यें बद्रिकाश्रमीं कायमचा निघून गेले असें म्हटलें आहे त्याचेबरोबर त्याचा पट्ट शिष्य नागदेवाचार्य हा होता परंतु त्यास निराश होऊन परत यावें लागलें

या पुस्तकाच्या तिसऱ्या भागात (पृष्ठ १०० ते ११० मध्ये)

देवगिरीच्या सिंघणदेवाच्या गुजराथेवरील मोहिमेचें सविस्तर वर्णन दिलें आहे. सिंघणदेवाची कारकीर्द शके ११३२ पासून ११६० पर्यंत होती, या मोहिमेच्या वेळीं गुजराथचा राजा लवणप्रसाद हा होता, त्याला वीरधवल या नावाचा मुलगा होता. ह्या पितापुत्रांनी वरील मोहिमेंत पराकाष्ठेचें शौर्य दाखविलें. देवगिरीच्या सिंघणराजानें गुजराथेवर दोन तीन वेळां स्वाऱ्या केल्या असाव्या, असें दिसतें. पहिल्या मोहिमेंत लवणप्रसादानें उत्तरेकडून आलेल्या परचक्राचा मारा चुकविण्याकरितां मोठ्या मुत्सद्देगिरीनें सिंघणाबरोबर तह करून त्याची स्वारी परतविली. परंतु गुजराथेवरील दुसऱ्या मोहिमेंत सिंघणास विजयश्रीनें माळ घातली नाहीं असें दिसतें. वीरधवलाचा मुलगा विशलदेव याचे वेळचा अनहिलपट्टणाचा नं. ११ चा ताम्रपट उपलब्ध आहे. त्यांत आपण सिंघणाचा पराभव केला, असे गर्वोक्तीचे उद्गार त्यानें काढले आहेत. हा विशालदेव (विसलदेव) गुजराथचे गादीवर शके ११५७ सालीं बसला. या पुस्तकाच्या ११२ पृष्ठावर 'विराटपाटी चरित्र' नामक ग्रंथांतील उतारा दिला आहे. त्यावरून श्रीचक्रधराच्या चरित्रांत ज्या विशालदेवाचा उल्लेख केला आहे, तो व वीरधवलाचा मुलगा विशालदेव हे एकच असावे, यांत शंका नाहीं. अनहिलपट्टणच्या गादीचा खरा मालक भीम (दुसरा) असून लवणप्रसादानें वस्तुपाल व तेजपाल या जैन प्रधानाच्या सहाय्यानें त्यास बाजूस सारून गुजराथप्रांताचीं राज्यसूत्रें हस्तगत केलीं होतीं. हा भीम, चालुक्य कुलांतील होता व तो आपणास 'महाराजाधिराज' असें म्हणवीत असे. लवणप्रसाद हा वाघेला (व्याघ्रपाली) या क्षत्रियकुळांतील होता व तो आपणास 'राणक' असे बिरुद लावीत

असे कीर्तिकौमुदींत गुजराथच्या चालुक्य राजाचें वर्णन दिलें असून त्यांत वस्तुपाल व तेजपाल ह्या बंधुद्वयाची भरपूर स्तुती केली आहे. वर उल्लेख केलेल्या विशलदेवास हरपाळ या नावाचा मुलगा असल्याचें कोठें आढळून येत नाहीं. तसेंच त्रिमलदेव हा गुजराथचा राजा होता, असाही कोठें उल्लेख नाहीं. ‘ सिंघणदेवाच्या सेनासमुद्रास विशलदेवरूपी वडवानळानें सुकविलें ’ असे गर्वोक्तीचे उद्गार वर उल्लेख केलेल्या अनहिलपट्टणच्या ताम्रपटात विशलदेवानें काढले आहेत. शिवाय कीर्तिकौमुदीवरून भृगुकच्छ ( भडोच, भरवस ) हे शहर लवणप्रसादाच्या अमलाखालीं होतें असें म्हटलें आहे. यावरून श्रीचक्रधरस्वामींचें पूर्वाश्रमींचें नाव हरपाळ असून तो गुजराथचा राजा विशालदेव याचा मुलगा होता, या हकीगतीस ऐतिहासिक आधार असल्याचें दिसून येत नाहीं. महानुभावपंथाचे सर्व ग्रंथ अद्यापि प्रकाशित न झाल्यामुळें या बाबतींत ठाम मत देणें बाजवी होणार नाहीं. महानुभावीय धर्मग्रंथांत दिलेलें श्रीचक्रधरस्वामींचें चरित्र ऐतिहासिकदृष्ट्या खरें ठरल्यास, गुजराथ प्रांताच्या राजपुत्रानें मराठी भाषेचा अभ्यास करून शके बाराव्या व तेराव्या शतकांत मराठी वाङ्मय निर्माण करण्याचा अग्रमान मिळावा, ही गोष्ट त्या प्रांतास भूषणावह आहे असें म्हटल्या वाचून राहवणार नाहीं.

## महानुभावपंथाची धर्ममतें

सदरील पंथाची धर्ममतें सनातन वैदिक धर्माशीं विसंगत नाहींत. श्रीकृष्ण हा पूर्णावतार असून त्याच्याखेरीज अन्य दैवत नाहीं. श्रीकृष्णाच्या अवतार लीलाचें व चरित्राचें श्रवण व मनन करून त्याच्याठायीं अढळ निष्ठा ठेवल्यानें मोक्षप्राप्ति सहज होते यच्चयावत्

प्राणिमात्रावर दया करणें व अखिल मानवजातींत भेदाभेद न मानणें, असें गौतमबुद्धाप्रमाणें या पंथाचेंही एक तत्त्व आहे. विश्वबंधुत्व व अहिंसा हीं तत्त्वें श्रीचक्रधरानें बुद्ध धर्मांतून घेतलीं असावीं, असें सद्दर्शनीं दिसतें. परंतु भागवतधर्मांत ह्या दोन तत्त्वास प्रमुख स्थान दिलें असल्यामुळें, श्रीकृष्णाच्या उपासनेबरोबर हीं तत्त्वें त्यानें स्वीकारलीं असावीं. मूर्तिपूजा त्यास संमत नव्हती. श्रीकृष्णाखेरीज श्रीदत्तात्रय या देवतेस ते पूज्य मानतात.

श्रीमद्भागवतपुराणाप्रमाणें या पंथात श्रीकृष्णाच्या उपासनेस प्राधान्य दिलें आहे. ज्ञान, तप, वैराग्यवगैरे सहाय्यावाचून निव्वळ भक्तिमार्गानें परमेश्वराशीं सायुज्यता प्राप्त होते, अशी या पंथाची शिकवणूक आहे. श्रुति, स्मृति, आणि पुराणें यांचा उल्लेख ते आपल्या ग्रंथात वारंवार करतात. सर्व उपनिषदांचें सार जी भगवद्गीता ती या पंथातील लोकांस परमपूज्य असून तिजवर संस्कृतात व मराठींत अनेक टीका या पंथाच्या अनुयायांनीं लिहिल्या आहेत, यावरून महानुभावपंथ हा वैदिक धर्मविरुद्ध नाहीं असें दिसतें. भूतदया व विश्वबंधुत्व या उदात्त तत्त्वावर महानुभाव पंथाची उभारणी झाली असल्यामुळें वर्णाश्रमधर्म अगर चातुर्वर्ण्य त्यास संमत नाहीं. पूर्वजन्म वगैरे सनातन धर्मांतील तत्त्वें त्यास मान्य आहेत. आपापल्या कर्मांप्रमाणें स्वर्गाची अथवा नरकाची प्राप्ति होते व मनुष्य पूर्वकर्मानुसार याजन्मीं फळें भोगतो हीं तत्त्वें या धर्मास संमत आहेत. परमेश्वर निराकार व निर्गुण असून तो आपल्या लीलेनें सगुण होतो; माया ही निर्गुणास सगुणत्व

आणते व जीवाला जीवित्व देते; म्हणजे जीवाकडून ती सर्व कर्में करविते, अशी त्यांची मतें आहेत.

भागवतांतील भिक्षुगीतेंत दिलेल्या आचारव्यवस्थेस अनुसरून श्रीचक्रधरानें आपल्या धर्माचा प्रसार करण्यासाठीं भिक्षुसंघाची स्थापना केली; व संघाच्या अंतर्व्यवस्थेसाठीं घालून दिलेली शिस्त उत्कृष्ट रीतीनें पाळली जावी म्हणून त्यानें कडक निर्बंध घातले. एखाद्या भिक्षूनें शिस्तीचें उल्लंघन केल्यास अगर दुसऱ्याची आगळीक केल्यास त्यास कडक शासन केलें जात असे. नियमबाह्य वर्तन केल्यामुळें बऱ्याच भिक्षूंना श्रीचक्रधरस्वामींनें कडक शासन केल्याचीं अनेक उदाहरणें या पंथाचे ग्रंथांत दिलीं आहेत.

महानुभावपंथाच्या मुख्य तत्त्वांचा स्थूलमानानें विचार केला असतां हा पंथ, भागवतपुराणांतील भागवत धर्माची सुधारलेली आवृत्ति होय, असें म्हटल्यास हरकत नाहीं. वैदिक धर्मांत मूर्ति-पूजेचा कोठेंही उल्लेख आढळत नाहीं. यावरून ती सनातन हिंदु-धर्माचें एक मुख्य अंग आहे, असें म्हणतां यावयाचें नाहीं. अहिंसा व विश्वबंधुत्व ह्या तत्त्वाचा पुरस्कार भागवत पुराणात केला असल्या-मुळें सदरीलतत्त्वें श्रीचक्रधरानें जैन अथवा बौद्ध धर्मांतून घेतलीं असें म्हणणें वाजवी होणार नाहीं. गौतमबुद्धाप्रमाणें श्रीचक्रधरानें पूर्वापार वहिवाट सोडून आपले सर्व धर्मग्रंथ लौकिक ( लोकांच्या नेहमींच्या बोलण्याच्या ) भाषेंत लिहिण्याचा व आपल्या धर्ममतांचा प्रसार लोकांच्या भाषेंतून करण्याचा उपक्रम केला ही गोष्ट तत्कालीन विद्वान लोकांस रुचली नसावी यांत शंका नाहीं. शिवाय, सनातन वैदिक-धर्माच्या चातुर्वर्ण्यव्यवस्थेस त्यानें कायमची मूठमाती दिली.

वस्तुत भागवतधर्मांच्या श्रेष्ठ तत्वांवर उभारलेला पथ मराठी लोकास मान्य व्हावयास पाहिजे होता. वैष्णव व शैव या दोन पंथांपेक्षा, महानुभाव पंथाचें ध्येय व्यापक स्वरूपाचें होतें, असें असतां महानुभावपंथाचा, सनातन धर्मीय अत्यंत तिरस्कार करूं लागले, याचें आश्चर्य वाटतें. याचीं कारणें निरनिराळ्या लोकांकडून वेगवेगळीं दिलीं जातात. जैन व बौद्ध हे धर्मनिरीश्वरवादी असून त्यांचीं अध्यात्मिक तत्त्वें सनातन वैदिक धर्माहून कांहीं बाबतींत भिन्न आहेत यामुळें हिंदुधर्मीयास वरील दोन धर्मांबद्दल आदर वाटत असल्यास त्यांबद्दल त्यांना तात्विक दृष्ट्या कदाचित् दोष देता येणार नाहीं परंतु हिंदूंना अत्यंत पूज्य अशा श्रीमद्भगवद्गीता व श्रीमद्भागवत या ग्रंथांतील उदात्त तत्वांवर उभारलेल्या पंथाविषयीं सनातन हिंदुधर्मीयांना तिरस्कार वाटावा हें मोठें गूढ आहे ! ! महानुभावांचें मराठी भाषेवरील अकृत्रिम प्रेम, त्यांची श्रीकृष्णावरील अचल ऊर्फ अढळ भक्ति, त्यांची अभक्ष्याभक्ष्य सेवनपराङ्मुखता [ अहिंसा ] त्यांनीं मराठी भाषेंत केलेली अमोलिक ग्रंथरचना, तसेंच पंजाबासारख्या दूर प्रदेशांत त्यांनीं केलेला मराठीचा प्रसार, इत्यादि अनेक गोष्टींवरून हा पंथ महाराष्ट्रीयांच्या अत्यादरास पात्र व्हावयास पाहिजे होता. भावे यांनीं आपल्या 'महाराष्ट्र सारस्वत' ग्रंथांत या पंथाचा व्यापक रीतीनें विचार केला असून सनातनधर्मीयाचें वर्तन याबाबतींत अक्षम्य आहे, असें आपलें स्पष्ट मत दिलें आहे. त्यांतील महत्वाचा उतारा पुढें दिला आहे :—

' हिंदुधर्म सोडून धर्मांतर केलेला कोणी परधर्मी आमच्या सभांना आणि संमेलनांना अध्यक्ष म्हणून, व त्याचेच सत्कारपर लेखांचें एक वेळ कोणी कौतुक देखील करील, पण त्याच्यापेक्षा शतपट सुंदर

ग्रंथरचना करणारा व आजन्म मद्यमांसापासून अलिप्त रहाणारा महानुभाव त्याठिकाणीं खपणार नाहीं, इतकी ही द्वेषाची मुळी खोल गेली आहे.  ...कोणीहि इसम आमचें चातुर्वर्ण्य टाकून व धर्महि सोडून बाहेर गेला तरी त्याचें तें करणें महाराष्ट्र एकवेळ सहन करील, परंतु आमच्यांत राहून आमच्या चातुर्वर्ण्यावर आघात करील तर तें मात्र महाराष्ट्रास खपणार नाहीं. "

गौतमबुद्धाप्रमाणें, श्रीचक्रधरानें चातुर्वर्ण्यव्यवस्थाबद्ध हिंदु-समाजावर आघात करून अक्षम्य अपराध केला चातुर्वर्ण्य हें हिंदु-समाजाचें व हिंदुधर्माचें मर्मस्थान आहे. त्याजवर जो आघात करील, तो हिंदुधर्माचा कट्टा शत्रू होय. वे. शा. स. दिवेकर शास्त्री यांनीं ' आर्यांच्या जातींचें एकीकरण ' या नावाचें पुस्तक अलीकडे प्रसिद्ध केलें आहे. त्यांत त्यांनीं याच विचारसरणीचा अवलंब केला आहे. वैदिकवर्णाश्रम-धर्मास जो धर्म अगर पंथ विरोध करील, तो सनातन हिंदुधर्माचा हाडवैरी आहे असें पक्कें समजावें.

महानुभावपंथांत कांहीं अनीतिवर्धक चालीरीति प्रचलित आहेत, म्हणून हिंदू त्याचा द्वेष करितात, असें कित्येकाचें म्हणणें आहे. परंतु या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हिंदुधर्मांत, घटकंचुकि, वाममार्ग,मुरळ्या, भाविणी वगैरे अनिष्ट प्रकार कालगतीनें घुसडले गेले आहेत तरी पवित्र अशा मूळ वैदिक धर्मास ज्याप्रमाणें कमीपणा येत नाहीं, त्याप्रमाणें महानुभावपंथांतील भिक्षुणी अथवा भिखुणी याजकडून एखादेवेळीं प्रमाद घडले असल्यास, श्रीचक्रधरानें स्थापिलेल्या पंथास दूषण देणें वाजवी होणार नाहीं.

महानुभावपंथीय मराठीवाङ्मयाच्या उदयाची व त्याच्या

अन्याहत यांदींची ज्यास पूर्णपणे माहिती करून घेणें असेल, त्यानें विनायकराव भावे यांचें 'महाराष्ट्र सारस्वत' व श्रीयुत देशपांडे यांचें 'महानुभावपंथीय मराठी वाङ्मय' हे ग्रंथ अवश्य वाचावे 'महाराष्ट्र सारस्वतांत' या पंथाची सविस्तर माहिती दिली असून त्या पंथाच्या वाङ्मयाची संक्षेप रूपानें माहिती दिली आहे भावे यांचा महाराष्ट्र-सारस्वत ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वी, या पंथाचे कांहीं किरकोळ ग्रंथ सोला पूर येथे छापून प्रसिद्ध झाले होते शिवाय १८९७ सालीं केसरी पत्रां-तून महानुभाव पंथाचा व त्याच्या वाङ्मयाचा इतिहास छापून प्रसिद्ध झाला होता महंत दत्तराज, महंत हरिराजबुवा वगैरे सुप्रसिद्ध महानु भावीय पंडितांनीं ग्रंथप्रकाशन करण्याचे कामीं आपले धार्मिक पूर्वग्र-हांतून ठेऊन मोकळ्या मनानें भावे यांस मदत केली ही गोष्ट त्यांना भूषणावह आहे भावे यांनीं सदरील पंथाच्या वाङ्मयाचें आम्ही पृथक् संशोधन करून व तें प्रकाशित करून महानुभावपंथीयांस व त्याबरोबरच अखिल महाराष्ट्रास व मराठी भाषेचा अभिमान बाळग णाऱ्या लोकांस कायमचें उपकृत करून ठेविलें आहे भावे यांनीं अंगी कृत केलेलें कार्य, ठाणें येथील मराठीग्रंथसंग्रहालयाचे विद्यमान चालक त्यांचे पश्चात् चालवून ठाणेकरांचे लौकिकांत भर घालीत आहेत ही गोष्ट समाधानाची आहे भावे यांनीं आपले हयातींत पंडित दामोदर यांचें 'वच्छहरण' व महानुभावपंथीय ग्रंथकारांची व त्यांच्या ग्रंथांची 'सूचि असे दोन ग्रंथ प्रसिद्ध केले कवीश्वर भास्कर यांचें 'शिशुपालवधकाव्य मराठी ग्रंथ-संग्रहालयाच्या विद्यमानें प्रसिद्ध झालें आहे आमचे विद्वान मित्र व व्यवसाय बंधु श्रीयुत यशवंतराव खुशाल देशपांडे यांनीं महानुभावीयग्रंथप्रकाशनाचें कार्य मोठ्या नेटानें चालविलें

आहे. **शारदाश्रम** नावाची संस्था स्थापून तिच्या द्वारें प्राचीन मराठीवाङ्मयमाला छापण्याचें काम सदरील संस्थेमार्फत चालू आहे. व थोडक्याच कालात नरेंद्र कवीकृत 'रुक्मिणी स्वयंवर' भास्कर कवीश्वरकृत 'एकादश स्कंध' व 'श्रीकृष्णचरित्र (गद्य)' हे ग्रंथ छापून तयार होतील, अशी उमेद वाटत आहे. देशपांडे यानीं पंडितनारायण व्यास यांचें 'श्री ऋद्धिपूरवर्णन छापून प्रसिद्ध केलें आहे. सदरील ग्रंथ, दामोदर पंडिताचें 'वच्छहरण' व कवीश्वर भास्कर यांचें 'शिशुपालवध या ग्रंथावरून या पंथाचें वाङ्मय किती श्रेष्ठ दर्जाचें आहे, याची सहज कल्पना करता येते.

श्रीचक्रधरस्वामींचे पश्चात् सुमारें ८०-९० वर्षांनीं, या पंथाचे धर्मग्रंथ वेदाप्रमाणें गुह्य मानले जावे, असे त्यावेळच्या आचार्यांनीं ठरविलें. व तेव्हापासून महानुभावीय ग्रंथ सांकेतिक अगर गुप्त लिपींत लिहिण्यास सुरवात झाली. पहिल्या सांकेतिक लिपीस 'सकळी लिपी' असें म्हणतात. आणखी कांहीं वर्षांनीं सातआठ लिपी निर्माण झाल्या त्याचीं नावें येणेंप्रमाणें —(२) सुंदरलिपी (३) पारमांडल्य-लिपी (४) अंक-लिपी (५) शून्य-लिपी (६) सुभद्रा-लिपी (७) श्री-लिपी वगैरे याचा परिणाम असा झाला कीं, ज्याला या लिपींची गुरुकिल्ली माहिती नाहीं त्याला हे ग्रंथ वाचणें अशक्य झालें. ही परिस्थिति या पंथाच्या मूळ संस्थापकाच्या धोरणाविरुद्ध होती. एका अक्षराऐवजीं दुसऱ्या अक्षराची योजना करून जी लिपी तयार करतात तिला सांकेतिक लिपी म्हणतात. त्यापैकीं सकळी, सुंदरी व पारमांडल्य ह्या सांकेतिक लिपींचे कांहीं नमुने खालीं दिले आहेत.

| बालबोध | सकळी | सुंदरी | पारमांडल्य |
|---|---|---|---|
| अ | म | अ | त |
| इ | पि | उ | द्रि |
| उ | ह | इ | य |
| क | य | म | १ |
| च | प | झ | ० |
| ट | त | ठ | ३ |
| त | ट | स | व |
| प | च | क | ४ |
| य | क | र | ह |
| ल | ग | च | ह |
| व | ध | म | स |
| ह | इ | ण | म |

## सुंदरी लिपीचा एक नमुना.

॥ ॥ श्रीज्ञन्य भयोरे भवाः ॥ ॥ श्री घंसनुरपारे भवाः ॥
॥ क्षाम्रधन्सि मैयाञ्ज अेनु वेडनु अेनु अवोझनुः अैनादियमिभ शोभुः से अञ्र म्रामुस्तिः ॥ १ ॥

## वरील उताऱ्याचें देवनागरी लिपींत रुपांतर.

॥ ॥ श्री चक्र धराये नमः ॥ ॥ श्री पंच कृष्णाये नमः ॥
॥ ज्ञानभक्ति वैराग्य अेकु मोचकु अेकु अमोचकु अैसा त्रिविध बोधुः ते अन्य व्यावृत्तिः मागजे ॥ १ ॥

१५७ हा आंकडा महानुभावीय गुप्त लिपींत लिहिण्याची पद्धत पुढील प्रमाणें:—भूमि–बाण–निधि 'भूमि' या शब्दानें १ हा

आकड्याचा बोध होतो, 'बाण' यानें ५ या आकड्याचा बोध होतो (पंच बाणास्तु बाण), व 'निधि' यानं ७ या आकड्याचा बोध होतो

श्रीचक्रधराना, नागदेवाचार्य या नावाचा एक पट्टशिष्य होता त्यास आद्यआचार्य म्हणत नागदेवाचा शिष्य कवीश्वर व कवीश्वराचा परशुराम अशी आचार्यपरपरा आढळून येते परशुरामाचार्यानंतर या पथात आपसात भाटणी सुरू झाली व त्यामुळें त्यांच्यात निर-निराळी तेरा सम्प्रदानें उत्पन्न झालीं त्यांचीं नावें येणेंप्रमाणे —
(१) कवीश्वर (२) उपाध्ये (३) पारिमाडल्य (४) अमृते (५) मदालस (६) कुमार (७) यक्षदेव (८) दामोदर (९) हरिदेव (१०) जयदेव (११) शाल्कर (१२) दिवाकर (१३) महेश्वर

महानुभाव पथात अस्पृश्य वर्ग खेरीज करून बाकीच्या वर्णातील कोणत्याही इसमास सन्यास घेता येतो व तो महतपदास चढतो रोटीव्यवहार व बेटीव्यवहार या सबधानें कोणत्याही प्रकारचे प्रति बध या पथात नाहीत सन्यासदीक्षा घेऊन भिक्षावृत्तीनें रहाणें, हा श्रेष्ठ मार्ग मानला जातो घरभारी अगर गृहवासी यास या पथाचीं मतें पाळूनही ससारात रहाता येतें तसेंच सनातन हिंदुधर्मात राहूनही महानुभाव पथाविषयीं सहानुभूति दाखविण्यास कोणत्याही प्रकारची हरकत येत नाहीं सन्यासी हे २०० पासून ५०० पर्यंत लोकांचा सघ करून राहातात सघाच्या मुख्याधिकाऱ्यास महत हें नाव आहे त्याच्या खालच्या अधिकाऱ्यास पडित, ऱ्पर्री, पालेकर अशीं अनुक्रमें नावें आहेत भिक्षुणींचे सघ अलग रहातात भिक्षु-

णीमंघाच्या मुख्य अधिकाऱ्याच्या खालच्या अधिकाऱ्यांस विडे कराई, पंडिताई, भोजनाई व कोठनाई अशीं नांवें आहेत. पट्टधारी यांस अर्घ्य-पूजेचा मान असून, याखेरीज छत्र व चामर हीं राजचिन्हें वापरण्याचा अधिकार असतो. वनधारी हे जंगलामध्यें फिरतात. जे संन्यासी वार्धक्यामुळें देशपर्यटन करण्यास अगर फिरतीवर जाण्यास नालायक असतात त्यांस मलधारी असें म्हणतात. ह्याप्रमाणें या पंथांतील समाज-रचना आहे. महानुभावी लोकांपैकीं कोणी मृत झाल्यास त्यास पुरण्याची चाल आहे. ते काळ्या अगर लाल रंगाची लुंगी परिधान करतात. मोंगल बादशहांचे कारकीर्दींत बसविलेल्या 'जिझिया' कराची त्यांस पूर्ण माफी असे. अवरंगजेब बादशहाकडून मिळविलेल्या सनदेंत 'कोणत्याही हिंदूनीं अगर ब्राह्मणांनीं त्यांस त्रास देऊं नये' अशी सक्त ताकीद देण्यांत आली आहे. यामुळें मुसलमानांच्या कृपाछत्रा-खालीं या पंथाचे लोक आहेत अशी सार्वत्रिक समजूत झाली व हिंदूंच्या द्वेषास ते पात्र झाले असें म्हणतात.

रामदेवराव जाधव याचे कारकीर्दींत महानुभावपंथीय जे ग्रंथकार होऊन गेले त्यांच्या अप्रसिद्ध ग्रंथांतील कांहीं उतारे या ग्रंथाच्या चौथ्या भागांत दिले आहेत. या पंथाच्या वाङ्मयापैकीं आतांपर्यंत जे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत, त्यावरून त्यांतील भाषा, साहित्य, विचारसरणी, प्रमाद, रस, काव्य वगैरेंची चांगली कल्पना होते.

'श्रीऋद्धिपूरवर्णन' हें काव्य श्रीयुत यशवंतराव खुशाल देशपांडे यांनीं इ. स. १९२९ सालीं प्रसिद्ध केलें. या ग्रंथास देश-पांडे यांनीं विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना लिहिली असून त्यांत महानुभाव-पंथीयांच्या दृष्टीनें ऋद्धिपुराचें महत्व किती आहे, हें दाखविलें आहे.

याग्रंथात निरनिराळ्या स्थलांचें वर्णन देतानां कवींचें रचनाचातुर्य जागोजाग दिसून येतें. याशिवाय या ग्रंथात प्रसाद, ओज, माधुर्य वगैरे गुण ओतप्रोत भरलेले आहेत. शिवाय या ग्रंथांचें तत्वज्ञानही संक्षेपरूपानें दिलें आहे. या ग्रंथाचा दुसरा असा विशेष आहे कीं, यात दुर्बोध शब्दाचा अर्थ सुलभ व्हावा म्हणून त्यात जागोजाग टिपा दिल्या आहेत. या टिपा अलिकडच्या नसून १६ व्या शतकातील असाव्या असें दिसतें. हा ग्रंथ मराठीभाषेच्या दृष्टीनें महत्वाचा आहे. त्यातील ठळक उतारे संक्षेपरूपानें पुढें दिलें आहेत.

## सरोवर वर्णन.

तया देवन्यतना जवळिके सरोवरें देखे सुलक्षणिकं
तेथ **टाहुया** करिति चक्रवाकें विरह कातरें ॥ ९१ ॥
निर्दोष नि पाप निर्मळें चोखडत परिपूर्ण जळें
सर्वांगें जाळीं वाचाळें कल्खौ पक्षियाचेनी ॥ ९२ ॥
ठाइ ठाइ बरवट विघृत मडीत घाटः
जैसे प्रवृत्ति पायावरि तावट तपोनिधि ॥ ९३ ॥
आपुलेनि प्रसन्नपणें दृष्टीसि माडीति धरणें
अमृता आणीति उणें गोडिया आग चिया ॥ ९४ ॥
जे आचांनि चरणें पुनंतुः जगा वाणिजेति तीथू
तो देवराउ जेथू क्रीडा करी ॥ ९५ ॥
मंदें मळयानिळें झगटलें पाणी हलें
तें गज पा सुखें डोले परम पुरुषाचेनि ॥ ९६ ॥
सकळ शास्त्रां विचारुः करिता नोहेचि निर्धारु
सो तिथें आपैपरु. लाहातां जालें. ॥ ९७ ॥

असो हे पोखरणी वावी जया श्रीचरण-कमळें बरवी
देऊन गोसावी तीर्थ करिती ॥ ९८ ॥
कष्टणी सुखेन नाहीं ऐसें जेथ फिटे भव-पाशें
गुणिये आधिष्ठीले हर्षोत्कर्षें ते वाचोनिया ॥ ९९ ॥
ऐसीं पवित्रें परिकरें जियें क्रीडा-स्थानें केलीं दातारें
त तीर्थें पर्ता न स्मरें आपण पें ॥ १०० ॥
नाना तापीं तपत हृदय असे जळत
तें होए शांत जें देखिलेआ ॥ १०१ ॥

## ज्ञानेश्वर भिन्नत्व दर्शक ओव्या.

आहोजी आदका फेउता सधधु राया रंका
ना तरि कूप छुवाविया सोइरिका निमित्येंवीण ॥ २८१ ॥
देऊ आत्मरमणु मी कामबाणीं विंधिलु
देऊ सकळ गुरशरण्यु मी हीनु महुतें पाईं ॥ २८२ ॥
देऊ निजानंदें तृप्त मी क्षुधिपासीं ग्रस्तु
देऊ अगाधु अलेखु अनंतु मी अति सोच्य ॥ २८३ ॥
देऊ परावर नायकु मी अनादि प्रणीतु रंकु
देवो मायापर एकु मी नाना वस्य तीए ॥ २८४ ॥
देऊ परात्परु तरु मी आध गामिया निरंतरु
देऊ पूर्ण सुखसागरु मीं दुःखग्रस्त ॥ २८५ ॥
देऊ अप्रमेयु अनिर्वाच्यु मी अल्प नाव सोच्यु
ऐसाही द जु वाच्यू कहीं मझेंचि तुज ॥ २८६ ॥
अममाना अद्भुता केवळा घनीभूता
तुज प्रभु पाहुनि केउता मी आतु ॥ २८७ ॥
उच्चाळिभ आणि पूर्णचंद्र वत्सपद ष समुद्र
पंचानन आणि दर्दुर जर्णे पाईं ॥ २८८ ॥

शरभा आणि सुपर्णाः का रासभा आणि. ऐरावनाः
पाड का जैसा हरिचंदना पुष्करेंसी ॥ २८९ ॥
परमाणु के सुवर्णाचलु चिंतामणिसी हरळु
देल गुरु पाहानि उजाळु काइ शुक्तिखंडे ॥ २९० ॥
चक्रवाहा का देवेंसी कैंवि कुलाव्हा करू सरिसीं.
तेंवि तू जगदात्मा हृषीकेशी पाहुनि मी जीवु काइं ॥ २९१ ॥
ऐसा अपार्डेसी हीणु भवपाशबध दीनु
निर्दयो निष्टुर कृतघ्नुः सब दोषिया ॥ ९२ ॥

## 'राजमठ प्रवेशवर्णन'

तैसा भरळ ७० रसु करिता मठ प्रवसु
तथ प्रमेय बोलावेया सौरसु याचे नाहा ॥ ३८० ॥
तऱ्हीं आळकारें वीण न मिरवें काव्य लक्षण
रत्नें नव्हति का पाषाण पुन राजया योग्य कीं ॥ ३८१ ॥
भणौनि शब्द-रत्ना सोहोज्वळा जाउनि साहित्याचिआ वेलाउळाः
मरौनि आणे खोंव्हा उन्मेषावेआ ॥ ३८२ ॥
प्रथु सुवर्ण मुद्रिकें खेवणु भाव माणिकें
मग दरुशना द ७० कवतिकें श्रीप्रभुराया ॥ ३८३ ॥
राइ राज एर्णे मठु प्रवेशिजे बोलणें
तें अवधारा नारायणु भणे· श्रोतेयांतें ॥ ३८४ ॥
व्याधा पासौनि सुटलें आर्तु पक्षिणाचें पीलें
जैवी निडी गिरीलु आलें जननिएतें ॥ ३८५ ॥
जेवी असभवियाचें लेंकरू· पै पयो पानी हावरु·
तै दैवदत्त क्षीरसागरू जोंवि लाहे. ॥ ३८६ ॥
साधनाचा चरीतार्थी जेसी साध्याची आसी
सातरि व्याधिग्रस्ता अमृतीः सौरसु लाहे ॥ ३८७ ॥

जळा बाहेरीं अवचिता । मीन पडे चडफडीता
तो दैववशें मागौता । जळींचि लाहे ॥ ३८८ ॥
तेवि तिए राजभुवनीं । जो आनंद भरला मनीं
तो काइ एकी वाचा वाणीं । प्राकृत मी ॥ ३८९ ॥
सभ्रमाचेनि पुरें । झांपली बुद्धिची तीरें
तो उत्साहो न संवरे । इंद्रिय उ॰ घां ॥ ३९० ॥
मना चाचल्यता न स्फुरे । बुद्धि बोधत्व विसरे
अहंकार अहंत्वेसि मुरे । आपणपेंची ॥ ३९१ ॥
इंद्रियें विन्नरथें । जाली गात्रें स्तिमितें
हालि चालि कुठिली जेथें । बाह्याभ्यांतरीं ॥ ३९२ ॥

.....................................................

## भोजन पक्वान्न वर्णन.

आसन सोरठा स्वर्णपटीं । पुढां मांचळी चौपुटी
वरि प्रतिष्ठीला ताटीं । योगरीति नानापरींसीं ॥ ५०५ ॥
दवा वरितो आरोगण । पूर्णचंद्र लाधलें रवण
तेंस ताटाचें धोसाळपण । विस्फुर्नि देखा ॥ ५०६ ॥
सपुर सोजिपचें चोखट । फेडुनि सदळ वाट
तें पनक वर्ण वेंट । वाढिजति मांडेयांचे ॥ ५०७ ॥
निज शिखरींचिए भुरें । ज बविलें धवकें
तें पक्वान्न पोळी मणीनि अवढिये । परईनए ॥ ५०८ ॥
दोहीं मुनें सरिसे सतार । जैसे अमृताचे परांकुर
ते मध्यें राजाऽन्नाचे वोगर । धोळगवींसी ॥ ५०९ ॥

.....................................................

पूर्ण चंद्राचेनि पाडें, वाढिजति शिखरणिचे वडे
दभो छिद्राचे परि आवडे सर्वज्ञासि ॥ ५१२ ॥

दृष्टि चचल परि एकसरें जयामाजि वावरे:
वरवा गुपली कीन मोदरें काहीं केली ॥ ५१३ ॥
माटिमीडि स्वर्ग देवा. पातार्ळी पीयूषाचा ठेवाः
भणौनि तळौनि काढिला हावा: अमृतरूप: ॥ ५१४ ॥
मोकळी मोतियें जाति पसरी भणौनि पायसें आळिलि या सरवळीआचीआ क्षीरी.
चरि पच धारगौरी आलगी चोखाळपणें ॥ ५१५ ॥
सुप्रभा स्नेहवशें: भीतरि पूर्णत्वें असे
वाढिता उदंचरें सरिसें पूरिकासी ॥ ५१८ ॥
कीं ब्रह्मण्य देवा पुढ ब्रह्मपुरीसीं माडे
कीं कवचां लेइली कोडें मींपें पुरिकाचेनि: ॥ ५१९ ॥
कापुर गौरी चोखट छिद्राची परि नव्हे नट
निश्चय नामधारी वरवट ब्रह्मपुरीसीं ॥ ५२० ॥
गोक्षीर धार धवळें भीतरु भरला साकर गुळें
कीं देवाचिये सनिधी अमृतफळें: प वर्ते जाला ॥ ५२१ ॥
ताटी तेचि गगनु वटिका पूर्णचंद्राचें मानु·
भणौनि अमृत फळें तारागणु सारिखी दीसेति ॥ ५२२ ॥
नाखिवा माळतिया सन्धिं इत्यादि वलिवट्ट बरवें
ताटीं वाढिति अदेंवें सेवकजनु ॥ ५२३ ॥
सोरिवा तीळाचीं तीळुवें गोडी मिसळौनि सेवे
ते मोदकु आरोगिता देवें गुळु थोडा भणे ॥ ५२४ ॥
बहुता छिद्राचिया का सरिया रूपेया चिया.
तिया वाढिती कुरचंडिया. पर्पटेसीं ॥ ५२५ ॥
नानारची केळी उपेणी. कीं पाचि प्रभेची खाणी·
कीं माधुर्यावरि सांधर्नीः अन्ये रसाची ॥ ५२८ ॥

दोहीं विभागीं कुमंचीरी पत्र शाखे: रूप सस्नेह मार्जिकः
अभावा मागिजेति वृथा केः सर्वत्र रायें: ॥ ५३० ॥

मम शुद्धि इंश्वरीं: भणाल जचाळि एकें का धुरिः
भणंति कानवले वेंटरी: भाकरी मागिजति यदेः ॥ ५३२ ॥

दधि दुधें तकें कढिया वालवणें विचीत्रें:
निज हाटी होति पवीनें: प्रमादा लागिः ॥ ५३५ ॥

कापुर बेलीची चोराडो: वुजव्हिली परीवडीः
तेही सस्पुरी वीडी विराजिता श्रीमुखीं: ॥ ५४१ ॥

जय लवंग जातीफळ एळा: हात गोळिया सुपरिमळा:
तिआ परनलिया ताबुळा: हात वोडवीती निज किंकरा: ॥ ५४२ ॥

शालिवाहनशकाच्या बाराव्या शतकांत महाराष्ट्रांत कोणतीं पक्वानें प्रचारात होतीं, ह्याचा इतिहास वरील उताऱ्यांत वाचावयास मिळतो. याशिवाय कोशिंबिरी, वडे, पापड, तांबूलविहार यांचाहि उल्लेख या उताऱ्यांत आहे. बाणाच्या कादंबरींत व मृच्छकटिक नाटकात वर्णन केलेल्या पक्वानांची यावरून आठवण होते.

## वच्छहरण.

### वृंदावनाचें वर्णन.

पापिअे न देखना वृंदावन: जेथ असंड अवेति सुरगण ॥
तेथ मोक्षारा केलासे जनां: दिव्य फल—पुष्पांवा ॥ १२१ ॥

वृंदावनाची सुमीळना गगंणीसे प्रतिबिंबता ॥
सुमनसें उमटत: ते जैसे तारागणु ॥ १२२ ॥

या दी अमता तारा न दिसें: तें ऊणें फेडावेआं दासें ॥
वनश्रिआ वेढिलें अंगे: अंबर नक्षत्रे सीं ॥ १२३ ॥

वना वाहिरीली आगीं विशाळ साल ताल तमाल ॥
आगीं जतन करीते परिमळ तें जैसी राखणाइतु ॥ १३४ ॥
तेआ भीतरीली ओळीः गगनचुंबिता नारिअेळी ॥
उच्चा तेआ खर्जुरी पोफळी आदीळगाती ॥ १३५ ॥
तेआं हीं आतुली आगीं साकरनिंबोनीं नारंगी ॥
**मधुफाकांडियां मातुलंगीः फनसु** गभीरा ॥ १३६ ॥
वरिखतु रसा चें वडपः तैसें निविडतरूं द्राक्षिमंडप ॥
उघडिलें माणिका चें मोप तैसें पक **दाळिंबू** ॥ १३७ ॥
कवण गणी ते **चंपकः** जेथ असारयातु **पाजतिक** ॥
पल्लवीतु दीसती **अशोकः** लक्षसख्या ॥ १३८ ॥
जेआ कैलासीं उमावनी अमरावतिचिअे चा **नंदन वनीं** ॥
सकलद्वीपी चिआ वृंदावनीं राया मुरारी चा ॥ १६० ॥
जेथ मानुरागें सु मनसें मकरंदआस्वादनमिषें ॥
श्रीकृष्ण पावावेआ दीन्वसें. मुनी षट्पदु जालें ॥ १६१ ॥
जेथ क्रीडैलु श्रीमत-सुन्दरू भणऔनि मळयानील निरंतरु ॥
अनगु राहिला सपरिवारू रूपसौभाग्या लागा ॥ १६२ ॥
वेणुध्वनीं चें अमृतचरू तैसें मकरंदमत्त भ्रमरु ॥
प्रिया तें बोलावितातीं द्विजवरु पंचमालापीं ॥ १६३ ॥
देखौनी मेघ-सावळी श्रीमूर्ती आनंदें मयुरें नृत्ये करीती ॥
शुकसारिका सवादेति वेदांतसिध्दान्ती ॥ १६४ ॥
वेधें एऔनें वृंदावना आंडी गातातीं देवागणा ॥
तेथ क्षेणु एकु श्रीकृष्णमनाः स्थीराविलें ॥ १६५ ॥
जेथ सदा ऋतु सी ऋतु-पती यक्ष यक्षिणी क्रीडा करीती ॥
वन-देवता नाचेती आनंदभरीतें ॥ १६६ ॥
असो हे शब्दरचनाः वर्णी नेणिजे वृंदावना ॥
देआ पहावेआ यमुना नीगते जालें ॥ १६७ ॥

## नवविधी भक्तींचें वर्णन.

जो सकळविद्यांचें जन्मस्थानः नवा रसा चें निधान ॥
तो वाचौनि सदेवुं श्रीमनः आण काई वार्णीति ॥ ४९ ॥
जेओं चा बहूरूप खेळु खेळताः योगिॲ परमसिद्धि पावतां ॥
ताप-त्रयो निवारिताः सकळजना चें ॥ ५० ॥
जें देउ॰ रास-क्रीडा खेळविलाः तें मूर्ती शृंघारूं जाला ॥
गौळणी विनोदें नाचविलाः तें हास्यरसू ॥ ५१ ॥
जें जमोदा भेडाविलाः तें करुणारसू उठाविला ॥
विसारूं काढिआं जितिला. तें रुद्रु जाला ॥ ५२ ॥
मातें श्रीमुखं दाखविलेः तें अद्भुतां सी रूप जालें ॥
विश्वरूपु प्रकटिलेः तें भयानकूं ॥ ५३ ॥
जें दैत्यां वरी संहारूंः तें विभत्सु अणिवारू ॥
शान्तु तो निरंतरूंः तेथ चि असे ॥ ५४ ॥
ऐसें नवरसुं नाटकुः देउ॰ खेळे जन-मोहकु ॥
निज-रूपु तें ब्रह्मादिकुः ठाउकें न होअे ॥ ५५ ॥

श्रीबोपदेवानें ' मुक्ताफल ' ग्रंथाच्या ११ ते १९ अध्यायांत नवविधा भक्तींचें विस्तारपूर्वक वर्णन केलें आहे, तें वरील उताऱ्यांत साराशरूपानें दिलें आहे.

## श्रीकृष्णाच्या नामोच्चाराचें महत्त्व.

श्रीकृष्णगुणनामी करावा आदरूः तरि तुम्हां तुटैल संसारू ॥
जैसा दिनकरें अंधकारूः नासौनि जाअे ॥ ३८ ॥
जैसे तरंगु सागरीः तैसें अनंतावतारीं ईश्वरीं ॥
परि दीतां मुक्तिचे संसारीः ऐसा एकु श्रीकृष्ण चि होअे ॥ ३९ ॥

आतां साडा अन्य-भजनें: का नाइका वेदपुराणें ॥
सुंचिजे ना आनां कव्हणें: एकु श्रीकृष्णसेवा ॥ ४० ॥
जेआं चो नामें उच्चारितु: नारद ब्रह्मानंदें पावतु ॥
तो ध्वनी आइकोनि देश-धडी होतु: महापातकें ॥ ४१ ॥
कव्हणा ह्नीं जप तप तीर्थों: यागदानेंव्रता ॥
कृष्णमहिमे सीं समता: आथी चि ना ॥ ४२ ॥
तीर्थे जन्मैलीं श्रीचरणीं: सकळ देवता जेआंची करणी ॥
तो कैवल्यनाथु श्रीचक्रपाणी जैसें तोरवें ॥ ४३ ॥
जे अज्ञानतमाची तरणी: कैवल्यपदा चीं निशानी ॥
ते श्रीकृष्णकथा वत्साहरणीं: साधीनलु ॥ ४४ ॥

शके तेराशेपासून पुढें तीन चारशें वर्षे महाराष्ट्रांतील संत मंड-मंडळींनीं भगवंताच्या नामोच्चाराचा महिमा याच रीतिनें आपल्या अधिकारयुक्त वाणीनें आपापल्या ग्रंथातून वर्णिला आहे.

## शिशुपालवध कथा.

### मंगलाचरण.

..............................................

साहित्याचेनि परिमळें: शृंगाराचेनि मेळें ॥
प्रबंधें होती मातावळें. कवी-जनाचे ॥ १५ ॥
एथें नाहीं नवलु: वाणिजा परब्रह्म केवळु ॥
कैसें दीसतीं बोलु रसाळु: तें आइकावें श्रोता ॥ १६ ॥
मोतियाचें घोपें: राविलें कुंकुम रसें ॥
तऱ्हीं न एति करीं सरिसें: प्रबंधें सीं ॥ १७ ॥
पाता प्रमेयाची गोडी: अ-मृता उपजे अ-नावडी ॥
साकरेची कीजे कुरोंडी: कवित्व रसें सीं ॥ १८ ॥

बोल जैसे सुधारसें घोळिलेः कीं चांदिना घुमाळिलें ॥
ना ते परिमळें वोविलें. चापे याचेनि । १९ ॥
पडतो श्रीकृष्ण पवाडेः रुक्मिणी बोलो घेंपु पडे ॥
रस रंगाचें पाहाळ उघडेः श्रोतें चांसीं ॥ २० ॥

## या कथेचें महत्व.

नातें मुक्ती-वनितेची दूतिकाः कीं ज्ञानांजनाची शलाका ॥
कीं कैवल्यमंदिरीची पताका. झळकतुसे ॥ ३१ ॥
ना तरी शांतरसें सोपताः साधिनली ज्ञान-लता ॥
कीं विवेकाची सौभाग्यदेवताः मुनिमाळी ॥ ३२ ॥
कीं प्रबंधवसंताची कोकिळा· जीवु-चकोर-संजीवनी चंद्र कळा ॥
का निम्होळ संसार-वाटेची विश्रामशाळा. आर्तजना लागीं ॥ ३३ ॥
कीं अ-विद्यादुर्गीं अवघंटीः अवचितीं मोक्षाची धाडी ॥
अथवा नि विषया चिरा नायपु-वाडी पळतां दीसती ॥ ३४ ॥
कीं धर्मपुष्पावेनि शार्ङ्गपाणी : महापातकाचरी सापतली साधनी ॥
तेवी कथा अंत करणी : मने पटिपासली ॥ ३५ ॥

....................................................................

( नरेंद्र-भास्कर )

ज्ञानेश्वरींतील उपमा व उत्प्रेक्षा यांचा नमुना वरील उताऱ्यांत पहावयास मिळतो. ज्ञानेश्वरकालीन वाङ्मयाचा हा एक विशेष आहे असें म्हटल्यास हरकत नाहीं.

## द्वारकेचें वर्णन.

ऐसे द्वारका देखें निकी जिआ रुपें अमरावती जिंतिली ॥
चिंतामणीचा राज-भाक धेतलीः अमरावती ॥ ११६ ॥
जिआ सत्य-लोकु दुइजें केलाः वैकुंठा पाणी पाहाविला ॥
वैकुंठ गरुड पाडीलाः परवेपर्णा घा ॥ ११७ ॥

कमलविकाशा पुरताः जेथ सदा उदैजे सविता ॥
न तपे परौताः वारा हीं मासा ॥ ३१८ ॥
अमृता चेनि वडपे- थुंगरा चें दपनें सिंपे ॥
तो चंद्र संपूर्णरूपेंः सदा उदें जे ॥ ३१९ ॥
जेथ आनंदरसें दुलतीः अठरा हीं वंशजा जाती ॥
दुसदुमा दावुक वानीः संसारा वरी ॥ ३२० ॥
जेथ पाता चहूं वडी आठरा गाउआ वाहीरि वाडी ॥
सुदमदित भीतरीनिलो वाडीः वारा गाउवें ॥ ३२१ ॥
तेथ सप्त पौळीः रत्नतेजा चीं वाहाळी ॥
उभपणें देती कवळी· धुमंडळा सीं ॥ ३२२ ॥
रत्नगिरी चीं विचित्रें शिखिरें तैसीं आणआणी परि चीं गोपुरें ॥
तेया भीतरीं रीगे घसोरः वीहचूड तो ॥ ३२३ ॥
पुढां कनका चें कळसु देखिलें जैसें तेआ चें पाहाल उपडिलें ॥
रीं आयारीं ठाणें पातीनिलें· सूर्य्य बिंबा चें ॥ ३२४ ॥
ती नि महल्ला हटवटियाः तेया माजी तेराशतें ती खणिया ॥
कणैरिया पाच खणियाः सतरा शतें ॥ ३२५ ॥
एसनी साधिता रचनाः क्वतौतु होइलु मना ॥
परि करावीसे वर्णनाः भीतरीलु माडिअें ची ॥ ३२६ ॥
जेथ पाच लक्ष केसरादि· च्यार लक्षें कुंजरादि ॥
ऐसिया सोनेआ चा प्रसादीः गणणु क्षाकौळलें ॥ ३२७ ॥
माडौनि नवरत्ना चे चौरेंः उभिलीं नंदजायांदिकें मंदिरें ॥
जिअें घडिता साधुनूक सरेः विश्वकर्मया ची ॥ ३२८ ॥
कापुरगणिया चा हाटीं. चेइमे पोताशा ची पेटी ॥
एकीं तारे साटीः तुक विण ॥ ३२९ ॥
कैलासवैकुंठीं जेया ची सिरियाणी. तिअें रत्नें विखितीं कवडेनी ॥
आलींआळिआ सिंतामणीः चोडिअें वचकूं ॥ ३३० ॥

मेणिरा तारा उर्वशी. वोळी धर न ल्हाती कन्हणाँ दोषीं ॥
तें हाटवटी वाणी कैसीः सामाण्यु वानितों ची ॥ ३३१ ॥
चालावेआ वैराग्यमडळाः धृंगारें आपुला दासाव्या पाहिला ॥
श्ववतिकें दासविलाः मन्मथा मी ॥ ३३२ ॥
की मदना चो मेळोः पूर्णचंद्रा चो न इस्वडो आली ॥
की आकाशा इड धाधिलीः धापूर केळी ची ॥ ३३३ ॥
की शृंगारा चीं धामलिंगेः माडा वरी धापिलीं अनेंगें ॥
तैसीं सीरलें दोहीं आगें देराता जाला ॥ ३३४ ॥
नवरत्नां चा चौंयरा पद्मरागा चा लंबोदरा ॥
पाटारंभी साउधराः नाचतु दिसे ॥ ३३५ ॥
ऐसें हाट चोहटें पातुः दळा येनि धसरें असें जातु ॥
दरणावेआ अनतु मंगलमूर्ती ॥ ३३६ ॥
नर देखिलें महाद्वार. जेथ एकवीस रत्ना चें दामोदर ॥
उभिलें निगुना अदधार. विश्वकर्मेनि ॥ ३३७ ॥
दळ बाहिरा पाटस्थापिलें: रंगाला धारितु मांदियाले ॥
तर देखिलिरी राउळः गोपीनाथा चां ॥ ३३८ ॥
जेथ क्षीरपुरां भ्रांती. राजहंस स्फटिकागणीं चाटिती ॥
पदपेआं पुसेआ स्पावर्ती मांगर्फ जवादिको ॥ ३३९ ॥
चंद्रकाना धेयो पाळानेया घरीः पौसाळेया कोंवणा चा वरी ॥
नाचविताति विद्याधरी. मयूरां तें ॥ ३४० ॥
धनधारमळी चें घारें चाटितुः मदन अंबारा सारिरे पूजनु ॥
कुग्य गर्मा विलामा मराळ देसीः राजहंसां ॥ ३४१ ॥
अंगिर्वान गुग्पपर्णे. कस्तुरीमृगीं धी करीनि माजनें ॥
उमानिती कोळिआ भी कर्दीलपर्णेः कृष्णगुमरी ॥ ३४२ ॥
आगलें चैं नि योग्याळवर्णे प्रतिबिंबला तारांगणें ॥
निर्में फुलें गर्भ नि शिहाणें. वेचों भोवती ॥ ३४३ ॥

पारिजातकां चा उद्यानीं: कृष्णविरहें तातलिआ कामिनीं ॥
तिआ विझीजती माधवनी. कापूर केळी चा ॥ ३४४ ॥
ऐसी राउळें पाहिलीं: मग साउमा दृष्टी सूदली ॥
तंवं सु-धर्म-सभा देखीनिलीः यादवा चीं ॥ ३४५ ॥

( कवीश्वर-भास्कर )

## श्रीकृष्णाचें स्तोत्र.

का कुंकुमें रावीलियाः आनंदा चिया कापडगादिया ॥
कीं रंग-दळा चाउरियाः चैतन्या चिया ॥ ३८० ॥
कीं मुक्ती चें वश्यकरण कीं ब्रह्म-विद्ये अनुरागा चें ध्यान ॥
कीं चरणें मोक्षनिधानः मोहापहारा ॥ ३८१ ॥
जे योगिया चें जीवनः ब्रह्मविद्ये चें जन्मस्थान ॥
तें सुरेख दिसे चिन्हः पद्ममुद्रे चें ॥ ३८३ ॥
जेया चा देखौनि उमाळाः पळे महामोहा चा पाळा ॥
तो ध्वजू उद्याळाः सरळू दिसे ॥ ३८४ ॥
जरि चैतन्या पालवा नीगती. वरि तारागणें फुलेंती ॥
तरि तें नखें उपमीजेती. श्रीकृष्णाचीं ॥
गाजता कलरवीं अरी वधूंचें वैधव्य पडवी ॥
तो तोडरू घवघवीः वामचरणीं ॥ ३८८ ॥
सुखि चिआ पिका दोषें: मुद्गपोटरिआ आलें जैसें ॥
जंघाद्वयें तैसें· गमलें मज ॥३८९ ॥
आनंदा चिआं केळी जरि दिसतिआ एकीं वेळीं ॥
तरि माडिया चो आऊँडीः उपमींजेती ॥ ३९० ॥

( कविश्वर-भास्कर )

## शिशुपालयुद्धवर्णन.

खवळैला कृतातु डाडाइला. की निठुरा महाकाळु ऊन्मनाइला ॥
तैसा हिंडिंवारू वेरा. बाहवें तेणें ॥ १००५ ॥

धालाधारी चें आंग साधों कैसें चालिता बिंदु न दिसें ॥
घना समुद्रीच हारू जैसें पुआळितु ॥ १००६ ॥
तया मुरारी चे सैन्य पालाणिलें जैसे मार्तंड रू तेजें धेडल ॥
का भूमी जैल लोटल. प्रलय मेघांचें ॥ १०१५ ॥
शौर्यसरिता चा ओघु सुटला कीं प्रलयसमुद्रा चा तुव फुटला ॥
तैसा घसरें निगाला दळभारू तो ॥ १०१६ ॥
टळतु फरारें पताका मिळतु चवरें सडका ॥
माडी हालमें मत्युलेका कुळाचळ वेन्ही ॥ १०१७ ॥
जगचवर जगमग रणशोयरे रणबागुल ॥
तोडरराने तोडरमल खाडे मराठा ॥ १०२४ ॥
तथ वाजती शंख काहाळा तुररिआ सांबा सरंगिवाळा ॥
डांडा चीं टवस टोल वीरघग ताबारिया ॥ १०२६ ॥
निशान पन्हो भेरी राभनिडागिडिआ रणमोहरी ॥
गर्जेआ वाद्यआ चा गजरीं पातिला रणभूमी तो ॥ १०२७ ॥
रणभूमी चा धाणा करौनि मारिता महाकाळु इगु गाळीतुसें जैसा ॥
गरगरा पालु भयतुबें तेसा दोहीं दळाचा ॥ १०४३ ॥
कीं दळावेआ पृथिवी चा आर्ता पावराभ्री वैरणें घातलें मजयाना ॥
तवि दोनि दळें भिन्ला वीरा चें पीठ झालें ॥ १०४४ ॥
निशानु काहाळा तावापिआ रायगिडगिडि योघडिआ ॥
वाजना अपरू माले चिरानिआ तिआं घेळें ॥ १०५३ ॥
उपसा रणीं होणरें शौरें घाईं मातलें ॥
हातींचें रुधिर पीताती तान्हेल तडम भरू नी ॥ १०५६ ॥
धांवे भालेआ ची हुली घातिली तिआं देयां ची पखाळी फोडिली ॥
कडुमाडु चिर ी गेली फुग दपे दि ना ॥ १०६५ ॥

( ऋद्धिपुर-भास्कर )

## गुरुकृपेचें महत्त्व.

म्हणे के हें विरहे फिटेल । कें तो स्वामी भेटेल ।
युगाहूनि वडिल । निमिषमानी ॥ ३७९ ॥
ऐसया गुरुग्रामांव आलें । का स्वयें गुरुनीचि धाडिलें ।
तरी गतायुष्या जोडलें । आयुष्य जैसें ॥ ३८० ॥
का सुकृतया अंकुरा । वरि पडलिया पायूपधारा ।
ना ना अल्पोदकींचा सागरा । आला माशा ॥ ३८१ ॥
नातरी रंकें निधान देखिलें । का आंधळिया डोळे उघडले ।
भणगाचिया आंगा आलें । इंद्रपद ॥ ३८२ ॥
तैसा गुरुकुळाचेनि नांवें । महासुख अति थोरीवें ।
जे कोडेंही पोटाळवे । आकाश धा ॥ ३८३ ॥
प गुरुकुळीं ऐसा । आवडी जया देखसी ।
जाण ज्ञान तयापासीं । पाइकी करी ॥ ३८४ ॥
आणि अभ्यंतरिलियेकडे । प्रेमाचेनि पवाडें ।
श्रीगुरुचें रूपडें । उपासी ध्यानीं ॥ ३८५ ॥
हृदय शुद्धीचिया आवारीं । आराध्यु तो ध्रुव करी ।
मग सर्व भावेंसीं परिवारीं । आपण होय ॥ ३८६ ॥
कार्तैयन्याचियें पोवळीं । माजि आनंदाचिया राउळीं ।
श्रीगुरुलिंगा ढाळी । ध्यानामृत ॥ ३८७ ॥
उद्‌गिजता बोधार्का । बुद्धीची डाळ सात्त्विका ।
भरोनिया त्र्यंबका । लाखोली वाहे ॥ ३८८ ॥
काळशुद्धी त्रिकाळीं । जीवदशा धूप जाळी ।
ज्ञानदीपें वोवाळी । निरंतर ॥ ३८९ ॥
सामरस्याची रससोय । अखंड अर्पितु जाय ।
आपण भराडा होय । गुरु तो लिंग ॥ ३९० ॥

नातरी जीवाचिये सेजे गुरु कांतु करूनि भुंजे ।
ऐसी प्रेमाचेनि मोजें । बुद्धी वाहे ॥ ३९१ ॥
कोणेएके अवसरीं । अनुरागु भरे अंतरीं ।
कीं तया नाम करी । क्षीराब्धी ॥ ३९२ ॥
तेथ ध्येयध्यान बहुसुख । तेचिशेषतुळिकानिर्दोख ।
वरिजळशयन देख । भावी गुरु ॥ ३९३ ॥
मग वोळगती पाय । ते लक्ष्मी आपण होय ।
गरुड होऊनि उभा राहे । आपणचि ॥ ३९४ ॥
नाभीं आपण जन्मे । ऐसें गुरुमूर्तिप्रेमें ।
अनुभवी मनोधर्में । ध्यानसुख ॥ ३९५ ॥
एकाधिये वेळे । गुरु माय करी भावबळें ।
मग स्तन्यसुखें लोळे । अंकावरी ॥ ३९६ ॥
नातरी गा किरीटी । चैतन्यतरुतळवटीं ।
गुरु धेनु आपण पाठीं । वत्स होय ॥ ३९७ ॥
गुरु कृपा स्नेह सलिलीं । आपण होय मासोळी ।
कोणे एके वेळीं । हेंचि भावी ॥ ३९८ ॥
गुरु कृपामृताचें वडप । आपणसेवावृत्तीचें होय रोप ।
ऐसेसे संकल्प । विजे मन ॥ ३९९ ॥
चक्षुपक्षेंवीण । पिलूं होय आपण ।
कैसें पैं अपारपण । आवडीचें ॥ ४०० ॥
गुरूतें पक्षिणी करी । चारा घे चांचूवरी ।
गुरु तारू धरी । आपण कांस ॥ ४०१ ॥
ऐसे प्रेमाचेनि थावें । ध्यानेंचि ध्यानातें प्रसवे ।
पूर्णसिंधू हेलावे । फुटती जैसे ॥ ४०२ ॥
किंबहुना यापरी । श्रीगुरुमूर्ति अंतरीं ।
भोगी आतां अवधारी । बाह्यसेवा ॥ ४०३ ॥

ज्ञानेश्वरी (अध्याय ७ श्लोक ३९१ ते ४०३)

दामोदर पंडित, कवीश्वर भास्कर, नरेंद्र पंडित व ज्ञानेश्वर हे समकालीन होते. कवीश्वर भास्करानें शिशुपालकाव्य शके ११९५ त रचिलें. दामोदर पंडिताचें 'वच्छहरण' शके ११९४ ते १२२६ या सालाचे दरम्यान निर्माण झालें असावें असें भावे यांचें मत आहे. नरेंद्रपंडित याचा उल्लेख पूर्वी येऊन गेला आहे. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ शके १२१२त लिहून पुरा झाला. वर दिलेल्या उताऱ्यावरून या सर्व कवींची काव्यरचनेची शैली एकाच प्रकारची होती असें दिसून येतें. उपमा, उत्प्रेक्षा वगैरे अलंकारांनीं काव्य सजविण्याची दरएकास आवड होती, असें त्यांच्या ग्रंथावरून स्पष्ट दिसतें. वच्छहरणांतील **वृंदावनाचें** वर्णन, शिशुपालवधांतील द्वारकेचें वर्णन व ऋद्धिपुरवर्णनांतील **राजमठप्रवेश** वर्णन व पक्वान्नवर्णन हीं प्रकरणें फार बहारीचीं आहेत. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ अध्यात्मविषयक असल्यामुळें त्यांत वर्णनात्मक भाग क्वचित् दिसून येतो. तथापि अध्यात्मासारख्या गहन व रुक्ष विषयाचें विवरण, उपमा व उत्प्रेक्षा यांच्या योगानें सुलभ करण्याची श्रीज्ञानेश्वराची हातोटी अप्रतिम आहे. हे चार ग्रंथ वाचतांना ते एकाच साच्यांतून निर्माण झाले आहेत कीं काय अशी वाचकास भ्रांति पडते! परंतु ज्ञानेश्वरींतील मराठी भाषा तत्कालीन महानुभावीय ग्रंथांतील भाषेपेक्षा वेगळ्या स्वरूपाची आहे यांत शंका नाहीं. ज्ञानेश्वरींतील भाषा दुर्बोध वाटते, याचें कारण त्यांत तत्कालीन कोंकणी, खानदेशी ऊर्फ अहिराणी वगैरे भाषांतील शब्दांचा भरणा जास्त दिसून येतो. महानुभावीय ग्रंथांतील भाषा ज्ञानेश्वरींतील भाषेपेक्षा जास्त शिष्ट ऊर्फ नागर असून, तिच्यांत वैदर्भीरीतीची छटा जागोजाग दिसून येते. ज्ञानेश्वरीनंतर, तेरा ते सोळा शतकांत महाराष्ट्रांत जे

वाङ्मय निर्माण झालें त्यांतील भाषा नागर ऊर्फ शिष्ट आहे. चवदा, पधरा, सोळा या शतकांतील महानुभावीय ग्रथांचें व त्यांतील भाषेचें स्वरूप कसें होतें, या विषयीं सविस्तर वर्णन श्रीयुत यशवंतराव देशपांडे यानीं आपल्या महानुभावीय मराठी वाङ्मय या ग्रंथात दिलें आहे. वच्छहरणातील पुढें दिलेल्या उताऱ्यावरून नागरी बोली ही किती रसपोषक आहे व हिचा काव्यात उपयोग केला असता सामान्य जनाचें कसें रजन होतें, ह्याचें हुबेहुब चित्र दामोदरपंडितानीं रेखाटलें आहे

उपमा श्लेष वर्णक एही रस ॐ सकळैक लोक ॥
कीं पवाडे ससारमोचक वाणीं मुकुंदा चे ॥
प्राकृत जण मानवतीं तैसी ॐ ह ॐ कथासंगती ॥
कीं पर्वी परब्रह्माची कीर्ति जें जीवणु संता चे ॥
नागरीं बोलीं रचल वाणिजे • सकळ रसीं तें फोखिजे ॥
कीं निरसा होऔनि श्रीकृष्णीं भजीजे या दों श्रवणु चांग ॥

ह्यावरून दामोदर पंडिताचे वेळीं म्हणजे बाराव्या शतकाचे अखेरीस मराठी भाषेचे शिष्ट व अशिष्ट असे दोन भाग अस्तित्वात होते असे दिसून येतें बाराव्या शतकातील मराठी भाषा इतक्या प्रौढदशेस पोहों-चली होती, यावरून त्याकाळापूर्वीं मराठींत मोठ्या प्रमाणावर ग्रंथरचना झाली असलीच पाहिजे यात शका नाहीं हे सर्व वाङ्मय नष्ट व्हावें, हे महाराष्ट्राचें दुर्दैव होय! देवगिरीच्या यादवांच्या वेळचे पुष्कळ शिलालेख व ताम्रपट संस्कृत अगर कानडी भाषेत कोरलेले आहेत कर्नाटक, म्हैसूर वगैरे प्रांतात ज्या राजाचा अमल होता, त्या राजाच्या वेळचे पुष्कळ शिलालेख कानडींत आहेत व ते Rice साहेबानीं छापले आहेत यावरून कानडी भाषा फार प्राचीन

काळपासून दरबारी भाषा होती असें दिसून येतें. आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या महानुभावीय ग्रंथांत श्रीकृष्णाचें चरित्र व त्याच्या लीला ह्यांसच प्राधान्य दिलेलें आहे. यावरून हें वाङ्मय एकदेशीय आहे, असें दिसतें. श्रीवल्लभाचार्य ह्यांच्या सांप्रदायांत श्रीकृष्णाच्या उपासनेस प्राधान्य दिलें आहे, त्यामुळें त्या सांप्रदायाचें वाङ्मय एकदेशीय झालें आहे. निदान या बाबतींत तरी या दोन सांप्रदायाचें परस्पराशीं बरेंच साम्य आहे. असें म्हटल्यास हरकत नाहीं. महानुभाव पंथांतील लोकांनीं आपल्या ग्रंथांची जोपासना विशिष्ट प्रकारानें केल्यामुळें त्यांचें वाङ्मय जसेच्या तसें कायम राहिलें, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

वच्छहरण, शिशुपालवध व ऋद्धिपुरवर्णन या ग्रंथांत 'प' च्या ऐवजीं 'ख' चा उपयोग केलेला आढळून येतो. जसें, मनुख (मनुष्य), तोख (तोष), वर्खति (वर्षति) तसेंच 'ण' च्या ऐवजीं 'न' चा सर्व ठिकाणीं उपयोग केलेला दिसतो. महानुभाव पंथाचा प्रवेश पंजाबांत पंधराव्या शतकांत झाला व त्या प्रांतांत ह्या पंथाचे बरेच अनुयायी आहेत. पंथाच्या प्रसाराबरोबर मराठी भाषेचाहि प्रवेश तेथें झाला. याप्रमाणें महानुभावपंथीयांनीं महाराष्ट्र भाषेचें निशाण पंजाब व काबूल प्रांतांत मराठी राज्याचा उदय होण्यापूर्वी शेंदिडशें वर्षें अगोदर फडकाविलें, ही गोष्ट या पंथास अत्यंत भूषणावह आहे, यांत शंका नाहीं हेमाद्रीच्या हयातींत या पंथाची स्थापना होऊन, त्यांतील ग्रंथकाराकडून थोडक्या काळांत मराठींत मोठ्या प्रमाणावर प्रतिभासंपन्न वाङ्मय निर्माण व्हावें, हें एक ईश्वरी सूत्र होय, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. या पंथांतलि संतोष मुनि कृष्णदास यानें शके १४८६

मध्यें 'रुक्मिणी स्वयंवर' नामक ग्रंथ लिहिला. त्यांत त्यानें ज्ञानेश्वरीच्या धर्तीवर मराठी भाषेची स्तुती केली आहे. त्यांतील उतारा पुढें दिला आहे.—

माथा व्यासादिकीं मुनी ॥ कथा बोलिलें संस्कृता वानी ॥
ते आतां म-हाटीया भाषा करूनीं ॥ सांगीजताया ॥ ४१ ॥
अपभ्रंश पैशाच जानें ॥ मागधी आनीं सुरसेने ॥
संस्कृत प्राकृत या पटवाणी ॥ आनीकी छपन्न भाषा ॥ ४२ ॥
या भाषांचे पाक विस्तार ॥ करावया म-हाटी एक चतुर ॥
तयाचेन प्रसादें जानीजति विचार ॥ सर्व भाषांचे ॥ ४३ ॥
म्हनाना संस्कृताची टीका ॥ म-हाटी म्हनीजताय आईका ॥
जसा हेमाची मुद्रीका ॥ वरी गरुड पाच ॥ ४४ ॥
तसी छपन्न भाषांचीय मुगटी ॥ शोभे मुद्रावी सुंदर म-हाटी ॥
आनीं संस्कृत वान्धीले पोटीं ॥ वागवी पुढा करूनी ॥ ४५ ॥
जैसा स्नेहाळु जननी ॥ अपत्य वागवी करीं धरूनी ॥
तैसी पटभाषा ल मुनी ॥ व्यापारचीत असे ॥ ४६ ॥
येने श्रोते कोणते ज्ञानी ॥ म्हने तीं संस्कृत तव देववानी ॥
ता यसी उपमाकारे खाना ॥ दीधली तुवा ॥ ४७ ॥
**म-हाटी स्त्रीलिंग वाक्य ॥ आनीं संस्कृत तव नपुंसक ॥**
म्हनोनि वाक्यत्व आधिक ॥ तयासीच साजे ॥ ४८ ॥
ऐसी हे सर्व भाषांची जननी ॥ उत्तम पवित्र म-हाटी वानी ॥
आदि पुरुषें आ·ी केली म्हनोनि ॥ अनीवार श्रीदें आली ॥ ४९ ॥

अपभ्रष्ट पैशाची, मागधी, शौरसेनी, संस्कृत, प्राकृत, व इतर अनेक छप्पन्न भाषांची जननी मराठी भाषा आहे असें वरील

उतार्‍यांत ध्वनित केलें आहे. मुसलमानी राजांच्या अमदानींत फारशी भाषेंतील बरेच शब्द मराठींत घुसले. महाराष्ट्रभाषेवरील ही आपत्ति दूर करण्यासाठीं श्रीशिवाजी महाराजांनीं आपल्या राजचर्टीत एक शब्दकोश तयार करविला होता ही गोष्ट सर्वश्रुत आहे.

कै. भावे ह्यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'महानुभावीय कविकाव्यसूचि'-मध्यें दर्शविलेले सर्व ग्रंथ शारदाश्रमातर्फे प्रसिद्ध करण्याचें काम, आमचे मित्र श्रीयुत यशवंतराव देशपांडे यांनीं अंगीकृत केलें आहे. त्याकामीं त्यांस यश येवो, अशी परमेश्वरापाशीं प्रार्थना करून हा भाग समाप्त करितों.



## भाग ८ वा.

### हेमाडपंती देवळें.

विष्णुप्रीत्यै चतुर्वर्गचिन्तामण्यामनीगणन् ।
भेदान् व्रतानां दानानां तीर्थानां मोक्षवर्त्मनाम् ॥
मूर्तिप्रासादपूजानां हेमाद्रिर्गणनाग्रणी ॥

( बोपदेवाचें "मुक्ताफल")

Where towers are crushed and unforbidden weeds
O'er mutilated towers shed their seeds
And temples doomed to milder change unfold
A new magnificence that vies with old

Wordsworth

वरील संस्कृत श्लोकांत 'प्रासाद' शब्द आहे. हेमाद्रीनें मुक्ताफलावर टीका लिहिली आहे, त्यांत प्रासाद शब्दाचा अर्थ देवकुल म्हणजे देवालय असा केला आहे. त्यानें इमारती बांधण्याचे पद्धतींत महत्त्वाच्या सुधारणा करून शिल्पकलेंत क्रांति घडवून आणली, अशी परंपरागत समजूत आहे. हेमाद्रि हा सनातन वैदिक धर्माचा कट्टा अभिमानी होता, व या धर्माच्या अभिवृद्ध्यर्थ त्यानें कसकसे परिश्रम केले, या विषयीं पूर्वी इंगित येऊन गेलें आहे. चतुर्वर्गचिंतामणीसारखा ग्रंथ लिहून हिंदुधर्मास काल-यवनानें आलेली ग्लानि दूर करण्याचें श्रेय त्यानें संपादिलें. यादवांच्या साम्राज्यांत करणाधिपाचे हुद्यावर असतांना हेमाद्रीनें राजाश्रयाचे जोरावर जागोजाग देवालयें बांधून धर्मजागृतीचें काम नेटानें पार पाडलें

नगर, खानदेश, नाशिक व पुणें या चार जिल्ह्यात, तसेंच वऱ्हाडात व निझामच्या राज्यातील काहीं भागात 'हेमाडपती' या टोपण नावानें संबोधलेलीं असंख्य देवळें अद्याप दृष्टीस पडतात हेमाद्रीनें उर्फ हेमाडपतानें ज्या एका विशिष्ट रीतीनें देवालयें बांधण्याचा उपक्रम केला, तिला 'हेमाडपती' हें टोपण नाव पडलें हेमाद्रीच्या पूर्वी भरतखंडात आर्यावर्त, चालुक्य, द्राविडी पल्लव, कदंब, जैन, बौद्ध, गांधार वगैरे इमारती बांधण्याच्या अनेक पद्धति अस्तित्वात होत्या ही विशिष्ट नावें काहींना देशपरत्वें व काहींना राजघराण्यावरून पडलीं आहेत चालुक्य घराण्याच्या राजवटींत इमारती बांधण्याची जी एक विशिष्ट पद्धति प्रचलित होती, तिला 'चालुक्य' हें नाव पडलें तसेंच पल्लववंशीय व कदंबवंशीय राजांच्या अमदानींतील इमारती ज्या विशिष्ट पद्धतीनें बांधल्या जात, त्या अनुक्रमें 'पल्लव' व 'कदंब' या नावांनीं प्रसिद्ध आहेत जैनधर्मीयांनीं आपल्या धर्माच्या प्रसारार्थ हिंदुस्थानात जागोजाग जीं देवळें बांधिलीं, ती शिल्पशास्त्रदृष्ट्या फार महत्त्वाचीं आहेत हीं देवालयें ज्या विशिष्ट पद्धतीनें बांधण्यात आलीं, तिला 'जैन' पद्धति म्हणतात अबूच्या पहाडावरील जैनांच्या देवाल्या तील नक्षीकाम इतकें बहारीचें आहे कीं, त्याबद्दल पाश्चिमात्य शिल्पशास्त्रज्ञास अत्यंत कौतुक वाटतें या पद्धतीस 'गुजराथी' असेंही दुसरें नाव केव्हा केव्हा देण्यात येतें

भरतखंडात शिल्पशास्त्र उर्फ वास्तुशास्त्र फार प्राचीनकाळीं परिणतावस्थेस पोहोंचलें होतें या शास्त्रावरील सर्व ग्रंथ संस्कृतात

लिहिलेले आहेत. कै. वझे यांनीं, स्थापत्यशास्त्रावर संस्कृतांत लिहिलेल्या काहीं ग्रंथाचें मराठींत रूपांतर केल्याचें समजतें.

प्रसन्नकुमार आचार्य यांनीं प्राचीन आर्यशिल्पकलेचा इतिहास लिहिला असून, या शास्त्रावरील ग्रंथकार व त्यांचे ग्रंथ यांची सविस्तर सूचि तयार केली आहे. देवगिरीच्या यादवांच्या अमदानींत दक्षिणेंत जे प्रख्यात शिल्पकार निर्माण झाले, त्यांपैकीं काहींचीं नावें त्यांनें दिलीं आहेत तीं येणें प्रमाणें.—कालिदास, जनकाचार्य, ( हलेबीड येथील ), थालु ( ह्याचें नांव बहाळ येथील शके ११९४ च्या शिलालेखात दिलें आहे. ); देवनाग; विधे ( थे ); देमोज ( अल्हणदेवी येथील शिलालेखात उल्लेखिलेला ), भूतपाल, विमनम, मान, महीधर, सुभदेव, शूलपाणि ( राणक ), सामल, सिंगायभट्ट, झांपून, वगैरे. ह्यांपैकीं सिंगायभट्टानें बुक्करायाच्या हुकुमानें कलडिपासून शिरेरतलावापर्यंत दहा मैल चुनेगच्ची पाणी नेण्याचा नळ बांधिला होता, असा उल्लेख तत्कालीन ग्रथात केलेला आढळतो. याशिवाय प्रसन्नकुमारानें शिल्पशास्त्रीय पारिभाषिक शब्दांचा सविस्तर कोश तयार केला आहे.

वास्तुशास्त्राचे निरनिराळे भाग असून प्राचीनकाळीं त्यांतील प्रत्येक भागावर तज्ज्ञानीं ग्रंथ लिहिले आहेत. ह्यांपैकीं मानसार, कारयप व अगस्ति यांनीं रचिलेलें शिल्पशास्त्र, शुक्रनीति, सुप्रभेदागम, सनत्कुमार-वास्तुशास्त्र, हस्तप्रमाण वगैरे प्रमुख ग्रंथ आहेत. शिवाय, काहीं पुराणात मधून मधून शिल्पशास्त्रासंबंधीं विवेचन केलेलें आढळून येतें. भरतखंडात निरनिराळ्या वेळीं २ बांधण्याच्या ज्या पद्धति प्रचलित होत्या, त्यांचें वर्णन



हेमाडपंती देवळाच्या पद्धतीचा नकाशा ( ground-plan )

खानदेश व वऱ्हाड याच्या सरहद्दीवर अमल्यामुळें, हेमाडपंती पद्धतीनें बांधिलेलीं देवालयें तेथें बरींच आढळतात, परंतु या पद्धतीचा विशेष काय आहे, याबद्दल शिल्पशास्त्रावरील प्राचीन संस्कृत ग्रंथांत उल्लेख आढळून येत नाहीं कं वझे यांनीं प्राचीन आर्यशिल्पशास्त्राचा परिश्रमपूर्वक अभ्यास केला होता, त्यासही हेमाडपंती पद्धतीचा सदरील ग्रंथांत मागमूस लागला नाहीं. त्याचप्रमाणें प्राचीन शिल्पशास्त्रासंबंधीं आंग्ल तज्ज्ञांनीं जे ग्रंथ लिहिले आहेत, त्यांतही या पद्धतीसंबंधानें काहीं माहिती उपलब्ध नाहीं

कोणतीहि इमारत बांधण्याच्या कामीं विटांचा व दगडाचा उपयोग करावा लागतो, व ते एकमेकांस घट्ट चिकटून बसले जावे म्हणून चिकणमातीचा किंवा चुन्याचा उपयोग अवश्य करावा लागतो भूमितिशास्त्राच्या आधारें दगडाचें चिरे, काटकोन, त्रिकोण, चौकोन, वर्तुळ अशा निरनिराळ्या आकाराचे तयार करून ते एकमेकांवर कुशलतेनें बसविले असतां चुन्याच्या सहाय्याशिवाय मजबूत व फार वर्षे टिकणारी इमारत बांधता येते ही कल्पना हेमाद्रीनें काढली अशी सार्वत्रिक समजूत आहे हेमाडपंती देवळाचीं जी वर्णनें वाचण्यांत येतात, त्यावरून या घाटाचीं देवळें, दगडाचे चिरे एकमेकांवर अगर एकमेकांत विशिष्ट रीतीनें बसवून चुन्याच्या सहाय्यावांचून बांधलेलीं असतात, व तीं फार वर्षे टिकतात असें दिसतें त्रिकोण, चतुष्कोण, काटकोन, वर्तुळ, अर्धवर्तुळ वगैरे आकाराचे दगडाचे चिरे बनविण्यांत येऊन ते एकमेकांत इतक्या कुशलतेनें बसविले असतात कीं त्यामुळें इमारतीच्या दरएक भागास आधार मिळून त्यावर इमारतीचें छतही निर्धोक राहू शकतें यावेरीज इमारती बांधण्याच्या योजनेंत

पुढील विशिष्ट प्रकार जागोजाग आढळून येतात. बहुतेक देवळांच्या दर्शनी भागीं, भोगमंडपाची ( Portico ) योजना केलेली असते. तसेंच देवालयाच्या सभामंडपाकरितां वेगळे स्तंभ उभारण्यांत येऊन, शिवाय त्यांतील दरएक कोपऱ्यांत चारचार खांब चौकोन साधून उभारलेले असतात. देवळाच्या दर्शनी खांबांवर, सभामंडपांतील खांबांवर व छतावर पौराणिक काळांतील देवतांचीं चित्रें कोरलेलीं असतात. कित्येक ठिकाणीं तर बीभत्स चित्रें कोरून शिष्टाचाराचा भंग केलेला दृष्टोत्पत्तीस पडतो.

शालिवाहनाच्या बाराव्या शतकांच्या अखेरीस व तेराव्या शतकांत दक्षिणेंत जीं देवळें चुन्याच्या सहाय्याविना निव्वळ दगडाच्याच चिऱ्यांनीं बांधिलीं आहेत, व ज्यांना पुष्कळसे कंगोरे ( Mouldings ) असून ज्यांच्या बाहेरील व आंतील बाजूस पौराणिक काळांतील देवतांच्या मूर्ति कोरलेल्या असतात,त्यांना'हेमाडपती देवळें' म्हणण्याचा सर्वसाधारण प्रघात आहे. परंतु हेमाद्रीचे पूर्वीं बांधलेल्या देवालयांतहि ह्या पद्धतीचा थोडाबहुत नमुना पहावयास मिळतो.निलंग व नारायणपूर येथील देवालयें शुद्ध हेमाडपंती पद्धतीचे नमुने होत. या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत पृष्ठ १०१ वर आंबे येथील शिलालेखाचें वर्णन दिलें आहे. तो शिलालेख आंबे येथील जोगाईच्या देवळांतील आहे. हें देऊळ शके ११६० पूर्वी बांधिलेलें असून त्याचा सर्वसाधारण घाट हेमाडपंती देवळासारखा आहे. हिंदुस्थानांत मुसलमानांचा अंमल झाल्यावर ज्या इमारती बांधल्या गेल्या, त्यांत प्राचीन भारतीय शिल्पकलेच्या पद्धतीचा अंगिकार केलेला दिसतो. हिंदु देवतांच्या मूर्ति खेरीजकरून, नक्षी वगैरेच्या बाबतींत हिंदी कारागिरांनीं

इमारती बांधण्याचें धोरण प्राचीन भारतीय पद्धतीवर ठेविलें होतें, असें बऱ्याच आग्ल संशोधकाचें मत आहे

या भागाचे अखेरीस, निजामच्या राज्यातील नीलाग व नारायण पूर येथील हेमाडपती पद्धतीं देवळें व त्यांतील नक्षीकाम यांची छायाचित्रें दिलीं आहेत न अ हा नीलाग येथील देवालयाचा नकाशा ( ground plan ) आहे नीलाग हा गाव निजामच्या राज्यात थेर्णा नदीच्या काठीं असून एका प्रांताच मुख्य ठिकाण आहे त्या ठिकाणीं हेमाडपती पद्धतीचें एक शिवालय पडक्या स्थितीत आहे ह्या देवालयास तीन गाभारे आहेत त्यांपैकीं प्रत्ये कावर एक एक शिखर होतें ही तिन्हीं शिखरें देवालयाच्या सभामंडपासुद्धा हल्लीं नष्ट झालीं आहेत या देवळाचा सभामंडप ३०॥ फूट लाब-रुद असून चौरस आहे सभामंडपाच्या दरएक कोपऱ्यात चार खाब, याप्रमाणें एकदर १६ खांब आहेत हें देऊळ बांध ण्याच्या कामीं उपयोगात आणलेला दगड काळा आहे प्रत्येक गाभाऱ्यास नक्षीदार दरवाजा आहे मुख्य गाभाऱ्याच्या दरवा जावरील नक्षीकाम फार बहारीचें आहे न ब हें एका गाभा ऱ्याच्या दरवाजाचें छायाचित्र आहे, या दरवाजाची उंची ५ फूट ४ इंच असून रुंदी २ फूट ७ इंच आहे ह्याचा उंब रठा फार उंच असून त्याच्या मध्यभागाला एक पायरी आहे या दरवाजावर देवतांचीं चित्रें आहेत. मध्यभागीं देवीचें चित्र कोरलें आहे प्रत्येक दरवाजाच्या खालच्या बाजूस हातात माणसाची कवटी धरलेली अशी शिवाची मूर्ती आहे मुख्य गाभाऱ्यात शिवाचें लिंग असून, बाकीच्या दोन गाभाऱ्यात दगडात कोरलेल्या शिवाच्या

प्लेट ब.



नीलंगे येथील हेमाडपंती देवळाच्या गाभाऱ्याच्या दरवाजाचें नक्षीकाम. ( छायाचित्र ).

मूर्ती आहेत या देवळाच्या चोथऱ्यावर दहाव्या शतकातील निर निराळें कंगोरे ( mouldings ) दाखविले आहेत व दरएक गाभाऱ्याच्या दर्शनी भागास एकेक कोनाडा आहे, व त्यात निरनिराळ्या देवताच्या मूर्ति बसविल्या आहेत एका कोनाड्यात अस्थिपंजर महा काळी देवीची मूर्ति असून तिच्या पोटावर विंचू आहे असा देखावा दाखविला आहे दुसऱ्या कोनाड्यात महिषासुरीचे व तिसऱ्या कोनाड्यात शिवाचें चित्र आहे या शिवाय इतर बाजूवर योगी, अप्सरा, वगैरेची चित्रें आहेत छायाचित्र न व वरून गाभाऱ्याच्या दरवाजावरील नक्षीकामाची थोडीबहुत कल्पना येईल

कल्याण हें शहर चालुक्याची दक्षिणेंतील राजधानी होती तेथून काहीं अंतरावर एका तलावाचे काठीं नारायणपूर नावाचें एक खेडें आहे त्या तलावास पूर्वी घाट बांधलेले असून त्यावर भव्य देवळें असावींत, असें दिसतें हें ठिकाण चालुक्य राजघराण्याचें पवित्र ठिकाण होतें परंतु गेल्या ६०० वर्षात हें स्थान मुसलमानाच्या स्वाऱ्यामुळें बेचिराख झालें आहे इ स १६३५ मध्यें खान दुराण खानें हें खेडें हस्तगत करून लुटलें येथील दोन देवळाचे काहीं भाग हल्लीं अवशिष्ट आहेत पैकीं एक जमिनदोस्त झाला आहे याचा मध्यवर्ति सभामंडप व गाभाऱ्याचा चौथरा मात्र कायम आहे हें देवालय नीलाग येथील देवालयाचे धर्तीवर असून हेमाडपती पद्धतीनें बांधिलेलें होतें काळ्या दगडाच्या चार खांबावर या देवळाचें सभामंडपाची उभारणी काटकोनी, त्रिकोनी अगर चोकोनी, दगडाचे चिरे कुशलतेनें बसवून केली आहे. या देवळाचा घाट बाराव्या शतकातील देवालयाच्या घाटाप्रमाणें आहे दुसरें देवालय

साधारण चागल्या स्थितींत असून त्यावर नक्षीचें काम जास्त केलेलें आहे या देवळातील खाबावर व देवळाच्या बाहेरील भिंतीवर नक्षीकाम केलेलें दिसतें, परतु भिंतीवरील चित्रें बीभत्स आहेत या देवाल्याचा सभा-मडप खाबावर उभारलेला असून त्याएक खाबाची उंची ९ फूट ६ इ आहे या सभामडपात जाण्यासाठीं तीन बाजूनीं दर्शनी मडप (प्रवेशमडप) होते परतु उत्तर व दक्षिण बाजूकडील मडप जमिनदोस्त झालेले आहेत पश्चिम बाजूस देवाल्याचा गाभारा असून त्यात शिवाचें लिंग स्थापिलेलें आहे गाभाऱ्याच्या दरवाजावर मनुष्याच्या आकृति असून शिवाय वाघ व इतर प्राण्याचीं चित्रें कोरलेली आहेत सभामडपावर छत असून त्याच्या प्रत्येक कोपऱ्यास त्रिकोणाकृति चार चिरे बसविलेले आहेत दरवाजाच्या दर्शनीपट्टीवर लक्ष्मीचें चित्र खोदलेलें आहे तिच्या शिरोभागावर मुकुट असून प्रत्येक हातात कमळाची कळी आहे नक्षीकाम केलेले दगड आजूबाजूला अस्ताव्यस्त पडलेले आढळून येतात हें देवालय निव्वळ हेमाडपता पद्धतीनें बाधिलेलें होतें असें दिसते

या देवस्थानाची कोणी काळजी न घेतल्यामुळें, त्याच्या भिंतींत जागोजाग झाड रुजलीं आहेत, व त्यामुळें भिंती ठिकठिकाणीं फाटल्या आहेत देवाल्याचें शिखर पार जमीनदोस्त झालें आहे नबर ङ छायाचित्रावरून या देवाल्याच्या छतावरील नक्षीची कल्पना होते १ च हें येथील पटवया देवळाच्या सभामडपाचें छायाचित्र होय

निझाम सरकारच्या राज्यात पठण वगैरे ठिकाणीं हेमाडपती देवालयें बरीच असावीत असें दिसतें, परतु तीं मूर्तिभजक मुसलमानाच्या

अमदानींत नष्ट झालीं. नाशिक शहरापासून १८ मैलावर सिन्नर नावाचें गाव आहे, हें पूर्वकालीन यादवाच्या राजधानीचें शहर होतें. त्याचे मूळचें नाव श्रीनगर हें होतें, असें व्रतखडातील राजप्रशस्तीवरून दिसतें. त्याचे काहीं काळानें सिंदिनेर ( श्रीनगर-सिंदिनगर-सिंदिनेर ) असें रूपातर झालें असावें हेमाडपती पद्धतीनें बाधलेलीं बरीच देवळें या ठिकाणीं आहेत त्याचीं नावें. गोंडेश्वर, ऐश्वर्येश्वर, चितळेश्वर, नागेश्वर व विठ्ठलेश्वर पैकी श्रीगोंडेश्वराचें छायाचित्र आमचे मित्र श्री. यशवतराव गुप्ते यानीं कृपा करून आम्हारा दिलें, तें न. ड मध्यें दिले आहे सदरील देवालय पूर्वकालीन यादवराजापैकीं एकानें बाधिलें, असें म्हणतात हें शिवालय असून आतील शिवलिंगापुढें नदी आहे या देवाल्याचे चार कोपन्यात गणेश, नारायण, सूर्य व दुर्गा या देवता आहेत अर्थात् तें शिवपचायतन आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं या देवाल्याचा सभामडप उत्तम नक्षी केलेल्या चार खाबावर उभारला आहे मध्यवर्ति सभामडप वीस फूट उचीचा आहे ह्या देवालयाचा दर्शनी मडप ( भोग-मडप ) फार सुदर असून, त्यामुळें देवाल्यास फार शोभा आली आहे या देवाल्याचें शिखर उत्तरेकडील देवाल्याच्या शिखराहून वेगळ्या धर्तीचें आहे.

ठाणें जिल्ह्यातील कल्याण शहरापासून काहीं अतरावर अबरनाथ नावाचे रेल्वे स्टेशन आहे, तेथें फार प्राचीनकाळीं बाधलेलें एक देवाल्य आहे. त्याची बाधणी जवळ जवळ सिन्नर येथील गोंडेश्वराच्या देवालयासारखीच आहे. हें देऊळ शके ९८२ त बाधलें असावें, असें तेथील शिलालेखावरून दिसतें त्या देवाल्यातील खाबावर व

छतावर सुंदर नक्षी खोदलेली आहे सोरटीसोमनाथाच्या देवाल्याचा घाट अंबरनाथाच्या देवळाच्या घाटासारखाच होता, असें पुराण वस्तुसंशोधकाचें मत आहे शिलाहाराच्या एका शिलालेखात सोमनाथाच्या देवाल्याचा व अंबरनाथाच्या देवाल्याचा उल्लेख एके ठिकाणींच केलेला आहे महमद गझनवीनें इ स १०२४ त सोम नाथाच्या देवाल्याचा विध्वंस केला यावरून सोरटी सोमनाथाचें देवालय फार प्राचीनकाळीं बांधल असावें असें दिसतें दक्षिणेंत चालु क्याचें राज्य फार वर्षे होतें त्याच्या अमदानींत गुजराथेंत व दक्षिणेंत बरीच देवाल्यें बांधलीं गेलीं चालुक्यवंशीय राजानीं जैनधर्मीयाचीं देवळें बांधल्याचा उल्लेख बऱ्याच ठिकाणीं आढळतो, यावरून त्याची पर धर्मसहिष्णुता दिसून येते भरतखंडात बाराव्या शतकात इमारती बांध ण्याच्या ज्या निरनिराळ्या पद्धति प्रचलित होत्या, त्या सर्वांचें सूक्ष्म निरीक्षण केल्यावाचून हेमाडपती पद्धतीची कल्पना नीट रीतीनें ध्यानात येणें शक्य नाहीं तोंपर्यंत ही कल्पना त्यानें नव्यानेंच शोधून काढली, असें विधान सबळ पुराव्याच अभावीं करणें वाजवी होणार नाहीं त्या काळात जैनधर्मीयानीं अबूचे पहाडावर व इतरत्र बरीच जैन मंदिरें बांधण्याचा सपाटा चालविला होता हेमाद्रीनें राजाश्रयाचें जोरावर सनातन हिंदुधर्माच्या संरक्षणार्थ जागोजाग शिवाल्यें बांधिलीं त्याकरिता विशेष पद्धतीनें देवाल्यें बांधण्याची त्यास जरूरी नव्हती मात्र जैन, बुद्ध व हिंदु हे आपापल्या धार्मिकभावनास पोषक अशा तऱ्हेचा, देवाल्यावर खोदावयाच्या मूर्तींत व इतर महत्त्वाच्या बाबतींत फेरफार करीत हिंदूच्या देवळावर पौराणिक कालातील देवताचीं चित्रें कोरलीं जात, तर जैनाच्या देवळावर त्याच्या धर्मास पोषक अशीं त्याच्या सांप्रदायिक

प्लेट क्र.



नारायणपूर येथील हेमाडपंती देवळाच्या सभामंडपाचे दगडी छतावरील नक्षीकामाचा नमुना

ग्रंथांत वर्णन केलेल्या तीर्थंकरांची चित्रें कोरण्यांत येत असत. शिवाय हिंदुदेवालयांची घुमटें प्रायः शिखराच्या आकाराची असून त्यावर गोपुरें काढलेलीं असत. बुद्धधर्मीय लोक डोंगरांतील खडक फोडून त्यांत बुद्धभिक्षूंनां रहाण्यासाठीं विहारें तयार करीत; व त्यांत **बुद्धांच्या** मूर्ति कोरून धर्मप्रचाराचें काम आस्थेनें चालवीत असत. अशा तऱ्हेची विहारस्थानें त्यांनीं एलोरा (देवगिरीनजिक), औरंगाबाद, अंजिठा, नाशिक, जुन्नर, कान्हेरी, ( ठाणें शहरानजीक ) कार्लें वगैरे ठिकाणीं फार प्राचीन काळीं तयार केली. औरंगाबाद, अजिंठा, वेरूळ (एलोरा) वगैरे ठिकाणच्या लेण्यांवरून बौद्धांनीं शिल्पकलेंत व चित्रकलेंत सर्वांच्या पुढें अघाडी मारली होती असें दिसतें. हेमाद्रीनें अमूल्य ग्रंथरचना करून व जागोजाग देवालयें बांधून हिंदु धर्माच्या अभ्युत्थानासाठीं आटोकाट प्रयत्न केले, म्हणून त्याचें नांव भरतखंडांत प्रख्यात झालें; व त्यानें बांधलेल्या देवळाच्या पद्धतीस त्याचें नांव साहजिक पडलें. त्याच्या हयातींत बांधलेल्या इमारतीच्या धर्तीवर ज्या इमारती त्याचे पश्चात् बांधल्या गेल्या त्यांसही 'हेमाडपंती' हें नांव ओघानें प्राप्त झालें.

मेजर गिल् यानें वऱ्हाडप्रांतांत दौरा काढून हेमाडपंती देवळां-विषयीं बरीच माहिती गोळा केली; व ती बंगाल एशियाटिक सोसायटीच्या १८७३ च्या नियतकालिकांत प्रसिद्ध केली. त्यावरून या प्रांतांत हेमाडपंती देवळें बरीच होतीं असें दिसून येतें. जयपूर-कोटली ( बुलढाण्यापासून १४ मैलांवर ), अमदापूर ( बुल-ढाण्यापासून २० मैलांवर ), शिरपूर ( बुलढाण्यापासून ५६ मैलांवर ) मेहेकर ( शिरपूरपासून २० मैलांवर ), लोणार ( मेहेकरपासून १२

मैलावर),धोत्रा( मेहेकरपासून ३० मैलावर) व मातगाव(धोत्र्यापासून २४ मैलावर) या गांवीं हेमाडपनी पद्धतीचीं देवळें अनेक आहेत. ह्या सर्व देवळाचा घाट या भागाचे शेवटीं न.अ यात दाखविलेल्या नकाशातील (ground plan) नमुन्या प्रमाणें आहे सदरील देवालय बांधण्याचे कामीं चुन्याचा बिल्कूल उपयोग केलेला नाहीं. भूमितिशास्त्रास अनुसरून दगडाचे चिरे काटकोन, त्रिकोण, चतुष्कोण आकाराचे बनवून, ते कुशलतेनें एकमेकांत बिनचूक बसविले आहेत. सदरील स्थलापैकीं लोणार येथें हेमाडपती देवालयें बरीच आहेत या देवालयाजवळ खारेपाण्याचा एक मोठा तलाव आहे. त्याबद्दल पुष्कळ दतकथा प्रचलित आहेत गावाबाहेर एक सुदर देवालय आहे त्याजवर कोरलेलीं चित्रें फार वाखाणण्यासारखीं आहेत देवालयावर असलेल्या बीभत्स मूर्ति मूर्तिभंजकानीं नष्ट केल्या असाव्यात असें दिसतें मि. लायल याच्या मतें पुरातनपणा व कारागिरी या बाबतींत लोणार येथील दैत्यसूदनाचें देवालय फार महत्वाचें आहे. ह्या देवळाच्या भोंवतालीं एक पटांगण असून तें सर्व बाजूनीं दगडानीं बांधलें आहे देवळाच्या बाहेरील भागावर देवताचीं असंख्य चित्रें कोरलेलीं दिसतात. मेहेकर येथें बालाजीची मूर्ति आहे तिच्या प्रभावळीवर दशावताराची सुदर चित्रें कोरलेली आहेत ह्या मूर्तीच्या सर्व आंगावर सुदर नक्षी काढलेली आहे. ह्यावरून तत्कालीन कारागिरीचें सौंदर्य सहज लक्षात येते याच ठिकाणीं पैनगंगा नदीच्या काठीं एक इमारत आहे ती लाव दगडी चि यानी बांधलेली असून तिच्यांत चुन्याचा बिलकुल उपयोग केलेला नाहीं. या इमारतीस लावलेले चिरे गणित व भूमितिशास्त्र याच्या अनुरोधानें तयार केलेले दिसतात. हीं

इमारत चालुक्याच्या अमदानींत बाधली गेली असावी, असें मेजर गिल् याचें मत आहे. या धर्तीवर बाधलेल्या इमारती गुजराथेंत कोठें कोठें पहावयास मिळतात. याशिवाय उत्तरवऱ्हाडात, बार्शीटाकळी, पुसद, पातुर, पिंजर आणि पूर्णाकाठ वगैरे ठिकाणीं हेमाडपती पद्धतीच्या इमारती बऱ्याच आढळतात.

वऱ्हाडात जैनधर्मी देवळेंही बरीच आहेत. त्यापैकीं सातपुड्यातील मुक्तागिरी येथील धबधब्याजवळचीं देवळें व शिरपूर येथील प्रसिद्ध जैनमदीर हीं स्थानें कारागिरीच्या दृष्टीनें महत्त्वाचीं आहेत एलिचपूर येथें ११ व्या शतकात राज्य करणाऱ्या ईल नामक जैन राजानें बरीच देवळें बाधलीं असावी असें पुराणवस्तुसशोधकाचें म्हणणें आहे.

दृढप्रहरापासून सोळावा पुरुष जो पाचवा भिल्लम त्यानें चौथ्या सोमेश्वर चालुक्याचें राज्य शके ११११ च्या सुमारास बुडवून देवगिरी येथें आपलें राज्य स्थापिलें. देवगिरीचे यादवराजे सनातन-धर्मी असल्यामुळें त्यानीं विष्णु व शकर याचीं देवळें जागोजाग बाधिलीं. **सिंघणदेवानें** आपल्या कारकीर्दीत (शके ११३२ ते ११६०) सातारा जिल्ह्यातील खटाव तालुक्यातील मायणी गावीं दोन नद्याच्या सगमावर, संगमेश्वर नावाचें महादेवाचें देऊळ बाधिलें. याशिवाय शिखरशिंगणापुरचें देवालय, भूषणगडचा किल्ला वगैरे त्यानेंच बाधिले. सिंघणदेवाचे पदरीं **खोलेश्वर** या नावाचा मोठा पराक्रमी ब्राह्मण सेनापती होता. त्यानें खानदेशातील शेंदुरणी गावीं खोलेश्वर नावाचें महादेवाचें देऊळ बाधिलें. शके ११४४ त जैत्रपाळानें **वहाळ** येथें महादेवाचें देऊळ बाधिलें याखेरीज खानदेश जिल्ह्यात यादवकालीन विष्णूच्या अनेक

मूर्ति सापडतात. शेंदुरणीचें त्रिविक्रमाचें मंदिर व त्यांतील मूर्ति, एरंडोलची केशवरावाची मूर्ति, शिंदखेडें तालुक्यांतील देवाचें-निरखण, यादवकालीन शहादें तालुक्यांतील मडाणें, वाघर्णी व पारोळें वगैरे गांवांतील देवालयांमध्यें असलेल्या विष्णूच्यामूर्ति आज विद्यमान आहेत, व आणखीही मधूनमधून जमिनींत सापडतात. पांचव्या भिल्लमापासून शेवटच्या रामदेवराव जाधवापर्यंत(म्हणजे शके ११०० पासून १२३० पर्यंतच्या कालांत ) देवळें, किल्ले, पायविहीरी वगैरे असंख्य इमारती निव्वळ राजाश्रयानें बांधल्या गेल्या. यांखेरीज हेमाडपंती देवालयाचा आणखी असा विशेष आहे कीं त्यांवर मूर्ती कोरलेल्या असतात त्यावरून तत्कालीन लोक कोणत्या तऱ्हेचे पोषाख वापरीत व स्त्रिया कोणते दागिणे आंगावर घालीत वगैरे सामाजिक स्थितिदर्शक गोष्टींवर चांगला प्रकाश पडतो. हेमाडपंती देवळांत प्राचीन काळचे बरेच लेख दृष्टोत्पत्तीस पडतात ते लेख सुस्थितींत असून त्यांची वेळींच जोपासना न केल्यास ते नष्ट होण्याचा संभव आहे

आमचे मित्र व सुप्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधक श्रीयुत यशवंतराव गुप्ते यांनीं प्राचीन काळच्या इमारतींचें संरक्षण व संशोधन या विषयावर कळकळीचे लेख लिहिलेले आहेत त्यांनीं नाशिक जिल्ह्यांतील देवळें व त्यांतील लेख यांची यादी करण्याचें काम सुरू केलें आहे

शालिवाहनाचे दहावे शतकांत, माळव्यांतील परमार कुळांतील प्रसिद्ध भोजराजानें, सौराष्ट्र, महाराष्ट्र, कर्नाटक वगैरे प्रांतांत अनेक देवालयें बांधल्याचा उल्लेख आढळतो. उत्तरेस हिमालयांत केदारेश्वर, दक्षिणेस हिंदुस्थानच्या टोंकास रामेश्वर, पश्चिम किनाऱ्यावर



नारायणपूर येथील पडक्या हेमाडपंती देवालयाचें छायाचित्र.

सोमनाथ, पूर्व किनाऱ्यावर सुंडीर, अशी देवालयें बांधून शिवाय आपल्या मुख्य राजधानींत म्हणजे महाताल येथें त्यानें बरीच मंदिरें बांधिलीं. धारानगरींतील धारेश्वराचें देऊळही त्यानेंच बांधिलें. सम्राट अशोकानें ज्याप्रमाणें आपणांस प्रिय असलेल्या बौद्धधर्माच्या आज्ञा धर्मप्रसारार्थ स्तंभावर कोरून ते स्तंभ आपल्या साम्राज्यांत जागोजाग रोवले, व आपलें नांव अजरामर केलें; त्याप्रमाणेंच हेमाद्रीनें हिंदुधर्मप्रसारार्थ भरतखंडांत ठिकठिकाणीं विशिष्ट पद्धतीनें देवळें बांधून आपलें नांव चिरस्मरणीय करून ठेविलें आहे. हेमाद्रीच्या वेळीं भरतखंडांत शिल्पकला व चित्रकला श्रेष्ठ दर्जास पोहोंचल्या होत्या, ही गोष्ट अबूच्या पहाडावरील जैनमंदिरें, हलेबिड ( म्हैसूर ) येथील यादव-कालीन हिंदु देवालयें, ओरिसाप्रांतांतील भुवनेश्वराचें मंदिर, एल्लोरा (देवगिरीनजीकचें ) येथील हिंदु लेणी, अजंटा, व औरंगाबाद येथील बौद्धांचीं लेणीं इ. इ. यावरून सिद्ध होते.

देवगिरी नजीक एल्लोरा ( Ellora एलापूर ) येथें बौद्धांची व सनातनी हिंदुधर्मीयांची लेणीं जवळ जवळ आहेत. हिंदूंची लेणीं 'कैलास' या नांवानें सुप्रसिद्ध आहेत. बौद्धाप्रमाणेंच, राष्ट्रकूट वंशीय राजानीं देवगिरीनजिक (एलापूर) येथें खडक फोडून हिंदु-पद्धतीचें कैलास या नांवाचें लेणें तयार केलें; व त्यांत पौराणिक कालांतील हिंदु देवतांचे व त्यांतील निरनिराळ्या धार्मिक प्रसंगाचे देखावे दाखविले आहेत. शिल्पशास्त्राच्या दृष्टीनें सदरील लेण्यांतील काम अत्यंत सुंदर असल्यावद्दल युरोपियन व एतद्देशीय तज्ञाचें मत आहे. दक्षिणेंत राष्ट्रकूटांचें राज्य इ. स. ६०० पासून इ. स. ७५५ पर्यंत होतें. या लेण्यांत राष्ट्रकूटांचे वेळचा एक

शिलालेख सुमारें २९ ओळींचा आहे. त्याचें पडित भगवानलाल इन्द्रजित यानीं सशोधन केलें आहे. या शिलालेखात पहिल्या दन्तिवर्म्या ( इ स ६०० ते ६३० ) पासून तों दन्तिदुर्ग ऊर्फ दुसरा दन्तिवर्मा (इ. स ७०० ते ७५५) याचे पर्यंत, राष्ट्रकूटवशीय ६ राजाची वशावळ दिली आहे. यापैकीं कृष्णराज हा एलापूर ( एलोरा ) येथील डोंगरी किल्ल्यात राहत होता असा उल्लेख या शिलालेखात आहे. यावरून देवगिरीच्या आजुबाजूचा प्रदेश, चालुक्य व राष्ट्रकूट याच्या दरम्यानच्या लढायांचें, एकेकाळीं रणक्षेत्र होऊन राहिला होता असें दिसते हीं हिंदुलेणीं राष्ट्रकूटाचे अमदानींत निर्माण झाली असें यावरून दिसतें

एलापूर अथवा एलोरा येथील लेण्याचे सविस्तर वर्णन या पुस्तकात देणें शक्य नाहीं परतु या लेण्याचे प्रामुख्यानें ६ भाग करता येतील ते येणें प्रमाणें, (१) रावणाचा खे, (२) दशावतार गुहा, (३) कैलास अथवा रगमहाल, (४)लकेश्वर,(५) रामेश्वर आणि (६) दुमार लेणें, त्यातील पुढें दिलेले देखावे, शिल्पशास्त्राच्या दृष्टीनें अत्युत्कृष्ट आहेत असें तज्ञाचें मत आहे –(१) चतुर्भुज शिव व पार्वती खेळत आहेत अशावेळीं रावण आपल्या मस्तकावर कैलास घेत आहे, (२) सहा हाताचा कृष्ण गोवर्धनपर्वत उचलित आहे त्यावेळचा देखावा, (३) चार हत्ती आपल्या सोंडेतून लक्ष्मीवर पाणी टाकीत आहेत (४) विष्णूच्या हातात कमळ व त्रिशूळ असून त्याच्या उजव्या हातातील पदार्थ एक मोठा पक्षी खात आहे या लेण्यात बऱ्याच खिडक्या असून एक भाग दुसऱ्या भागास जोडण्या साठीं पूल केले आहेत शिवाय यात अनेक सुदर सभामडप दाखविले आहेत पैकीं लकेश्वरातील सभामडप ३१ फूट लाब, २६ फूट रुंद, व १०॥ फूट उच आहे हा सभामडप चार खाबावर उभारलेला

आहे व त्यांचे कोपऱ्यांत चार ब्रॅकेटस् (घोडे) दिलेले आहेत. हेमाडपंती देवाळांतील सभामंडप या धर्तीवर बांधलेले आहेत, असें दिसतें.

हेमाद्रीच्या नजरे समोर हिंदु कारागीरीचा उत्तम नमुना असतांना त्यास नवे शोध लावण्याची गरज नव्हती. तत्कालीन कारागिरानीं त्यावेळीं प्रचलित असलेल्या शिल्पकलेच्या निरनिराळ्या पद्धति आपले नजरे समोर ठेवून हेमाद्रीच्या इच्छेप्रमाणें थोडयाबहुत फेरफारानें देवालयें बांधिली असावीत. असें दिसतें. भारतीय प्राचीन शिल्पकलेचें सांगोपांग अध्ययन केल्यावांचून, यादवांचे राजवटींत हेमाद्रीनें पूर्वी कधीही अस्तित्वांत नसलेली अशी नवी पद्धति शोधून काढली असें विधान करणें इतिहासाच्या दृष्टीनें वाजवी होणार नाहीं. हेमाडपंती पद्धतीप्रमाणें, दगडाचे चिरे एकमेकांत कुशलतेनें बसविल्यानें बांधकामांत चुना अगर इतर मसाला वापरण्याचें कारण राहिलें नव्हतें; व इमारती थोडया खर्चात मजबूत व टिकाउ अशा तयार होऊं लागल्या यांत शंका नाहीं. ही योजना हेमाद्रीनें नव्यानें अंमलांत आणली अशी परंपरागत समजूत आहे. हेमाद्रीच्या काळांत इमारती बांधण्याच्या द्राविडी, चालुक्य, जैन, वगैरे ज्या पद्धति प्रचारांत होत्या, त्यांच्या अंतरबाह्य रचनेंत त्यानें कोणतें फेरफार केलें याचा शास्त्रीय रीत्या निर्णय करणें ही गोष्ट शिल्पशास्त्रज्ञांच्या कार्यक्षेत्रांतील होय.

जैनधर्मीयांनीं आपल्या धर्माच्या प्रसारार्थ जागोजाग देवळें बांधिली व त्याचा प्रतिकार करण्यासाठीं हेमाद्रीनें राजाश्रयाच्या जोरावर हजारों हिंदु देवालयें बांधून स्वधर्माचें रक्षण केलें. या त्याच्या सत्कृत्यामुळें प्राचीन शिल्पकलेंतील सूक्ष्म भेदांकडे लक्ष न देतां सर्वसाधारण लोक एकंदर हिंदु देवालयानां हेमाडपंती या ढोपण नांवानें संबोधू लागले असें दिसतें.

---

## भाग ९ वा.

### उपसंहार



हेमाद्रिसंबधानें जितकी माहिती उपलब्ध झाली, तितकी मागील आठ भागात देण्याचा आम्ही प्रयत्न केला आहे देवगिरीचे यादवाच्या राज्यात लागोपाठ तीन राजाच्या कारकीर्दीत त्यानें करणाधिपाचें काम केलें यावरुन तो मोठा राजकार्यपटु होता, ही गोष्ट निर्विवाद होय त्याचा चतुर्वर्गचिंतामणि हा ग्रथ, हिंदुधर्मविषयक वाजतींतील Encyclopaedia म्हणजे एक प्रचड ज्ञानकोशच होय श्रुति, स्मृति, इतिहास, पुराणें, धर्मशास्त्र, मिमासा व न्याय ह्या विषयावरील ग्रथाचा त्यानें चागला अभ्यासकेला होता, ही गोष्ट त्याच्या सदरील ग्रथावरुन निदर्शनास येते आमचे व्यवसायबधु व सन्माननीय मित्र श्रीयुत काणे ॲडव्होकेट यानीं 'हिंदुधर्मशास्त्राचा इतिहास' या नावाचा पूर्ण माहितीनें भरलेला व विद्वत्ताप्रचुर ग्रथ लिहिला असून त्यात हिंदुधर्मशास्त्रावरील ग्रथाचें सागोपाग विवेचन केलें आहे सदरील ग्रथात त्यानीं हेमाद्रि व माधवाचार्य याची तुलना अनुक्रमें कॅस्टॅार (Castor) व पोलक्स (Pollux) यानबरोबर केली आहे शिवाय हेमाद्रीचा,पूर्वमीमासाशास्त्रावरील ग्रथाविषयींचा व्यासग दाडगा होता, असें त्यानीं म्हटलें आहे मीमासाशास्त्रातील विविध न्यायाचा सागोपाग अभ्यास केल्याजून हेमाद्रीनें, श्राद्ध व कालनिर्णय या विषयातील वादग्रस्त मुद्यासबधीं केलेलें विवेचन नीट समजणें शक्य नाहीं, असें श्रीयुत काणे याचें मत आहे हेमाद्रीनें आपल्या ग्रथात उल्लेखिलेल्या धर्मशास्त्रकाराचा व त्याच्या ग्रथाचा



सिन्नर ( नाशिक जिल्हा ) येथील गोंडेश्वराचें देवालय

निर्देश या पुस्तकात (पृ ३७ ३८) पूर्वी केलेला आहे हेमाद्रीच्या मतें, कोणत्याहि शाखेच्या ब्राह्मणास, इतर शाखा, कल्प, गृह्यसूत्रें, स्मृति व पुराणें यात सांगितलेल्या श्राद्धविषयक नियमाप्रमाणें श्राद्ध करण्यास हरकत नाहीं एका वेदाच्या शाखेंतील इसमास, दुसऱ्या वेदाच्या शाखेंतील इसमाबरोबर (जर ते भरतखंडातील एकाच देशांतील रहिवाशी असतील तर, ) बेटीव्यवहार करण्यास हरकत नाहीं, असें हेमाद्रीनें आपलें मत दिलें आहे ( आर्यावर्तेषु च समान देशवासिना नानाशाखाध्यायिनामभ्युपलभ्यन्त एव परस्परमनवर्गी यमाना सर्वतो विवाहसम्बन्धा । अतो न कन्यादाने नापि हविर्दाने स्वशाखीयद्विजनियम इति सिद्धम्। परिशेष खंड ३ १ पा २८१ ) यावरून वैवाहिकसंबंधाचे बाबतींत त्याची दृष्टि बरीच व्यापक होती, असें दिसून येतें हिंदुधर्मशास्त्राचे बाबतींत **हेमाद्रीचा व्रतखंड** प्रमाणभूत ग्रंथ आहे असें **माधवाचार्यानें** आपल्या कालनिर्णयग्रंथात म्हटलें आहे पहिला **बुक्कराय** याचा मुलगा भास्कर ऊर्फ भवदुर यानें शके १२९१ (इ स १३६९) च्या शिलालेखात असें म्हटलें आहे की, हेमाद्रीच्या दानखंडाच्या अनुरोधानें राजा दानकृत्यें करीत आहे (हेमाद्रिस्मृतिमार्गेण कुर्वन्दानान्यनेकश ।) यावरून **तेलंगणातही** हेमाद्रीचा ग्रंथ धर्मविषयक बाबतींत आधारभूत मानला जात असे, असें दिसतें **अन्नवेमच्या** शके १३०० च्या **वनपाली** ताम्रपटात असें म्हटलें आहे कीं, हेमाद्रीच्या ग्रथान्वयें जो व्रतेंकृत्यें नियमानें पाळीत असे, त्यासच अन्नवेमराजा दानधर्म करी शके १३४४ च्या सनदेप्रमाणें पेद्द कोमटी वेम हा हेमाद्रीनें आखून दिलेल्या मार्गाप्रमाणें दानधर्म करण्याचे कामीं नेहमीं दक्ष असे (हेमाद्रिकल्पोदितदानदक्ष ।)

शके ११९४ च्या ओनळें येथील ताम्रपटांत (पृ. १४२), हेमाद्रि हा देवगिरीच्या यादवाच्या राजदरींत हस्तिपकाध्यक्षाच्या

**हेमाद्रि हस्तिपकाध्यक्ष**

हुद्यावर होता असें म्हटलें आहे. हस्तिपक म्हणजे महात. त्याच्यावरील मुख्य अधिकाऱ्यास हस्तिपकाध्यक्ष असें म्हणत. यावरून हस्तिदलाच्या सेनाधिपतीचें काम हेमाद्रीकडे होतें असें दिसतें. भरतखंडांत युद्धाचे कामीं हत्तींचा उपयोग प्रामुख्यानें केला जात असे, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. आपल्या राज्याच्या बळकटीकरितां हत्ती बाळगणें हा प्रत्येक राजाचा धर्म आहे, असें प्राचीन ग्रंथांत म्हटलें आहे. **पालकाप्य** नांवाच्या ऋषीनें **'हस्त्यायुर्वेद'** नांवाचा एक विस्तृत ग्रंथ लिहिला आहे, त्यांत हत्तींची लक्षणें, त्यांचा युद्धाचे कामीं होणारा उपयोग, त्यांचे रोग व त्यांची चिकित्सा, व त्यावर उपाय वगैरे विविधविषयांचें विवेचन केलें आहे. **पालकाप्य** ऋषीनें, **चंपा** नगरीचा राजा **अंग** यास, हत्तींची जोपासना करणें हा एक राजधर्म आहे, असा सदरील ग्रंथांत उपदेश केला आहे. त्यांतील आशय येणें प्रमाणें.–

ज्या राजाच्या पदरीं हत्ती असतात, त्याच्या राज्यास चांगली शोभा येते प्रत्येक राजानें आपल्या पदरीं हत्ती बाळगून त्यांची जोपासना केली पाहिजे माणसाळलेला हत्ती ऋषीप्रमाणें शांत असतो, पण जर का तो एकदा पिसाळला तर तो राक्षसाप्रमाणें भयंकर भासतो. कितीहि विपन्न स्थिति प्राप्त झाली तरी पाळलेला हत्ती आपल्या पालकास दगा देत नाहीं पदार्थ कितीहि कठीण असला, तरी तो सहज लीलेनें फोडतो, म्हणून त्यास वज्राची उपमा दिली आहे हत्ती हे आपल्या राजाच्या सैन्याचें रक्षण करून, शत्रूच्या सैन्याचें निर्दालन करतात

(१) गजस्थ शोभते नृप (२) भंजने मर्दने चैव नागा वज्रोपमा

युद्धशास्त्रानुरोधानें हत्ती एका रांगेनें उभे केल्यास ते किल्ल्याच्या तटांचें कार्य करतात. ज्याप्रमाणें पाण्याच्या कितीही जोराच्या प्रवाहास पूल हटवितो, त्याप्रमाणें हत्ती हे शत्रूच्या सैन्याची पिछेहाट करतात. एका हत्तीची शक्ती सहा हजार घोड्यांच्या शक्तीबरोबर आहे. अर्थात् हत्ती नजीक येताच घोडे निरुत्साह होऊन परत फिरतात. लढाईंत हत्ती शस्त्रास्त्रांचे आघात सहन करतात. दरेक मनुष्यास मरणोत्तर ज्या गती प्राप्त होतात, त्यात ज्याप्रमाणें मोक्ष श्रेष्ठ आहे, सर्व वेदात ज्याप्रमाणें श्रुति श्रेष्ठ आहे, सर्व भूतमात्रात ज्याप्रमाणें कृष्ण श्रेष्ठ आहे, त्याप्रमाणें हत्ती हा सर्व वाहनात श्रेष्ठ आहे. ज्याप्रमाणें मेरुपर्वतानें पृथ्वीला, चंद्रामुळे रात्रीला, विद्येमुळें नराला शोभा येते त्याप्रमाणें हत्तीमुळें सैन्याला शोभा येते.

याप्रमाणें हत्तींची प्रशंसा केल्यावर गजसेनेवर जे अधिकारी नेमावयाचे त्यांची लक्षणें दिलीं आहेत. त्यानंतर गजाध्यक्षाचीं लक्षणें सांगितलीं आहेत. त्यांतील कांहीं लक्षणें येणेंप्रमाणें:—

"गजायुर्वेदांत प्रत्येक गजाध्यक्ष प्रवीण असून शिवाय तो व्युत्पन्न असला पाहिजे. तो धार्मिक वृत्तीचा असून मितभाषणी असला पाहिजे. तो गणितज्ञ असून यत्नकर्मांत निष्णात ब्राह्मण असला पाहिजे." (भिषिग्विनीतो मेधावी ग्रन्थार्थप्रतिपत्तिमान्) सत्तावाचून सौख्याची किंमत नाही, राजावाचून राष्ट्राची किंमत नाहीं, विश्वासाच्या अभावी मित्राची किंमत नाहीं त्याप्रमाणच हत्तीवाचून सैन्याची किंमत नाहीं. ज्याप्रमाणें उत्तम शिलगुणें (स्त्रीच्या) रूपाला शोभा येते, पवित्र आचरणानें कुळाला शोभा येते, पुत्रामुळें अरण्याला शोभा येते, त्याप्रमाणे हत्तीमुळें सैन्याला शोभा येते. हत्तीसारखा मित्र नाहीं, हत्तीसारखा बंधु नाहीं, हत्तीसारखा योद्धा नाही.

---

स्मृता (३) घटाभिरचिता नागाः प्राकारा इव दुर्जयाः (४) दर्पिताः प्रतिबध्नंति सेतुबन्ध इवार्णवे (५) मोक्षात्परा गतिर्नास्ति नास्ति वेदात्परं श्रुतिः ॥ नास्ति कृष्णात्परं भूतं नास्ति यानं गजात्परम् । गजाध्यक्षेण ॥

हेमाद्रिने आगीं वर नमूद केलेले सर्व गुण वास करीत असल्यामुळें हस्तिपकाध्यक्षाचे जागीं त्याची नेमणूक करण्यात आली असावी असें दिसतें !

हेमाद्रीच्या काळीं पुढील नाणीं चालू होतीं, असें यादवकालीन शिलालेख व ताम्रपट यावरून दिसून येतें. शके ११९५ च्या पढरपूरच्या यादवकालीन शिलालेखात ज्या नाण्याचा उल्लेख केलेला आढ नाणी ळतो, तीं येणें प्रमाणें — **गद्यान** हें नाणं गुन गयत गप्यान अथवा गधिया या नावानें प्रसिद्ध आहे हें नाणें सोन्याचें असून त्याचें वजन एक तोळा असे त्याची किंमत पधरा किंवा साडे पधरा रुपये असावी, असें दिसतें गद्यानापेक्षा कमी किंमतीच्या नाण्यास **कशुगि**, **धष्ट**, **महाजनि** वगैरे नावें असून त्याचा उल्लेख सदरील शिलालेखात केलेला आहे (परिशिष्ट न ९) याशिवाय द्राम द्रम्य दाम हे नाणेंहि प्रचारात होतें

पाटणच्या शिलालेखात आसुनामक एका नाण्याचा उल्लेख केलेला आहे हें नाणें सोन्याच असाव, असें दिसतें या व्यतिरिक्त, चामी म्हणजे चामड्यावर राजचिन्हे कोरलेली करन्सीची [ Currenc) ] पद्धति हेमाद्रीचे वेळीं प्रचलित होती, असें ज्ञानेश्वरीवरून दिसतें शके १३३६ च्या महजरात पिंछोडीच्या हक्काचा जो तपशील दिला आहे, पृ २४३-२४४ त्यात पचा (किंमत ४ पै), टका [किंमत २ पक्के], रुपया, होन [ एक सोन्याचें नाणें ] याचा उल्लेख आहे ह्याच मह जरात पायली [ धान्य मोजण्याचें माप ] व बिघा [ जमिनीचें क्षेत्र-मापन करण्याच प्रमाण ] याचाहि उल्लेख केलेला आहे

आमचे मित्र कै चांदोरकर वकील यानीं भा इ स मंड ळाच्या सातव्या वर्षाच्या त्रैमासिकात देवगिरीचे यादव हे गोष्ठी

उर्फ अमीर होते, असे सिद्ध करण्याचा प्रयत्न एका विस्तृत लेखात केला आहे, व आपल्या मताच्या पुष्टयर्थ महाभारत व पुराणें यातील बरेच उतारे त्यानी दिले आहेत शिवाय, पूर्वकालीन यादवापैकीं सेऊणचद्रानें आपल्या राज्याचा विस्तार खानदेशात वाढविला यामुळें आपल्या मतास बळकटी येते, असें त्यानी म्हटलें आहे खानदेशात अभिराणी उर्फ अहिराणी भाषा शके २०० च्या सुमारास म्हणजे मराठीच्याहि पूर्वी खानदेशात निर्माण झाली, अशाबद्दल त्यानी विस्तृत विवेचन केले आहे परतु खुद्द **भागवत** पुराणात अभीर ही एक विशिष्ट जाति असल्याबद्दलचा उल्लेख केलेला आढ ळतो सिंघणाच्या वेळच्या **आंबे** येथील शिलालेखात **अभीर** राजा **लक्ष्मीदेव** याचें कुळ सिंघणदेवाचा ब्राह्मण सेनापती **खोलेश्वर** यानें समूळ नष्ट केलें, असें म्हटले आहे यावरून देवगिरीचे यादवाचा व अभीराचा परस्पर काहीहि सबध नव्हता, असें दिसतें वरील लेख फार मननीय आहे, व त्यातील विधानें खोडून टाकण्यास यापेक्षा सबळ पुरावा पाहिजे या गोष्टीची आम्हास जाणीव आहे चांदोरकरानी खानदेशातील आभिराणी उर्फ अहिराणी भाषेचें या लेखात व्याकरण व व्युत्पत्तिदृष्ट्या सागोपाग विवेचन केले आहे त्यावरून हेमाद्रीचे वेळीं वऱ्हाडात व खानदेशात प्रचलित असलेल्या मराठी भाषेवर चागला प्रकाश पडतो

देवगिरीचे राजे अमीर होते काय?

ज्ञानेश्वरीत, खानदेशी ऊर्फ अहिराणी भाषतील शब्दाचा बराच भरणा असावा असें या विवेचनावरून दिसून येतें तसेच, तिच्यात कोंकणी, भाषेचीही छटा मधूनमधून दिसते खुद्द

यादवाची मूळ भाषा संस्कृत होती. ती उत्तरोत्तर अनेक भाषात मिश्रित झाली. अपभ्रष्ट भाषा, महाराष्ट्री, शौरसेनी व मागधी या तीन भाषांचें मिश्रण म्हणजेच अभिराणी भाषा होय. पाटण (खानदेश) येथील शके ११२८ च्या शिलालेखाच्या अखेरच्या भागातील कांहीं मजकूर तत्कालीन खानदेशी भाषेंत आहे. त्यातील शब्दावरून खानदेशी भाषेचें स्वरूप थोडेंबहुत लक्षात येतें.श्रीज्ञानेश्वर महाराजाच्या वेळेच्या महानुभावपंथीय ग्रंथातील भाषा शिष्ट उर्फ नागरी दिसते; यावरून तिच्यात वैदर्भी उर्फ अवतिजा भाषेंतील शब्दाचा बराच भरणा दिसून येतो. बालरामायणात विदर्भदेशाचें वर्णन करताना रामानें ह्या देशास विद्येचें माहेरघरच म्हटलें आहे. व भासह ह्या काश्मिरी अलंकारिकानें वैदर्भकाव्य श्रेष्ठ दर्जाचें असल्याबद्दल अप्रत्यक्ष रीतीनें कबुली दिली आहे. दंडी, बाण वगैरे प्रसिद्ध संस्कृत ग्रंथकारांनीं वैदर्भी रीतीची फार स्तुति केली आहे. श्लेष, प्रसाद, माधुर्य, ओज, अर्थव्यक्ति वगैरे गुण वैदर्भरीतीचे प्राण आहेत असें सदरील ग्रंथकारानी म्हटलें आहे. खानदेशाच्या पश्चिम भागाचें प्राचीन नांव अश्मक हें होतें. तेथील काव्य वैदर्भकाव्यापेक्षा कमी दर्जाचें होतें, असेंहि त्यानें एके ठिकाणीं म्हटलें आहे. यावरून महानुभावीय ग्रंथातील भाषा व ज्ञानेश्वरींची भाषा याच्यात फरक का दिसतो, ह्याचा खुलासा होतो.

हेमाद्रीचे वेळी देवगिरी हें शहर सर्व विद्वत्तेचें केंद्र बनलें होतें.

**देवगिरी-विद्येचें केंद्र**

प्रसिद्ध ज्योतिषी व गणिती भास्कराचार्य ह्याचा मुलगा लक्ष्मीधर हा जैत्रपालाचा आश्रित होता. व त्याचा पुत्र चांगदेव यासहि यादवाच्या राज्यांतील गाव इनाम असून त्यानें खानदेशातील एक मोठी पाठशाळा चालविली

होती (पाटणचा शिलालेख पहा) कृष्णदेवाच्या पदरीं **अमलानंद** या नावाचा पंडित होता त्यानें आचार्यांच्या वेदान्तसूत्रावर वेदान्त-कल्पतरु नावाचा ग्रंथ लिहिला

वैदर्भीय पंडित बोपदेव हा त्याचा उजवा हात होता मुक्ताफलग्रंथात हेमाद्रीचें वर्णन करिताना बोपदेवानें त्यास सारथि असें श्लिष्ट विशेषण लाविलें आहे वर्धेच्या काठीं **सार्थ** अथवा **सार्ध** या नावाचें गाव आहे हें ठिकाण बोपदेवाचें जन्मस्थान होय तेथें तो शके ११८२ त जन्मला त्यावरून हेमाद्रीचें मूलस्थान तेंच असावें असा कित्येकाचा तर्क आहे परंतु पंढरपूरच्या शिला-लेखात हेमाद्रीला 'सोडवीकार' असें म्हटलें आहे, त्याची वाट काय ? यादवराज्यात ज्योतिषशास्त्राच्या अध्ययनास चांगला राजाश्रय मिळत असे **पाटण** येथील शिलालेखात प्रसिद्ध ज्योतिषी भास्करा-चार्य ह्यांची संपूर्ण वंशावळ दिली आहे त्याचा मुलगा लक्ष्मीधर ह्यास पहिला जैतुगी ऊर्फ जैत्रपाळ यानें मोठ्या सन्मानानें बोलावून आपले राजदरबारात सभापंडित म्हणून ठेविलें होतें त्याचा पुत्र चंगदेव हा सिंघणाच्या पदरीं ज्योतिषी होता चंगदेवानें ज्योतिष शास्त्रावरील ग्रंथांचें अध्ययनाकरिता एक मठ बांधला होता सिंघणाचा मांडलिक निकुंभ वंशातील **सोईदेव** व त्याचा भाऊ **हेमाडीदेव** यांनीं सदरील मठास नेमणूक करून दिली होती सांप्रत तो मठ अस्तित्वात नाहीं,पण त्याच्या गतवैभवाच्या खाणाखुणा शिल्लक आहेत शके ११४४ च्या बहाळ येथील शिलालेखात (पृष्ट ९६) **अनंतदेव** याची वंशावळी दिली आहे पाटणच्या शिलालेखातील २२ व्या श्लोकात **भास्कराचार्यांचा** पुत्र **लक्ष्मीधर** यास जैत्रपालानें

पाटणहून बोलावून नेलें असें म्हटलें आहे हें शहर देवगिरीपासून जवळच आहे, व तें सह्याद्रीचे फाटे जे चांदवडचे डोंगर याना लागतच आहे, शिवाय अनंतदेवानें ज्या गावीं देवालय बांधिलें, तें बहाळगाव, पाटणपासून वीस मैलावर आहे अनंतदेवानें ब्रह्मगुप्ताच्या सिद्धांतासि ग्रंथाच्या विसाव्या अध्यायावर आणि बृहज्जातकावर टीका लिहिल्या, असें ११४४ च्या शिलालेखात म्हटलें आहे हेमाद्रीचा आश्रित वोपदेव याच्या ग्रंथाची माहिती या पुस्तकातील पृष्ठ ४३ वर दिली आहे

देवगिरीच्या यादवाच्या अमदानींत ज्योतिष, धर्मशास्त्र, व व्याकरण या शास्त्रावर अनेक ग्रंथ निर्माण झाले भास्कराचार्य यानें सिद्धांतशिरोमणी, करणकुतूहल व लीलावती वगैरे सर्वमान्य ग्रंथ रचिले त्यानें आपला सर्व जन्म ज्योतिषशास्त्राचे अध्ययनांत घालविला आर्यभट्ट व वराहमिहिर याच्याप्रमाणें त्यानें ज्योतिषशास्त्रात नैपुण्य मिळवून आपलें नाव अजरामर केलें आहे भास्कराचार्यांच्या घराण्या शिवाय ज्योतिषशास्त्रात वाखाणलेलें असें आणखी एक सुप्रसिद्ध घराणें वऱ्हाडात होत रामदेवराव याचे दरबारात राम या नावाचा भारद्वाज गोत्री विद्वान ज्योतिषी होता तो पैठणच्या पूर्वेस ७० मैलावर गोदेच्या उत्तर तीरावर पाथरी नावाच्या गावीं रहाणारा होता या राम ज्योतिषाचे घराण्यात ज्ञानराज, सूर्यराज, व धुंडिराज वगैरे ज्योतिषी झाले व त्यानीं ज्योतिषशास्त्रावर अनेक सर्वमान्य ग्रंथ लिहिले भास्कराचार्यांच्या 'लीलावती'वर सूर्य पंडिताची अमृत कूपिका नावाची टीका उपलब्ध आहे सदरील घराण्यातील अखेरचा पुरुष विज्ञानेश्वर नावाचा

होता तो दुसऱ्या बाजीराव पेशव्याच्या दरबारात ज्योतिषी म्हणून होता सिंघणाचा करणाधिप सोढल नावाचा एक काश्मिरी ब्राह्मण होता त्याचा पुत्र **शार्ङधर** यानें 'संगीतरत्नाकर' नामक एक सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिला कृष्णदेवाच्या हस्तिदलाचा सेनापति शूर असून विद्वान होता त्यानें सुभाषितावर **सूक्तिमुक्तावली** नावाचा ग्रंथ रचिला असून तो उपलब्धही आहे कृष्णदेवाच्या दरबारात **अमलाग** या नावाचा पंडित होता त्यानें आचार्यांच्या वेदांतसूत्रभाष्यावर 'वेदांतकल्पतरू' नामक ग्रंथ लिहिला आहे हा हेमाद्रीचा समकालीन होता वोपदेवानें आपला आजा महादेव यास 'महादेवो **वेदपदा**भिधानमहाराष्ट्रनिवासी विप्र असें म्हटलें आहे वोपदेवाचा बाप केशव व आजा महादेव हे दोघे वैद्य होते केशवानें 'सिद्धमंत्र' नावाचा ग्रंथ लिहिला असून त्यावर वोपदेवानें 'सिद्धप्रकाशनामक' टीका लिहिली आहे वोपदेवानें आपल्या शत श्लोकी ग्रंथात वर्धा नदीच्या काठीं **वेदपद** नावाचे गावीं आपला जन्म झाला असें म्हटलें आहे वोपदेवानें व्याकरणावर १० ग्रंथ, ज्योतिषशास्त्रावर १ साहित्यावर ३ वैद्यकावर ९ व भागवतपुराणावर ३, असे एकंदर सव्वीस ग्रंथ लिहिले असें हेमाद्रीनें व्रतखंडात म्हटलें आहे हेमाद्रीच्या प्रेरणेनें व आश्रयानें आपण वर निर्दिष्ट केलेले सर्व ग्रंथ रचिले असें वोपदेवानें मुक्ताफल ग्रंथात कबूल केलें आहे

यादवांचे अमदानीत देवाल्याचे पूजेअर्चेकरिता एखादा गाव दान देतेवेळीं, दानपत्रात एक महत्वाची शर्त घालण्यात येत असे, ती सामाजिक दृष्ट्या फार महत्वाची होती दान दिलेल्या गावात

जुगार खेळण्यास व विश्रयोपितास वर्त्ती करण्यास मनाई असे. यामुळें निदान देवालयाच्या नर्त्तकन्या प्रदेशात अनीतिवर्धक गोष्टीस आळा घालण्याकडे यादवराजाचे लक्ष होतें असें दिसून येतें.

स्त्रिया, मुलें व शरणागत याजवर शस्त्र धरणें ही गोष्ट राजधर्माविरुद्ध आहे असें **महादेवराय** यादवराजाचें मत होतें. व हें व्रत तो अक्षरशः पाळीत असे. या गोष्टीचा फायदा घेऊन आध्रानीं आपल्या गादीवर स्त्रीस, व माळवदेशाच्या राजानें माळव्याच्या गादीवर एका अर्भकास बसविलें यावरून धर्मयुद्धाचे नियम पाळण्यात महादेवरायाचें आगळें औदार्य व खरें शौर्य दिसून येतें. याच जाधव घराण्यात सोळाव्या शतकात जन्मलेल्या जिजाबाईच्या पोटीं जन्म घेऊन महाराष्ट्रात पुन्हा मराठी राज्य स्थापन करणाऱ्या श्रीशिवाजी महाराजानीं आपल्या थोर पूर्वजाच्या पवित्राचरणाचा कित्ता गिरविला यात आश्चर्य नाहीं. ( अय शिशुस्त्रीशरणागताना हन्ता महादेवनृपो न जातु । इत्य विनिश्चित्य ततोतिभीते राष्ट्रे पुरन्धी निहिता नृपत्वे॥ अत एव हि मालवेश्वर शिशुमेव स्वपदे न्यवेशयत् । (व्रतखंड)

सिंघणराजाचें पदरीं खोलेश्वर या नावाचा एक पराक्रमी ब्राह्मण सरदार होता. सिंघण हें सिंह याचें अपभ्रष्ट रूप होय. तो सिंहाप्रमाणें पराक्रमी असून त्यानें खोलेश्वराच्या मदतीनें देवगिरीच्या राज्याचा विस्तार महाराष्ट्र, कर्नाटक, गुजराथ, माळवा वगैरे देशात कल्पनेपलिकडे वाढविला. श्रीशिवाजीमहाराजाचे बरेच गुण सिंघणदेवात होते, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

निरनिराळ्या प्रांतावर त्यानें आपले प्रतिनिधि नेमिले यादवाचें 'सुवर्णगरुडध्वज' नावाचें निशाण कावेरीवर नेऊन तेथें त्यानें आपला जयस्तंभ

उभारिला शके ११३७ सांत **मायीदेव पंडित** याजकडे त्यानें सर्वाधिकार सोपविले होते व शके ११४८ सांत त्यानें आपल्या विश्वासांतील सरदार हेमनायक ह्याला १२००० गांवावर सुभे दार म्हणून नेमिलें होतें राज्याच्या व्यवस्थेसाठीं त्यानें निर निराळ्या अधिकाऱ्यांची योजना केली होती महाप्रधान, मंडले श्वर, दंडनायक, अथवा बहात्तरनियोगाधिप अशी सदरील अधि काऱ्यांची नामाभिधानें होती सिंघणाचे वेळच्या शिलालेखावरून त्याचें राज्य पंजाब, बहार, नेपाळ वगैरे देशापर्यंत पसरलें होतें असें दिसतें

शके ११५० व ११६० ( ६२ ) च्या आंबे येथील शिलाले खांत खोलेश्वराच्या पराक्रमाचें व दानशूरत्वाचें सुंदर वर्णन केलें आहे, व त्याच्या मातापितराच्या उभय कुळांची वंशावळ दिली आहे खोलेश्वरानें हेमाद्रीप्रमाणें जागोजाग देवालयें बांधिलीं वऱ्हाड मांतांत ठिकठिकाणीं विहीरी खणून लोकांची पाणी मिळण्याची सोय केली, व गरीब लोकांकरितां अन्नसत्रें बांधिलीं सिंघण देवाचा तो उजवा हात होता लोकांच्या सुखाकरितां तो अविश्रांत श्रम करीत असे त्याच्या सबधानें आंबे येथील शिलालेखांत वर्णन केलें आहे पयोष्णि नदीच्या तीरावर खोलपूर व वर्धा नदीच्या कांठावर वाराणशी अशी नवीन गांवें त्यानें वसविलीं आंबे येथील शिलालेखांत भरतखंडांतील बऱ्याच देशांचा व राजांचा उल्लेख केलेला आढळतो दक्षिणेकडील प्रांत काबीज करून त्यांची व्यवस्था करण्याचें काम सिंघणदेवानें बीचण्ण नांवाच्या एका पराक्रमी सरदाराकडे सोपविलें होतें त्यानें आपल्या पराक्रमाच्या

जोरावर कर्नाटक, म्हैसूर वगैरे दक्षिणेकडील प्रांत यादवांच्या छत्राखाली आणले

भरतखंड हें आपलें राष्ट्र असून त्याचें परधर्मी व विदेशी लोकांपासून संरक्षण करणें हें आपलें राष्ट्रीय कर्तव्य होय या भावनेचा प्राचीनकाळीं भारतीय लोकांत पूर्ण अभाव होता ही गोष्ट आपल्या देशाच्या प्राचीन इतिहासाचें विहंगमदृष्ट्या अवलोकन करणारास सहज दिसून येते विशिष्ट कुळाचा अगर घराण्याचा अभिमान बाळगून त्याचें वर्चस्व इतरांवर असावें, अशी महत्वाकांक्षा ज्याला त्याला असे राष्ट्रीय भावनेपेक्षा वैयक्तिक महत्त्वाकांक्षेसच जास्त महत्व दिलें जात असे खुद्द दक्षिणेत गेल्या हजार अकराशे वर्षांच्या ऐतिहासिक कालांत आंध्रभृत्य, राष्ट्रकूट, रट्ट भट्ट, गुप्त, चालुक्य, शिलाहार, कदंब, यादव वगैरे अनेक घराण्यातील पुरुषांनीं राज्य केलें उत्तरहिंदुस्थानांत हीच स्थिति होती रजपूत घराण्यांपैकीं चोहाण उर्फ चव्हाण, सोळंकी, वाघेले, चालुक्य वगैरे घराणीं आपापलें वर्चस्व दुसऱ्यावर प्रस्थापित करण्याकरितां परस्परांशीं झगडण्यांत गुंतलेलें असत आर्यांची संस्कृति कायम ठेवून तिची अभिवृद्धि सर्व बाजूंनीं व्हावी, या हेतूनें भरतखंडावर एकछत्री राज्य असावें,या राष्ट्रीय भावनेचा भारतीयांमध्यें पूर्ण अभाव होता महंमद गझनवीनें हिंदुस्थानावर अकरा स्वाऱ्या केल्या,व हिंदूंच्या धार्मिक भावनेवर भयंकर आघात केले परंतु राष्ट्रीय भावनेनें प्रेरित होऊन हिंदु राजांनीं त्याचा प्रतिकार करण्यासाठीं सुसंघटित प्रयत्न केलेला दिसत नाहीं हिंदुलोकांना अत्यंत पूज्य अशा सोमनाथा

राष्ट्रीय भावना व संघटण यांचा अभाव

सारख्या पवित्र स्थानाचा महमद गझनवीनें विध्वंस केला त्यावेळी काहीं हिंदु राजानीं धार्मिक भावनेनें प्रेरित होऊन त्याचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला ही गोष्ट खरी आहे. परंतु भरतखंडातील तत्कालिन प्रमुख अशा सर्व हिंदु राजानीं त्यावेळी सुसंघटित प्रयत्न केला असता, तर महमद गझनवींस हार खावी लागून, त्यास हिंदुस्थानास कायमचा रामराम ठोकावा लागला असता ! भारतीयसमाजाच्या विस्कळितपणा-मुळें मुसलमान राजाना हिंदुस्थानावर केलेल्या स्वाऱ्यात सारखें यश मिळत गेलें, ही गोष्ट इतिहासावरून स्पष्ट दिसून येतें.

मुसलमानाची सम्कृति हिंदु लोकांपेक्षा कोणत्याहि प्रकारें श्रेष्ठ दर्जाची नसताना त्याना हिंदुस्थानातील बहुतेक युद्धात यशप्राप्ति झाली, याचें कारणहि वर नमूद केलेल्या राष्ट्रीय भावनेच्या अभा-वात आहे युद्धकलेंतील प्राविण्य, कणिकनीतींतील नैपुण्य व शौर्य या एकदर गुणात हिंदूची ख्याति महाभारतकाळापासून आहे. तथापि संघशक्तीच्या अभावामुळें हे सर्व गुण परकी शत्रूच्यापुढें फिक्के पडले, ही दुर्दैवाची गोष्ट होय !'

उत्तरहिंदुस्थानात मुसलमानराजानीं प्रवेश करून दिल्ली येथें गादी स्थापिली व हिंदूना नामोहरम केलें. तरीहि त्यापासून दक्षिणे-तील हिंदू राजानीं धडा घेतला नाहीं, ही गोष्ट देवगिरीच्या याद-वाचें राज्य अल्लाउद्दिन खिलजीनें थोडया सैन्यानिशीं अल्पावधीत नष्ट केलें, यावरून दिसून येतें. देवगिरीचें राज्य अस्तास गेल्यावर जाधवाची एक शाखा शिंदखेड येथें जाऊन राहिली तेथील घराणें बहामनी राजाच्या अमदानींत मोठ्या नावारूपास आलें. तें श्रीशिवाजीमहाराजाचें मातुल घराणें होय. ह्या घराण्याच्या

आश्रयानें श्रीशिवाजीमहाराजांचे आजे मालोजी भोसले मोठ्या वैभवास चढले शिवाजीमहाराजांचे वडील शहाजी यांनीं आपल्या आगच्या पराक्रमाची जाणीव तत्कालीन मुसलमान राजास करून दिली ही गोष्ट सर्वश्रुत आहे हीं दोन घराणीं तत्कालीन मुसलमान राजास डोईजड झालीं होतीं या दोन घराण्यातील पुरुषांनीं एकदिलानं सुसंघटित प्रयत्न केला असता, तर दक्षिणेत कोणत्याहि मुसलमान राजास टिकाव धरता आला नसता परंतु त्यांच्या आपसांतील हाडवैराचा फायदा केव्हा मोंगलास तर केव्हा निजामास मिळून, मुसलमानी राज्याचा पाया दक्षिणेंत उलट भक्कम झाला श्रीशिवाजीमहाराजांना मात्र भारतीयांच्या आगच्या या व्यंगाची पूर्ण जाणीव होती असें दिसतें कारण त्यांनीं राष्ट्रीय भावनेनें प्रेरित होऊन आपल्या कार्याची दिशा अगोदरच आखून लोकसंग्रह केला व संघटितप्रयत्नाच्या जोरावर मुसलमानांना शह दिला याकामीं आपले वडिलांची देखील त्यांनीं परवा केली नाहीं यामुळें त्यांचे प्रयत्नास यश येऊन मुसलमानास कायमचा शह बसला व मराठी राज्याची स्थापना करण्याचें कामीं त्यास यश आलें

यादवकालीन बहुतेक शिलालेख संस्कृत व कानडी भाषेंत आहेत पाटण, आणे, उनकेश्वर येथील शिलालेख मात्र अर्धवट संस्कृत व अर्धवट मराठी भाषेंत आहेत यावरून कानडी भाषेचा प्रवेश राजदरबारात फार प्राचीनकाळापासून झाला होता असें दिसतें सिंघण व रामदेवराव यादव यांचे वेळचे कानडींत लिहिलेले पुष्कळ शिलालेख आहेत सिंघणानें बीचण याच्या सहाय्यानं कर्नाटक म्हैसूर वगैरे प्रांत हस्तगत करून

यादवकालीन शिलालेख

घेतले होते रामदेवराव जाधवाचा दक्षिणेतील सुभेदार ' टिप्परस ' या नावाचा होता त्याच्या सहाय्याने दक्षिणेकडील बरेच प्रांत त्यानें काबीज केले दक्षिणेतील शूर, सहासी व कर्तबगार पुरुष पदरीं ठेऊन त्याच्याकडून तेथील देश जिंकून घेण्यात वरील यादवराजाची मुत्सद्देगिरी दिसून येते कानडीतील शिलालेखाचे सूक्ष्म निरीक्षण केलें असता वरील विधानाची यथार्थता दिसून येईल व्रतखडात हेमाद्रीनें यादवराजाचा जो त्रोटक इतिहास दिला आहे, तो त्याने आपल्या दफ्तरातील ताम्रपट व शिलालेख यातील दाखल्यावरून तयार केला असावा असें दिसते, व यामुळें तो सुसगत व सप्रमाण झाला आहे यादवकालीन शिलालेख व ताम्रपटावरून तत्कालीन राजकीय व सामाजिक स्थितीवर चागलासा प्रकाश पडत नाहीं गुजराथ, माळवा, चोल, कर्नाटक वगैरे प्रातावर स्वाऱ्या करून दरएक राजानें जय मिळविला, असें वर्णन बहुतेक शिलालेखात दिलेलें आढळते परतु त्यापैकीं कोणतेंहि राज्य कायमचें नष्ट करून तें आपल्या राज्यात सामील केल्याचें दिसून येत नाहीं जिंकलेल्या राजाचों पाळेंमुळें खणून काढण्याकडे विजयी यादवाची प्रवृत्ति नव्हती, असें त्यावरून दिसून येते

पराभूत केलेल्या राजाना आपलें माडलिकत्व कबूल करावयास लावून त्याचेकडून चौथाई व सरदेशमुखी वगैरे हक्क घेण्याचा श्री शिवाजी महाराजानीं १७ व्या शतकात जो प्रघात पाडला त्याचें रहस्य यात बीजरूपानें दिसून येतें.

हेमाद्रि या नावावरून तो महाराष्ट्रीय नसावा, असें सहृदर्शनीं वाटण्याचा संभव आहे परतु सदरील नाव त्या काळात वऱ्हाडात

खानदेशात प्रचलित होतें अशाबद्दल बऱ्याच ठिकाणीं उल्लेख केलेला आढळतो. देवगिरीच्या यादवाचे माडलिक निकुंभ कुळातील सोईदेव व हेमडीदेव हे बंधुद्वय खानदेशातील रहिवासी होते व त्यानीं ११२७ सालीं पाटण येथील चंगदेवाच्या ज्योतिषपाठशाळेस चागला आश्रय दिला होता. ( पाटणचा शिलालेख पृष्ठ ९० ). शिवाय पंढरपूरच्या शिलालेखात वर्गणीदाराचे यादींत हेमडी हेमाडी या नावाचा उल्लेख केलेला आहे. हेमाद्रीचा बाल्पणातील स्नेही श्रीबोपदेव हा वऱ्हाडातील सार्थ उर्फ सार्ध येथील रहाणारा होता. बोपदेवाने आपल्या एका ग्रंथात वेदपद हें गाव आपलें जन्मस्थान होतें असें म्हटलें आहे. यावरून त्याचें खरें जन्मस्थान कोणतें असावें हें समजत नाहीं. तत्कालीन विदर्भ देशातील प्रसिद्ध विद्वान पुरुषाचीं नावें अशाच तऱ्हेचीं आहेत. श्रीबोपदेव व हेमाद्रि हे एकाच गावचे असावे, असें अनुमान करण्यास जागा आहे. श्रीयुत पा. वा. काणे यानीं विविधज्ञानविस्तारात ( पुस्तक ४३ पान ४८१. ) ‘ विदर्भ व महाराष्ट्र या सबधानें चार शब्द ’ या आपल्या निबधात, चतुर्वर्गचिंतामणि या ग्रथाचा कर्ता हेमाद्रि हा वैदर्भ अर्थात् दाक्षिणात्य होता असें आपलें मत दिलें आहे मराठी भाषेवर त्याचें नितान्त प्रेम होतें, यावरूनही तो महाराष्ट्रीय होता यात शका नाहीं.

**हेमाद्रि हा महाराष्ट्रीय होता काय ?**

देवगिरी हें आपल्या राजधानीचें शहर करण्यात यादवाच्या भिल्लमास काहीं सबळ कारणें दिसली असावींत. यादवाच्या पूर्वी देवगिरीनजीकचें एलापूर हें गाव राष्ट्रकूट राजाचें वसतिस्थान

असावें, असें एल्लोरा येथील शिलालेखावरून दिसून येतें देवगिरीचा

**देवगिरी ऊर्फ दौलताबाद**

किल्ला फार प्राचीनकाळापासून अभेद्य म्हणून गणला जात असे अल्लाउद्दिन खिलजीनें देवगिरीवर एकाएकीं छापा घातला, तेव्हा रामदेवराव जाधव या किल्ल्याचा आश्रय धरुन राहिला त्याच्या गोटात फदफितुरी झाली नसती तर त्यानें या किल्ल्यात राहून अल्लाउद्दिनास जेरीस आणिलें असतें यात शंका नाहीं! औरंगाबादचे वायव्य दिशेस नऊ मैलावर दौलताबाद (पूर्वीचें देवगिरी) शहर आहे, तेथील किल्ला खडकावर बांधलेला आहे. किल्ल्याचा पायथा जमिनीपासून १२० फूटावर आहे त्यात प्रवेश करण्यास एक आडवाट असून भोंवतालीं खदक आहे खदकावरून आत जाण्यास एक पूल आहे. त्यावरून फक्त दोन माणसें जाऊ शकतात किल्ल्यातील काहीं दालनें खडक फोडूनच तयार केलेलीं आहेत युद्धकलेच्या दृष्टीनें हा किल्ला फार महत्त्वाचा आहे यादवाचें राज्य नष्ट झाल्यावर मुसलमानानीं ह्या किल्ल्याच्या जोरावर दक्षिणेकडील बरींच हिंदु राज्यें काबीज केलीं महमद तघलघ ह्यानें या शहराचें नाव दौलताबाद असें ठेविलें व दिल्ली शहराऐवजीं देवगिरी हे राजधानीचें शहर करण्याचें त्यानें एकेकाळीं ठरविलें होतें, व त्याप्रमाणें दिल्ली येथील नागरिकास तें शहर सोडण्याचा प्रसगही आला होता. परतु काहीं अकल्पित कारणामुळें त्याचा सदरील हेतू सिद्धीस गेला नाहीं. निजामशाहीतील बादशहाना मोंगलापासून आपलें सरक्षण करण्याचे कामीं सदरील किल्ला वेळोवेळीं उपयोगी पडला असें मुसलमानी बखरींवरून दिसून येतें दौलताबाद शहर प्रसिद्ध

असून त्याच्या आसपास मोठमोठी शहरें असल्यामुळें तें दक्षिण हिंदुस्थानचें केंद्र बनलें होतें. दिल्लीहून दौलताबादचा रस्ता सातपुड्याच्या बगलेतून पश्चिम वऱ्हाडातून जात असे. त्यावेळीं रस्ते फारच वाईट असल्यामुळें हत्तींच्याप्रमाणें वाटेल तेथून डोंगर व घाट चढून जाता येत नसे देवगिरीनगर विद्वत्तेचें केंद्र म्हणून त्याकाळीं समजलें जात होतें. देवगिरीपासून थोड्या अतरावर असलेलें पठण शहर व्यापाराकरिता फार प्रसिद्ध होतें टॉलमीनें या शहराचा उल्लेख आपल्या प्रवासवर्णनात केला आहे, व श्रीस्थानक, ( हल्लींचें ठाणें ), पुरी [ हल्लींची दडारानपुरी ] व चेमूल्य [ हल्लींचें चउल ] ह्या बदरातून ईजिप्त व अरबस्तान येथील माल खुष्कीच्या मार्गानें पेठणाकडे जात असे, असेंही त्यानें म्हटलें आहे

श्रीशिवाजीमहाराजाची मातुश्री राजमाता जिजाबाई ही शिंदखेडच्या जाधवरावाच्या कुळातील असून प्रसिद्ध लुकजी जाधवरावाची मुलगी होय लुकजी जाधवरावाचें नोकरीनिमित्त दौलताबादेस नेहमीं वास्तव्य असे

रगपचमीच्या दिवशीं मामूल वहिवाटीप्रमाण लुकजी जाधवरावानें इतर सरदाराबरोबर मालोजीस दौलताबादेस आपले येथें बोलाविलें होतें त्यावेळीं मालोजीबरोबर त्याचा पाच वर्षांचा मुलगा शहाजी हा होता शहाजीचें सौंदर्य व चलाखी पाहून लुकजी जाधवरावाचे मनात आपली मुलगी जिजाबाई त्यास द्यावी असें आलें, व त्यानें आपला मनोदय मालोजीस तेथल्यातेथें कळविला हें बोलणें खरें ठरून इ स १६०४ मध्यें शहाजी व जिजाबाई याचा विवाह दौलताबादेसच झाला शिवाजी

महाराजाच्या जन्मानंतर शहाजीचे जिजाबाई बरोबर वितुष्ट आलें. तेव्हा इ स १६३४ त जगदेवराव जाधवांच्या सांगण्यावरून जिजाबाई आपल्या मुलासह दौलताबादेस काहीं दिवस राहिल्या होत्या. याप्रमाणें दौलताबाद शहर प्राचीनकालापासून ऐतिहासिक-दृष्ट्या फार महत्त्वाचें समजलें जात होतें.

हेमाद्रीनें व्रतखंडात यादवराजाची सविस्तर व सगतवार वंशावळ दिली असून दृढप्रहारापासून महादेवरायजाधवापर्यंत जे राजे होऊन गेले त्यांची त्रोटक हकिगत दिली आहे सदरील वंशावळ पृ. १७८ १७९ वर दिली असून राजप्रशस्तिप्रकरण परिशिष्ट १ मध्यें दिलें आहे.

**हेमाद्री व यादवराजप्रशस्ति**

श्रीकृष्णादि सर्व यादवराजे मूळचे द्वारकेकडील असून मथुरेचे आधिपत्य त्यांचेकडे होतें असें हेमाद्रीनें सदरील राज-प्रशस्तींत म्हटलें आहे. देवगिरीच्या यादवराजाचे मूळ पुरुष द्वारकेहून नाशिकच्या आसपासच्या प्रदेशात आले व त्यानीं तेथें आपलें राज्य स्थापिलें. नाशिकापासून सुमारें बारा मैलावर दृढप्रहारानें श्रीनगर या नावाचें शहर स्थापून तेथें आपली राजधानी केली. पूर्वी अस्तित्वात असलेलें चंद्रादित्यपुर (हल्लींचें चांदवड?) वैभवास चढविलें दृढप्रहारास सेऊणचंद्र या नावाचा मुलगा झाला. त्यावरून त्याच्या अमलाखालीं असलेल्या प्रदेशास सेउणदेश असें नाव प्राप्त झालें. व त्याच्या वंशजास सेउणदेशचे यादवराजे असें म्हणण्याचा प्रघात पडला. पाचव्या भिलमानें श्रीनगर येथून आपली राजधानी हालवून देवगिरी येथें नेली.

नतर्मंडातील राजप्रशस्तीत, चद्रादित्यपुर ( हल्लींचें चादवड[१] ) श्रीनगर, सेउणपूर, पर्णरोट ( हल्लींचें पैठण ), मगल्वेष्टक ( मंगळ वेढें ), श्रीवर्धन, कल्याण ( दक्षिणेकडील ), रत्नागिरी, धारानगर, रज्जापूर, वगैरे शहराचा प्रामुख्यानें उल्लेख केलेला आहे. गुजराथ, लाट, कर्नाटक, माळवा, तेलगण, चोलदेश, कोंकण, कुनल, प्रत्यडक वगैरे देश यादवानीं पराक्रमानें जिंकून आपल्या अमलाखालीं आणले असें म्हटलें आहे. श्रीवर्धन शहर असल (अंतल) राजाच्या ताब्यात होतें, व मगळवेढें श्रीनिल्हण राजाच्या ताब्यात होतें. पर्णरोट ( पैठण ) हें शहर मल्लुगीनें जिंकून हस्तगत केलें व तेथें तो राहू लागला श्रीनिल्हण व असल यानद्दल काहीं एक माहिती उपलब्ध नाहीं

हेमाद्रीनें यादवराजासनधानें दिलेली हकिगत, उपलब्ध असलेले शिलालेख व ताम्रपट यात दिलेल्या मजकुराशीं जुळते ही गोष्ट या पुस्तकाच्या तिसऱ्या भागात देवगिरीच्या यादवराजघराण्याचा त्रोटक इतिहास दिला आहे त्यावरून दिसून येतें. हेमाद्रीने यादवराजासबधी दिलेला वृत्तान्त त्रोटक असला तरी तो ऐतिहासिक सत्यास धरून आहे, यावरून हेमाद्रीची इतिहासलेखनाबद्दल आस्था दिसून येतें



